# प्राचीन मराठी

# कविपंचक

( संशोधन, संकलन व समालोचन )



: लेखक :

दत्तात्रय सीताराम पंगु

राजाराम कॉलेज, कोल्हापूर.



प्रथमावृत्ति १९४४.



किंमत २॥ रुपये.




# प्रो. पंगु यांचीं पुस्तकें

## संपादित

१ वच्छहरण : दामोदरपंडितकृत.

२ सीतास्वयंवर : नागेशकृत.

३ ज्ञानेश्वरी : अध्याय बारावा (द्वितीयावृत्ति).

४ कुशलवोपाख्यान : मोरोपंतकृत.

५ वनपर्व : मुक्तेश्वरकृत.

## प्रबंध

१ सामराज : (द्वितीयावृत्ति)

२ आस्वाद : टीकात्मक निबंधसंग्रह.

३ तुषार : " " "

४ प्राचीन मराठी कविपंचक :

प्रकाशक :
दा. ना. मोघे, बी. ए.
स्कूल ॲण्ड कॉलेज बुकस्टॉल,
कोल्हापूर.

मुद्रक :
कृ. ह. सहस्रबुद्धे,
श्रीज्ञानेश्वर छापखाना,
कोल्हापूर.

# प्राचीन मराठी कविपंचक



## अनुक्रम

# प्रास्ताविक

प्राचीन मराठी वाङ्मयाच्या अभ्यासाचें व संशोधनाचें घोडें आजकाल जें फार मागें पडलें आहे, तें पुढें दामटण्याचें काम वास्तविक मराठीचे प्राध्यापक, आघाडीचे साहित्यसेवक, व मराठी भाषेची सन्मान्य शाखेची पदवी घेऊन बाहेर पडलेला बहुसंख्य अभ्यासक असा विद्यार्थीवर्ग यांचेंच आहे. पण कांहीं थोडे अपवाद वगळल्यास निरनिराळ्या महाविद्यालयांतील मराठीचे प्राध्यापक, बहुधा हें काम अंगाबाहेर टाकीत असल्याचें दिसून येतें. विश्वविद्यालयाच्या अभ्यासक्रमांत अलीकडे संस्कृत विद्येचें महत्त्व फारच कमी झालें असल्यानें, संस्कृतावर आधारलेलें मराठी प्राचीन वाङ्मय, सर्वसाधारण विद्यार्थ्याला व त्यांतूनच निर्माण होणाऱ्या प्राध्यापकवर्गाला दुर्गम व्हावें यांत नवल नाहीं. आमचे आघाडीचे साहित्यिक तर प्राचीन वाङ्मयाला 'साहित्य' सुद्धां म्हणावयास तयार नसून, अशा वाङ्मयाच्या अभ्यासकांकडे तुच्छतेनें पाहण्यासही ते कमी करीत नाहींत. या साहित्यिकांतले कांहींजण साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद भूषविण्याइतक्या पदवीला पोंचूनही, प्राचीन वाङ्मयाबद्दल इतके अनभ्यस्त असतात कीं, प्राचीन मराठी कवींचीं धड नांवेंही त्यांना ठाऊक नसतात. तरुण पिढीचे असेच एक प्यारे लेखक व कांहीं वर्षांपूर्वी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष झालेले सद्‍गृहस्थ, माझ्या "सामराज" या पुस्तकाबद्दल पृच्छा करतांना, "काय हो तुमचा सामदेव कां कोण तो?" असा प्रश्न मला मोठ्या डौलानें विचारीत होते. या त्यांच्या प्रश्नांत जितकें त्यांचें अज्ञान भरलें होतें, तितकीच प्राचीन मराठी कवींबद्दलची बेफिकिरी व अशा कवींच्या अभ्यासकांना कमी लेखण्याची अनुदार वृत्ति मला दिसून आली. साहित्यसंमेलनाचा अध्यक्ष नव्या व जुन्या वाङ्मयांत सारखाच सव्यसाचित्वानें वावरणारा असला पाहिजे; व कै. शि. म. परांजपे, व कै. वा. म. जोशी असे अध्यक्ष, वरील द्विविध गुणांनीं मंडित असल्यामुळें,

दोन्ही प्रकारच्या वाङ्मयाचा आढावा ते आपल्या अध्यक्षीय भाषणांत घेतही असत. गेल्या चार पांच वर्षांत,ललितवाङ्मय–लेखकालाच साहित्य संमेलनाचा अध्यक्ष निवडण्याची प्रथा रूढ झाल्यापासून व हे अध्यक्षही मराठी वाङ्मयाचें सर्वांगीण समीक्षण करण्याचें सोडून एकाद्या जुजबी विषयावर आपली वाणी शिणवूं लागल्यापासून विद्वत्ता, पांडित्य, संशोधन व समालोचन, हे शब्द नव्या पिढीला अगदीं नवे होऊन बसले आहेत.

विश्वविद्यालयांतून मराठीची अत्युच्च पदवी घेऊन बाहेर पडलेले तयार विद्यार्थीदेखील, मराठीच्या प्राध्यापकांप्रमाणेंच प्राचीन मराठी वाङ्मया-बद्दल उपेक्षा दाखवीत असून, त्यांच्या ठिकाणीं असलेला संस्कृत विद्येचा, तौलनिक अभ्यासाचा व श्रमसातत्याचा अभाव पाहिल्यास, त्यांच्याकडूनही या क्षेत्रांत कांहीं भरीव कामगिरी होईल असें वाटत नाहीं. सर्वत्र माजलेले अर्धमागधीचें बंड, मराठी वाङ्मयाच्या अभ्यासाला सर्व दृष्टीनें मारक होत असल्यामुळें, या भाषेनें अलंकृत झालेले आमचे पदवीधर, प्राचीन मराठी कवींच्या काव्याभ्यासाच्या खोल पाण्यांत न शिरतां, दुसऱ्यांनीं लिहून ठेवलेल्या काव्यविवेचनावरच सर्वस्वीं विसंबून, स्वतः शिकतांना व शिक्षक होऊन शाळेंत शिकवितांना, कशी तरी आपली गुजराण करीत असतात. प्राचीन कवींवर कधींमधीं बोलण्याचाच प्रसंग पडल्यास, स्वतःच्या डोक्याला क्षणभरही शीण न देतां, पांगारकर-भावे इत्यादिकांच्या ग्रंथांच्या विटेवर हे वाङ्मयविठोबा अशा ऐटीनें उभे राहतात कीं, त्यांच्या मुखांतून अस्खलित स्रवणारी वाक्सरिता ही जणु त्यांच्या स्वतःच्याच बुद्धिशैलांतून उगम पावली आहे, अशी भोळ्याभाबड्या श्रोत्यांची समजूत व्हावी. असा हा प्राचीन मराठी वाङ्मयाभ्यासाचा सर्वत्र उजेड आहे !

प्राचीन मराठी कवींबद्दल आतांपर्यंत कै. राजवाडे, पांगारकर, आजगांवकर व भावे इत्यादिकांनीं संशोधनपूर्वक पुष्कळच लिहिलें असलें, तरी या सर्वांनीं काढलेले सिद्धांत पारखून घेऊन, त्यांची छाननी करणें आतां अगत्याचें झालें आहे. प्राचीन मराठी वाङ्मयाच्या संशोधनाची बाह्य साधनसामग्री या सर्व साक्षेपी विद्वानांनीं पुष्कळच जमविली. पण कार्य-बाहुल्यामुळें त्या त्या कवींच्या ग्रंथांतील अंतःसाधनांशीं तिची तुलना करून कवींच्या व्यक्तित्वाचा व त्यांच्या कालाचा ठाम निश्चय करण्याचें सर्वच

काम त्यांच्या हातून पार पडलें नाहीं. कै. राजवाड्यांची गोष्ट सोडल्यास, संतवाङ्मयाला सर्वस्वीं वाहून घेतलेल्या पांगारकर--आजगांवकरांनीं, आपल्या लिखाणांत जरूर ती चिकित्सक दृष्टि न दाखविल्यामुळें, व कै. भाव्यांजवळ तशी दृष्टि असूनही त्यांनीं आपल्या विधानांना कांहींच आधार न दिल्यामुळें, या तिघांचेही वाङ्मयेतिहास भाषाभ्यासासारख्या अंतःसाधनाच्या भट्टींतून शुद्ध करूनच स्वीकरणीय ठरतील. मराठी कवींच्या अशा प्रकारच्या भाषाशास्त्रांतर्गत अभ्यासाचा उपक्रम, गेल्या १०।१५ वर्षांत रा. प्र. घों. कानिटकर, रा. अ. का. प्रियोळकर इत्यादि संशोधकांनीं 'विविधज्ञान-विस्तारा'च्या द्वारां केला होता. पण हे प्रयत्न अशा ध्येयनिष्ठ मासिकाबरोबरच विलय पावून, अलीकडे तर त्यांचें नांवसुद्धां ऐकूं येईनासें झालें आहे. मराठी वाङ्मयाच्या अभिमान्यांना ही गोष्ट कितीशी स्पृहणीय आहे ?

प्रस्तुत पुस्तकांत मुक्तेश्वर, वामनपंडित, नागेश, रघुनाथपंडित व निरंजनमाधव अशा पांच प्राचीन मराठी कवींच्या व्यक्तित्वाबद्दल व काला-बद्दल त्यांच्या ग्रंथांतील अंतःसाधनें विचारांत घेऊन, थोडी नवीन उपपत्ति मांडण्याचा प्रयत्न केला आहे. मुक्तेश्वर हा रामदासाहून एका वर्षानें लहान होता, हें कै. भाव्यांचें मत कसें सदोष आहे हें दाखवितांना, अलीकडे रा. दा. के. ओक यांच्या अशाच विचारसरणीचाही योग्य तो परामर्श येथें घेतला आहे. वामनपंडितांसंबंधींही माजलेल्या दुर्मतांचा उहापोह करून, त्यांचें समर्थांशीं आजपर्यंत मानण्यांत आलेलें शिष्यत्वाचें नातें व समर्थांहून त्यांचें कनिष्ठत्व असिद्ध ठरवितांना, पंडितांचा खरा जन्मशक कोणता असेल, अथवा त्यांचीं काव्यें कोणतीं व त्यांच्या शिष्यांचीं कोणतीं, इत्यादि विवाद्य प्रश्न येथें सोडविण्याचा जो अल्पसा प्रयत्न केला आहे, तो वाचकांना अभिनव वाटल्यावांचून राहणार नाहीं. सामराज--नागेशादि कवींबद्दलची कै. भाव्यांची भूमिका कशी निखालस चुकीची आहे, व शाहुकालांत त्यांनीं डांबलेले हे कवी वास्तविक कसे शिवकालीन आहेत, हें त्या कवीच्या भाषेच्या व अंतरंगाच्या अभ्यासाशिवाय कळणें अशक्यच होतें. येथें नागेश या थोड्या अपरिचित पण निःसंशय उच्च दर्जाच्या आख्यानकवीची त्याच्याच ग्रंथावरून शक्य ती मिळणारी चरित्रविषयक व कालनिदर्शक सूक्ष्म माहिती मांडली असून, शिवकालीन कलाकवींच्या अधिक अभ्यासास ती मार्गदर्शक

होईल अशी आशा आहे. रघुनाथपंडिताबद्दल देखील, गेल्या दहा वर्षांत कांहीं कमी चर्चा झाली नाहीं! पण त्याच्या व्यक्तित्वाचा प्रश्न सुटण्याऐवजीं, तो अधिकच गुंतागुंतीचा होऊन बसला. या पुस्तकांतील रघुनाथपंडितावरील माझ्या निबंधांत बहुतेक सर्व विद्वानांच्या मतांचा विचार करून मीं माझें जें मत मांडलें आहे, तें कांहींना थोडें विलक्षण वाटलें, तरी सत्याच्या पुष्कळच जवळ असलेलें वाचकांना आढळेल. शेवटीं निरंजनमाधव या पेशवेकालीन राजकारणी कवीच्या इतरांनीं दिलेल्या चरित्रविषयक माहितीचा निष्कारण पुनरुच्चार करीत न बसतां, त्याच्या निश्चित कालाची व प्रत्यक्ष राजकारणी कारकीर्दीची पेशवे दप्तराच्या आधारें मीं जी अगदीं नवीन माहिती वाचकांना सादर केली आहे, तीही त्यांना स्वागतार्ह वाटण्यासारखीच आहे. कै. भावे यांचा "महाराष्ट्र सारस्वत" हा ग्रंथ वाङ्मयाभ्यासाला निःसंशय मोलाचा आहे. पण अशा ग्रंथांतही कालांतरानें भर घालून पुष्कळच सुधारणा करावी लागते, हें मराठी वाचकवर्गाला उमगल्यास माझ्या श्रमांचें सार्थक झालें असें मी समजेन.

नेहमींप्रमाणें हेंही पुस्तक येथील प्रसिद्ध व पदवीधर प्रकाशक श्री. दामुआण्णा मोघे यांच्या प्रोत्साहनानेंच प्रसिद्ध होत आहे. ललितवाङ्मयाप्रमाणेंच टीकात्मक व संशोधनात्मक वाङ्मय प्रकाशित करण्यांत, श्री. मोघे हे नेहमींच जी तयारी दाखवितात, ती जितकी दुर्मिळ, तितकीच अभिनंदनीय आहे. सदर पुस्तक अगदीं अल्पावधींत प्रकाशित करण्यांत त्यांनीं दाखविलेली तत्परता भूषणास्पद असून, त्याबद्दल त्यांचा मी फार आभारी आहें. श्रीज्ञानेश्वर छापखान्याच्या सुबक व वक्तशीर छपाईबद्दलही जेवढे आभार मानावे तेवढे थोडेच होतील.

कोल्हापूर<br>ता. ११।१२।४४

दत्तात्रय सीताराम पंगु.

# मुक्तेश्वर : १

मराठींत काव्यरचनेला सुरुवात करण्याचें सर्व श्रेय, महानुभावपंथ व वारकरीपंथ यानांच दिलें पाहिजे. या दोन्ही पंथांचें आराध्यदैवत श्रीकृष्ण हेंच असल्यामुळें, महाभागवत व भगवद्गीता या दोन ग्रंथांना साहजिकच नित्यपठणांत अग्रपूजेचा मान मिळाला. पंडित दामोदर, भास्करभट्ट, नरेंद्रकवि इत्यादि महानुभावकवींनीं, निरनिराळ्या भागवतीप्रकरणांवर जशीं आख्यानें रचलीं, तशाच ज्ञानदेव, दासोपंत इत्यादि विठ्ठलभक्तांनीं भगवद्गीतेवर विस्तृत व रसाळ टीका लिहिल्या. एकनाथापर्यंतचे बहुतेक कवि या सांप्रदायांच्या पकडींत सांपडल्यामुळें, त्यांची दृष्टि या दोन ग्रंथांपलीकडे क्वचितच गेली. नाहीं म्हणावयास एकनाथांचा रसिक नातू मुक्तेश्वर, यानें मात्र हा ठराविक चाकोरीचा मार्ग सोडून, रचना व काव्यविषय यांत अपूर्व क्रांति घडवून आणण्याचें श्रेय संपादिलें.

मुक्तेश्वरांच्या पूर्वी अथवा समकालीं ओंवी हें वृत्त काव्यांत सर्वत्र रूढ असूनही, आपल्या 'संक्षेप रामायणांत' अक्षरगणवृत्तात्मक रचनेला त्यानें जसा प्रथमच मुहूर्त केला, तसाच भागवत व गीता हे नित्याचे अध्यात्मिक काव्यविषय थोडे बाजूला सारून, महाभारतासारखा व्यावहारिक, अद्‌भुत व ललितरम्य कथांनीं व उपाख्यानांनीं ओथंबलेला काव्यग्रंथ अनुवादण्याचा त्यानें प्रथमच उपक्रम केला. काव्य रचावयाचें तें भक्ति किंवा अध्यात्म यांच्या विवेचनासाठींच रचावयाचें, हा काव्याचा परंपरागत पारमार्थिक हेतु बदलून, मुक्तेश्वरानें आपल्या सगुण सालंकार वाणीनें काव्यानंद चाखण्याची चटक आपल्यासारख्याच रसिक वाचकांना लावली. इतकेंच नव्हे, तर भक्ति किंवा वेदांत यांची बैठक न सोडतां, अनेक आख्यानोपाख्यानांवर आपली स्वतंत्र कल्पनाशक्ति चालवून मराठी भाषेची सेवा करण्याची स्फूर्ति त्यानें अनेक कवींना दिली. शिवकालांत सामराज, नागेश, विठ्ठल व रघुनाथ पंडित अशा आख्यानकवींची अथवा कलाकवींची जी उज्ज्वल परंपरा निर्माण झाली, तिचीं बीजें मुक्तेश्वरानें रूढ केलेल्या या नवीन प्रथेंत कोणासही दिसण्यासारखीं आहेत.

अशा या कवीचें कुलवृत्त अथवा जन्मशक याची निर्विवाद माहिती मिळूं नये, ही गोष्ट जितकी आश्चर्याची तितकीच खेदाची समजली पाहिजे. मुक्तेश्वरानें आपल्यासंबंधीं आपल्या ग्रंथांत जे जातां जातां उल्लेख केले आहेत, त्यांवरून तो श्रीएकनाथांच्या मुलीचा मुलगा[१] असून त्याचें आडनांव मुद्गल, गोत्र अत्रि, व सूत्र आश्वलायन होतें, असें निश्चित समजतें. करवीरनिवासिनी महालक्ष्मी ही त्याची कुलस्वामिनी[२] असून सोनारीचा भैरव[३] हा त्याचा कुलस्वामी होता. मुक्तेश्वर बरेच दिवस आपल्या आजाच्या घरीं असल्यामुळें पैठण[४] हेंच त्याचें वसतिस्थान होतें, व एकनाथांचें उपास्यदैवत जें दत्त, तेंच त्याचेंही उपास्यदैवत झालें. 'लीलाविश्वंभर' हे आपले गुरु असें मुक्तेश्वरानें ठिकठिकाणीं म्हटलें आहे. पण 'गुरु' हा शब्द मातापित्यांचा निदर्शक मानावयाचा कीं, पारमार्थिक गुरुत्वाचा वाचक समजावयाचा हा प्रश्न थोडा विवाद्य होऊन बसला आहे. रा. दा. के. ओक यांनीं तर मुक्तेश्वराचे जनक चिंतामणी व विश्वंभर या दोन भिन्न व्यक्ति होत्या असें उघडपणें म्हटलें असून,[५] विठोबा आण्णा दप्तरदार यांच्यासारख्या कविचरित्रकारानें वर्णन केलेला,[६] 'विश्वंभर व लीला यांचा विवाहसंबंध मुक्तेश्वराच्या जन्मास कारणीभूत झाला' असा परंपरागत समजही, त्यांची खात्री करूं शकला नाहीं. तथापि मुक्तेश्वराच्या वंशजापाशीं असणाऱ्या त्यांच्या घराण्याच्या वंशवृक्षांत मुक्तेश्वरांच्या तीर्थरूपाचें नांव 'चिंतामणि ऊर्फ विश्वंभर गोसावी' असें दिल्याचें ज्या अर्थी रा. आजगांवकर सांगतात[७] अथवा आपल्या सभापर्वांत[८] मुक्तेश्वरानें ज्या अर्थी 'चिंतामणि' असें आपल्या वडिलांचें नांव देऊन त्यांनाच 'लीलाविश्वंभर' असें म्हटलें आहे, त्या अर्थी त्या दोन्ही व्यक्ति एकच असाव्या असें मानण्यास फारसा प्रत्यवाय नाहीं. शिवाय उद्धवचिद्धन, शिवराम, रंगनाथ, उद्धवसुत व सिद्धचैतन्य यांच्या ज्या संतनामावळी[९] प्रसिद्ध आहेत, त्यांत "लीलाविश्वंभराचा कोठेही उल्लेख नाहीं, यावरून

---

१ मुक्तेश्वर—आदिपर्व—१।७७. वन—१।४. २ वन—१।३. ३ वन—१।४. ४ संक्षेप रामायण—४६९, ४७०. ५ मुक्तेश्वरकृत विराटपर्व (१९३९)—उपोद्घात पृ. ५. ६ सुश्लोकलाघव—३९८. ७ महाराष्ट्रकविचरित्र भाग १ पृ. ३७—३८. ८ सभापर्व—उपसंहार. ९ महाराष्ट्रकवि—अंक४, पौष शके १८२५.

मुक्तेश्वराचे गुरु 'लीलाविश्वंभर' हे कोणी निराळेच साधु म्हणून प्रसिद्ध असते, तर महिपतीसारख्या चरित्रकारांनीं आपल्या ग्रंथांत त्यांचा स्वतंत्र उल्लेख केला असता," हें रा. आजगांवकरांचें म्हणणें जितकें तर्कशुद्ध, तितकीच 'पंतांच्या सन्मणिमालेंत व जयरामसुतकृत संतमालिकेंत आढळणारे 'लीलाविश्वंभर' हें स्वतंत्र नांवही पंतांनीं व जयरामसुतानें मुक्तेश्वराच्या काव्यांतूनच घेतलें असावें' ही त्यांची अटकळ देखील सत्यापासून फारशी दूर नाहीं असें वाटूं लागतें. मुक्तेश्वराच्या आईचें नांव गोदावरी असून, एकनाथ आपल्या या मुलीस 'लीला' या नांवानें संबोधीत, व या नांवावरूनच चिंतामणीलाही 'विश्वंभर' असें नांव पडलें, या प्रसिद्ध आख्यायिकेचाही वरील प्रश्न सोडविण्यास कांहींसा उपयोग होतो. एकंदरीत आपल्या पित्यालाच गुरु कल्पून ग्रंथारंभीं किंवा शेवटीं त्यांचा साभिवंदन उल्लेख करण्याचें विनयशाली धोरण मुक्तेश्वरानें स्वीकारल्याचें उघड दिसतें. मुक्तेश्वरासंबंधीं किंवा त्याच्या ग्रंथासंबंधीं त्याचे विद्यमान वंशज श्री. तेरवाडकर इनामदार, गाढ अशा अज्ञानांधकारांत आहेत. पण मुक्तेश्वराचें वृंदावन तेरवाड गांवीं आहे, यावरून तो तेथेंच निधन पावला, एवढें मात्र निश्चित.

मुक्तेश्वराची आज जी कविता उपलब्ध आहे, तेवढीच त्यानें रचिली, अथवा यापेक्षां पुष्कळ लिहिली जाऊनही ती कालोदरांत गडप झाली, हें सांगणें कठीण झालें आहे. तथापि 'संक्षेप रामायण' हा त्याचा अनेकवृत्तात्मक ग्रंथ पहिला असावा, अशी त्याच्या खडबडीत व संस्कृतप्रचुर रचनेवरून कल्पना होते. कालिदास, भर्तृहरी, जगन्नाथराय व जयदेव यांच्या वाणीचे पडसाद अनुवादरूपानें ज्या अर्थी येथें ऐकूं येतात, त्या अर्थी या कवींच्या वाचनानंतर लवकरच हा रामायणाचा परिपाक त्याच्या हातून उतरला असावा. पुढील महाभारतरचनेंत दिसणारा मुक्तेश्वराचा अपूर्व वाग्विलास येथें दिसत नसला, तरी आरंभींची गणवृत्तात्मक व ललितरचना या दृष्टीनीं या ग्रंथाचें महत्त्व आहे. यानंतर मुक्तेश्वरानें शतमुखरावणवधाख्यान, मूर्खांचीं लक्षणें, श्रीएकनाथचरित्र, पदें, आरत्या व भगवद्गीता, अशी अनेक स्फुटप्रकरणात्मक रचना केली असावी असें दिसतें. या रचनेंत रामायणापेक्षां थोडीफार सहजता दिसून आली, तरी विस्कळीत-

पणा व चमत्कृतिप्रियता यांमुळें ती महाभारताच्या अगोदरची खास असावी, असें अनुमान निघतें. मुक्तेश्वराची कोणती रचना प्रथमची व कोणती मागाहूनची, हें ठरविण्यास भाषापद्धति, विचारसौकर्य, सहजता व शृंगार-प्रियता, या गमकावांचून दुसरीं बाह्य गमकें उपलब्ध नाहींत. तसें पाहिल्यास मुक्तेश्वराचें महाभारत हा त्याच्या परिणतप्रज्ञेचा विलास होय. या ग्रंथांत मुक्तेश्वराच्या अंगच्या रसिकतेस व स्वतंत्र प्रतिभेस विहार करण्यास पूर्ण मुभा मिळाली असून, त्याची वाणीही प्रसन्न, सहज व ओघवती बनली आहे. मूळ महाभारतांतील स्थलकालव्यक्तिवर्णनांना आपल्या कल्पनेचा नवीन उजाळा देऊन व त्यांतील निरनिराळे प्रसंग नवरसरंजित करून मुक्तेश्वरानें ते आपल्या श्रोत्यांपुढें अशा हुबेहूब तऱ्हेनें मांडले आहेत कीं, आज उपलब्ध असलेल्या आदि, सभा, वन, विराट व सौप्तिक या त्याच्या महाभारताच्या पर्वांनीं, महाराष्ट्रकविमालिकेंत त्याचें नांव अजरामर होऊन, इतर पर्वांबद्दल रसिकांना चुटपुट लागावी. मुक्तेश्वरानें साग्र महाभारत अनुवादलें असावें असा सर्वत्र समज आहे, व पहिल्या चार सलग पर्वांनंतर मधलेंच अकरावें सौप्तिक पर्व सांपडल्यामुळें, व आदिपर्वांत पुढील उद्योग[1] व द्रोण[2] पर्वांचा उल्लेख केल्यामुळें, किंवा विराट[3] आणि सौप्तिक[4] पर्वांच्या शेवटीं पुढील पर्वरचनेचें श्रोत्यांना आश्वासन दिलें गेल्यामुळें, वरील समज खरा मानण्याकडे प्रवृत्ति होते. कदाचित् असेंही असूं शकेल कीं, मुक्तेश्वराचा सर्व भारत अनुवादण्याचा मानस असूनही, तो तडीस गेला नसेल. पण मुक्तेश्वरानें साग्र महाभारत अनुवादलें होतें, हें सिद्ध करतांना रा. दा. के. ओक[5] यांनीं देवदासकृत संतमालिकेंतील ओवींचा[6] किंवा मोरोपंतांच्या पांडुरंगदंडकांतील आर्येचा[7], जो अर्थ लावला आहे, तो मात्र मिर्णायक

---

१ आदि–२०।१७३. २ आदि–४८।६५. ३ विराट–८।११९–१२०. ४ सौप्ति–४।१२७, ५ विराट पर्व उपोद्घात पृ. ११. ६ मुक्तेश्वरा मुक्तदशा। दिधली तुवां जगदीशा। पुरवून त्याची आशा। भारथटीका वदविली ॥८८॥ ७ मुक्तेश्वरकृत भारत|आवडतें विठ्ठलासि कीं पर्व। सर्वश्रवणें हरितें आशा कविच्या अशेषही गर्व ॥

आहे असें वाटत नाहीं. त्यांतील अनुक्रमें 'भारथटीका' व 'सर्व' हीं पदें अधिक ताणलेलीं दिसतात.

शिवाय मुक्तेश्वरानें समग्र भारत रचलें अशी जर मोरोपंतांची समजूत होती व याच्या उलट मुक्तेश्वरानें चारच पर्वें रचिलीं असें जर विठोबा आण्णा दप्तरदार[1] म्हणतात, तर मुक्तेश्वराचीं इतर पर्वें मोरोपंत व विठोबा आण्णा यांच्या मध्यंतरींच्या कालांत नष्ट झालीं, असेंच मानणें भाग आहे. वस्तुतः गेल्या ४०।४२ वर्षांत पुष्कळ संशोधन होऊनही वरील पांच पर्वांव्यतिरिक्त एकही अधिक पर्व न सांपडणें, व ज्यांनीं ज्यांनीं 'मुक्तेश्वरी भारताची सर्व पर्वें सांपडलीं' अशी हांकाटी केली, त्यांच्या पोथ्यांतून पहिलीं चार पर्वें मुक्तेश्वराचीं, व इतर पर्वें गोपाळ, माधव वगैरे कवींचीं असणें या वस्तुस्थितीमुळें, मुक्तेश्वराच्या साग्र महाभारतरचनेबद्दल साशंकता उत्पन्न झाली आहे. तथापि महाभारताच्या उपलब्ध मराठी अवतारांत मुक्तेश्वराचें भारत जसें गुणानें श्रेष्ठ आहे, तसेंच तें वयानेंही जेष्ठ आहे.

या महाभारतरचनेनंतर मुक्तेश्वरानें शुकरंभासंवाद व हरिश्चंद्राख्यान हीं लहान आख्यानें रचलीं असावीं. कारण यांत महाभारताप्रमाणेंच श्रृंगार-करुणादि रसांचा परिपोष व भाषेचें मार्दव, प्रकर्षाला पोंचल्याचें अनेक ठिकाणीं प्रत्ययाला येतें. हरिश्चंद्राख्यानाची थोडी अशी मौज आहे कीं, हें आख्यान काव्येतिहाससंग्रहाच्या मुक्तेश्वरी वनपर्वांत, नलोपाख्यानाच्या ऐवजीं सहाव्या अध्यायापासून दहाव्या अध्यायापर्यंत देण्यांत आल्यामुळें, कित्येकांनीं तें वनपर्वांतर्गतच आहे, अशी समजूत करून घेतली आहे. पण महाभारताच्या कोणत्याही प्रचलित संस्कृत प्रतींत, प्रस्तुत हरिश्चंद्राख्यान वनपर्वांत ज्याअर्थी दिलेलें दिसून येत नाहीं, व पहिल्या अध्यायाखेरीज मध्यंतरीं दुसऱ्या कोणत्याही अध्यायाच्या आरंभीं न येणारी गणपतिसरस्वतीची स्तुति, ज्या अर्थी काव्येतिहाससंग्रहाच्या वनपर्वांतील हरिश्चंद्राख्यानाच्या सहाव्या अध्यायाच्या प्रारंभीं आढळते, त्याअर्थी मुक्तेश्वरानें स्वतंत्रपणें रचलेलें हें आख्यान, त्याच्या वनपर्वांत मागाहून कोणीतरी घुसडून दिलें असलें पाहिजे याबद्दल शंका रहात नाहीं. पुनः श्रीमंत गोपाळराव पटवर्धनांस त्यांच्या

---

१ सुश्लोकलाघव ३९९

वडिलांनीं लिहिलेल्या पत्रांत, प्राकृत हरिश्चंद्राख्यानाच्या पांच अध्यायांचा केलेला उल्लेख, मुक्तेश्वरकृत हरिश्चंद्राख्यानासंबंधींचाच आहे, असें ज्याअर्थी कै. पांगारकरांना[१] निःशंकपणें वाटतें, त्याअर्थी मुक्तेश्वरानें हें आख्यान स्वतंत्रपणें रचलें होतें, ही गोष्ट निरपवाद मानण्यास कोणतीच हरकत नाहीं. मुक्तेश्वराचीं हीं साधीं त्रुटित प्रकरणें जर पेशवेकालीन मुत्सद्दी वर्गाकडून अभ्यासलीं गेल्याचा हा असा स्पष्ट पुरावा मिळतो, तर शौर्यवीर्यादि प्रसंगांच्या ओजस्वी वर्णनांनीं भरगच्च असलेल्या त्याच्या महाभारताच्या पांच पर्वांनीं कितीतरी वीरांना व योध्यांना वीरश्रीचें स्फुरण चढविलें असेल, याची कांहींशीं कल्पना होते.

कोणताही कवि अथवा ग्रंथकार, जसजसा आपल्या व्यवसायांत उत्क्रांत होत जातो, तसतसा तो पांडित्यापासून आत्मप्रवणतेकडे, विनयापासून आत्मविश्वासाकडे अथवा स्वतः केलल्या अभ्यासाच्या उल्लेखापासून स्वानुभवाच्या व सूक्ष्मावलोकनाच्या उल्लेखांकडे झपाट्यानें जात असतो. मुक्तेश्वराचा संस्कृतकाव्यनाटकांचा[२] अभ्यास उत्तम असून, त्याचें षट्शास्त्रांचें[३] अध्ययनही त्याच्या ग्रंथांत व्यक्त झालें आहे. ज्ञानेश्वर–एकनाथादिकांच्या प्राकृत ग्रंथांचा तर त्यानें अभ्यास केला होताच, पण महाभारताच्या कांहीं प्राकृत टीकाही त्यानें डोळ्यांखालून घातल्या असाव्या.[४] त्याच्या ग्रंथांत प्रारंभीं स्वीकारलेला विनय,[५] पुढें पुढें आत्मविश्वासांत[६] परिणत होतो. मुक्तेश्वराला महाराष्ट्र[७] देशाचा व भाषेचा मोठा अभिमान[८] असून हिंदुस्थानांत सर्वत्र डोळे उघडून त्यानें प्रवास केल्यामुळें, चौकसपणा व बहुश्रुतता हे गुण त्याला प्राप्त झाले होते. यानें बहुधा जें जें ऐकलें, तें तें कालौचित्याकडे दुर्लक्ष करूनही आपल्या ग्रंथांत त्यानें कोठेतरी गोंवून टाकलें. ब्राह्मणांच्या जाती,[९]

---

१ पांगारकरकृत मुक्तेश्वर–चरित्र आणि काव्यविवेचन पृ. २८. २ संक्षेप रामायण–श्लो. १. ३ आदिपर्व १।७३–७५; आदि १५. ४ आदि–४१।७२. ५ सभा–५।१७५–१७९. ६ वन–७।२१७–२१८. ७ रामायण–४६९. ८ सभा–१।१८–२२. ९ वन–१।३१–३२.

कुस्त्यांचे पेंच,[1] शिक्षांचे प्रकार,[2] पक्वान्नें,[3] वाद्यें,[4] शस्त्रें,[5] व वस्त्रें[6] या सारखी गोष्टी सोडून दिल्या, तरी आपणास ठाऊक आहे तें सर्व आपल्या ग्रंथांत समाविष्ट करण्याच्या हव्यासामुळें, मुक्तेश्वराच्या हांतून कालविपर्यासाचा दोष अनेकवेळां घडला आहे. दुष्यंतानें जिंकलेल्या राजांत जेथें फिरंगी, इंग्रज, रूमशाम[7] इत्यादि येतात, किंवा नलोपाख्यानांतील[8] ऋतुपर्ण राजा जेथें आपणास 'लीलावतीग्रंथज्ञ' म्हणवितो, तेथें मुक्तेश्वराचें अनवधान कोठवर वर्णावें? आतां कालविपर्यासाचा दोष रसहानिकारक असला तरी एकपरीनें असा उपकारक होतो कीं, त्यामुळें कविकालीन गोष्टींवर अथवा कवीच्या ज्ञानावर लख्ख प्रकाश पडावा. मुक्तेश्वरांकडून घडलेला हा दोष मात्र त्याच्याच अनिश्चित कालनिर्णयास दूरतः उपयोगी पडला आहे.

विद्वत्त्व व रसिकत्त्व यांचें बहुधा खडाष्टक असतें. पण मुक्तेश्वर या नियमाला अपवाद होता. त्याच्या महाभारतांत व विशेषतः आदिपर्वांतील शकुंतला व ययाति आख्यानांत, त्याला सर्वांत प्रिय असणाऱ्या शृंगाररसाची त्यानें लयलूट केली आहे. शकुंतलेच्या रूपाचें[9] अथवा शर्मिष्ठेच्या लावण्याचें[10] त्यानें केलेलें वर्णन इतकें मनोज्ञ आहे कीं, मुक्तेश्वरानें तशी लावण्यवती क्षत्रिय राजकन्या प्रत्यक्ष पाहिली असावी असेंच वाटतें. अनुवाद करीत असलेल्या मूळ ग्रंथाला चिकटून राहण्याचा कसोशीनें प्रयत्न करीत असतांही प्रतिभासंपन्न कवि थोडातरी आपल्या कल्पनाप्रवाहाबरोबर वाहवल्याशिवाय रहात नाहीं. मुक्तेश्वराच्या रसिकवृत्तीनें व शृंगारवर्णनप्रियतेनें प्रसंगविशेषीं अशी कांहीं उचल खाल्ली आहे कीं, तसें वर्णन करीत असतां देवाधिदेवही त्याच्या तावडींतून सुटलेले नाहींत. दमयंतीपुढें गंगा, पार्वती यांचीदेखील मातब्बरी नाहीं, हें दाखवितांना सहस्र मुखांनीं सागराला मिळणाऱ्या गंगेवर

---

१ सभा–७।१७–१९; २२–३५; ३८–४०; ५०–५५; वन–२।५४–६०, विराट–३।१४०–१४८, १५२–१५७. आदि–३८।७८–९०. २ वन–७।५८. ३ वन–११।११६–१३५; आदि–२९।८२–८९; सभा ९. विराट–८।५९–८८. ४ वन–१२।५८–५९. ५ वन–१५।१८४–१८५. ६ सभा–१४. ७ आदि–१५।९–१०; सभा–८।१२७, १५६. आदि–४०।८५. ८ वन–८।१११. ९ आदि–१५।९८. १० आदि–१९।१६–२३.

त्यानें जी सुंदर हेतूत्प्रेक्षा[१] केली आहे, ती त्याच्या मनोहर कल्पकतेची व रसज्ञ वृत्तीची द्योतक आहे. मुक्तेश्वर यापुढेंही जाऊन कित्येक वेळां थोडा फार पांचटपणा करतो हें खरें आहे. पण शकुंतलाख्यानांतील अथवा सभापर्वांतील अशा हाताच्या बोटांवर मोजण्यासारख्या एकाद्या दुसऱ्या उदाहरणानें[२] त्याच्या मनाबद्दल भलतीच अटकळ बांधून, त्याच्या शीलावर शिंतोडे उडविणें, हें जितकें अन्यायाचें आहे, तितकेंच त्याच्या मनाचे अंकुर विषयी कल्पून तत्समर्थनार्थ त्याच्या बापासंबंधींच्या आख्यायिका व त्याच्या पणत्वाला दिलेल्या करवीरकर छत्रपतींच्या सनदेंत उल्लेखलेलें गायनकलेंतील नैपुण्य, बळेंच उकरून काढून पुढें मांडणे,[३] हें निःसंशय आतताईपणाचें आहे. एकाद्या कवीनें अथवा कादंबरीकारानें आपल्या ग्रंथांत चित्रित केलेल्या शृंगारिक प्रसंगावरून वाचकवर्ग जर त्याचें चारित्र्य अजमावूं लागेल, तर बिचाऱ्या लेखकवर्गावर प्रत्यहीं अनवस्था प्रसंग ओढवल्याशिवाय राहणार नाहीं. तशांत एकाद्या शृंगारिक वर्णनें करणाऱ्या कवीचे वडील थोड्या शिथिल वर्तनाचे असले, किंवा त्या कवीच्या मुलास गायनकलेची आवड असली, तर त्याच्या वडिलाच्या सैल वर्तनाच्या व त्याच्या मुलाच्या गायनप्रियतेच्या वडाची साल, त्याच्या शृंगारिक लिखाणाच्या पिंपळाला लावून त्याला माणसांतून उठवूं पाहणें, कितपत योग्य होईल ? मुक्तेश्वराच्या बाहेरख्याली म्हणून समजल्या गेलेल्या वडिलांचे अनुवंशिक गुण, त्याच्यांत उतरले, असा मुक्तेश्वराच्या थोड्या शृंगारिक रचनेवरून तर्क बांधल्यास, त्याचीं अनेक नीतिवचनें,[४] अध्यात्मिक उपमा[५] व रूपकें वाचून, एकनाथांचे अनेक सात्त्विक गुण त्याच्या नातवांत अनुवंशिकतेनें उतरले असले पाहिजेत, असें तरी कां म्हणूं नये ? गायनकला अवगत असणें, हें कांहीं हलकटपणाचें लक्षण नव्हे, व तशी समजूत असती तर, किंवा मुक्तेश्वराच्या वाह्यात वर्तनाचा कै. भाव्यांनीं

---

१ वन–६।२०–२१. २ महाराष्ट्र सारस्वत–भाग १ (आवृत्ती तिसरी) पृ. २८९ आदि–१५।११९. ३ महाराष्ट्र सारस्वत–भाग १ आवृत्ति तिसरी–पृष्ठें ८८–२९०. ४ पहा–पांगारकरकृत कविवर्य मुक्तेश्वर–चरित्र आणि काव्य विवेचन पृष्ठें १११–१२७. ५ वन–२।५८–५९;३।६८; ४।१२६; ८।३६–३९.

केलेला बभ्रा खरा असता तर, करवीरकर छत्रपतींनीं, आमच्या कवीच्या पणत्वास, त्याच्या अंगच्या गायनकलेचा एवढा गौरवपर उल्लेख करून, तेरवाड हा गांव वंशपरंपरेनें इनाम करून दिला नसता. पुनः छत्रपतींनीं आमच्या कवीच्या पणत्वास दिलेल्या सनदेंत[१] आमच्या कवीबद्दल ज्या अर्थी आदराचे उद्गार काढलेले आहेत, त्या अर्थी मुक्तेश्वराबद्दल सर्वत्र आदराची भावना परंपरेनें चालत आली होती, हें उघड दिसतें. ज्या मुक्तेश्वराच्या अपूर्व काव्यगुणामुळें व सात्त्विक वृत्तीमुळें छत्रपतींकडून त्याच्या पणत्वाला योगक्षेमार्थ एवढा गांव इनाम मिळाला, त्याच्या शीलाचा प्रश्न विवेचिला जात असतां, त्याच्या पणत्वाचीच गायनकुशलता आक्षेपकांना विरुद्ध पुराव्यादाखल सांपडावी, हा दैवदुर्विपाक समजला पाहिजे. जगाच्या कल्याणार्थ देह कष्टविणें, या संतत्वाच्या कसोटीस मुक्तेश्वर उतरणार नाहीं, अथवा दा. के. ओक बांधतात तसें[२] एकाद्या सांप्रदायस्थापनेचें श्रेयही त्याच्या पदरीं बांधतां येणार नाहीं. तथापि मुक्तेश्वरानें आपल्या ग्रंथांत जे थोडे उत्तान श्रृंगारात्मक उल्लेख केले आहेत, त्यांवरून तो असत्प्रवृत्त मात्र कदापि ठरत नाहीं. उलट त्याची आनंदी, निरोगी, रसिक व दिलखुलास वृत्तीच अधिक प्रत्ययास येते. तो धार्मिक वृत्तीचा व आस्तिक बुद्धीचा होता, याबद्दल त्याचे ग्रंथ अनेक स्थलीं साक्ष[३] देतात. मुक्तेश्वराच्या भारताचें एकही ठिकाणीं पारायण झालेलें ऐकूं येत नाहीं, याला कै. भावे सुचवितात[४] त्याप्रमाणें तो किंवा त्याचें वर्तन जबाबदार नसून, त्याची सगुण सालंकार व बह्वर्थनिर्भर कविता समजण्याची पात्रता नसणारा निरक्षर बहुजनसमाज अथवा भोळ्या बायाबापड्याच अधिक जबाबदार आहेत, असें म्हटलें पाहिजे.

वर वर्णन केलेल्या मुक्तेश्वराच्या रसिकवृत्तीमुळें व विचक्षणतेमुळें, महाभारताचा अनुवाद करतांना व्यासांची संगति न सोडण्याचें धोरण त्यांस अनेक वेळां गुंडाळून ठेवावें लागलें आहे. आपली वाणी व्यासाश्रयानें जाते, असें तो ठिकठिकाणीं[५] म्हणतो. इतकेंच नव्हे तर व्यासाची संगति सोडून

१ आजगांवकर—महाराष्ट्रकविचरित्र भाग १, पृष्ठें ६३—६४. २ मुक्तेश्वर—विराटपर्व ( १९३९ )—उपोद्घात—पृष्ठ ६. ३ वनपर्व—८।३६; वन—४।२२—२७; वन—९।१८—२२. ४ महाराष्ट्र सारस्वत भाग १ आवृत्ति तिसरी, पृष्ठ. २९०. ५ वन—२।९०; वन—१०।२०५.

दुसऱ्या मार्गानें न जाण्याबद्दलही तो बजावतो.[१] पण जेथें एकादा मनोहर प्रसंग आला, किंवा दुसऱ्या एकाद्या प्राकृत ग्रंथांत थोडी कौतुकवती हकीकत आढळली,[२] तेथें व्यासांना बाजूला सारून आपण पदरचें वर्णन घालतों, असाही तो कबुलीजबाब देतो.[३] अनुवाद करतांना मुक्तेश्वरापुढें हल्लींची प्रचलित महाभारताची प्रत असेलही. पण अमुक गोष्ट व्यासांनीं महाभारतांत सांगितली नाहीं, म्हणून जी गोष्ट तो नवीन सांगतो, तीच नेमकी प्रचलित महाभारताच्या प्रतींत आढळत असल्यामुळें[४] कित्येक वेळां मुक्तेश्वरापुढें असणारी संस्कृत महाभारताची प्रत निराळी असावी अशी शंका येते. मुक्तेश्वराच्या वनपर्वांत येणारी सुरभीकथा[५] महाभारतापेक्षां भिन्न असणें, किंवा दमयंतीच्या कपाळीं महाभारतकारानें वर्णिलेल्या 'पिप्लुरुत्तमः'च्या ठिकाणीं, 'अनर्घ्यमणि' होता असें वर्णन करणें[६] या दोन उदाहरणांवरूनसुद्धां वरील शंका दृढ होण्याकडे मन वाहतें.

दुसरें असें कीं, मुक्तेश्वराला विस्ताराचा बहुधा कंटाळा आहे.[७] वनपर्वासारखें एवढें मोठें पर्व निवळ १८ अध्यायांच्या लहान चौकटींत बसवितांना मूळ ग्रंथांतील अनेक संभाषणें, जरीं तो संपुष्टांत आणतों, तसा लहान लहान आख्यानांचा केवळ नामनिर्देश करून तो त्यांना फांटाही देतो. वनपर्वाच्या दुसऱ्या अध्यायांत येणारा शौनकाचा सुमारें सत्तर श्लोकांचा उपदेश, मुक्तेश्वरानें फक्त सहा ओंव्यांत आटोपला आहे.[८] तर अर्जुनाच्या पाशुपतास्त्रलाभवर्णनानें मूळ वनपर्वाच्या आडविलेल्या तीन अध्यायांना त्यानें फक्त १६२ श्लोकांची गवसणी घातली आहे.[९] मार्कंडेय ऋषीच्या समस्यापर्वानें मूळ वनपर्वाचे व्यापलेले ५० अध्याय (१८२–२३२) अथवा मत्स्योपाख्यान, इंद्रद्युम्नाख्यान, सुकन्याख्यान यांसारखीं आख्यानें वर्णन करणारे अनेक अध्याय, मुक्तेश्वरानें केवळ नामोल्लेखानें संपविले आहेत. अशा सविस्तर कथा वर्णन करीत बसल्यास आपणांस आयुष्य पुरणार नाहीं, व हातीं घेतलेला ग्रंथ आटोपण्याची पंचाईत पडेल,

---

१ सभा–१२।२५२. २ आदि–४१।७२–७३; सभा–७।६०–६१. ३ सभा–९।१६५. ४ वन–१।६२. ५ वन–१।१२४–१४५. ६ वन–८।४८. ७ वन–६।१७; वन–९।२४. ८ वन–१।३४–४०. ९ वन–४.

असें स्पष्ट सांगतांना, महाभारतकथा स्वल्पांत आणण्याची मोरोपंतांप्रमाणेंच त्यानें फार मोठी दक्षता घेतल्याचें उघड होतें.[१]

पण असें हें काटकसरीचें धोरण असलें, तरी मुक्तेश्वराची काव्य-लतिका ज्यावेळीं पल्लवित होते त्यावेळीं, त्याला या गोष्टीचा विसर पडून मुळापेक्षांही सरस व स्वतंत्र प्रसंगकल्पनांची खैरात त्याच्याकडून सहजच होते. प्राचीन मराठी कवींना ' भाषांतरे ' असें हेटाळणीनें अभिधान देणाऱ्यांचे डोळे, मुक्तेश्वरी भारतांतील कल्पनेच्या नवीनतेनें व विशालतेनें आणि रसांच्या अथवा भावनांच्या उत्कटतेनें व सखोलतेनें दिपून गेल्याशिवाय राहणार नाहींत.मुक्तेश्वराचीं व्यक्तिवर्णनें जशीं उदात्त व डौलदार आहेत,तशीं त्याचीं स्थलवर्णनेंही भरघोस व संपन्न आहेत. कोणत्याही प्रसंगांचें वर्णन करतांना, तो प्रसंग जसा तो वाचकांपुढें हुबेहुब उभा करतो, तसेंच कोणत्याही कालाचें अथवा ऋतूचें वर्णन करतांना, वाचकांना विशालकल्पनेच्या विमानांत बसवून प्रसन्न वातावरणांत विहार करण्यास नेतो. ययाति–आख्यानांतील शर्मिष्ठावर्णन,[२] नलोपाख्यानांतील त्यानें केलेलें नलवर्णन[३] अथवा दमयंतीवर्णन[४] अगदीं थोडें असूनही भव्य व त्या त्या व्यक्तीबद्दल असीम आदर उत्पन्न करणारें आहे. युद्ध-प्रसंगाचीं त्याचीं वर्णनें अगदीं कायम ठशाचीं वाटलीं तरी, तसें प्रसंग आपल्या डोळ्यांसमोर होत आहेत, असें भासविणाऱ्या विविध हालचाली तो मोठ्या सूक्ष्मतेनें चित्रित करतो.[५] स्थलवर्णनांत तर मुक्तेश्वराचा हात धरील असा मराठींत दुसरा कवि दिसत नाहीं. स्वर्गाचें[६] त्यानें केलेलें वर्णन जितकें वैभव-संपन्न आहे, तितकेंच तें त्या स्थलाबद्दल वाचकांच्या पवित्र भावना व आकांक्षा वाढविणारें आहे. आदिपर्वांतील त्याचें उषःकालवर्णन,[७] व वनपर्वां-तील त्याचें वर्षाकालवर्णन[८] जितकें स्वतंत्र तितकेंच विशाल आहे. हीं सृष्टि-वर्णनें करतांना, मुक्तेश्वर जीं सुंदर रूपकें[९] योजतो तीं इतकीं नाविन्यपूर्ण व पल्लेदार असतात कीं, त्यांनीं वाचकांचें चित्त उन्नत व स्तिमित व्हावें.

---

१ वन–११।७. २ आदि–१९।१९।–२३. ३ वन–६।४. ४ वन–६।६–१०. ५ वन–३; वन–४।१२०–१२९. ६ वन–५।१८–२०. ७ आदि–३६।६८–८३. ८ वन–१०।१९२–२००. ९ वन–६।२०–२१; वन–६।२८, ३१, ५९, ६२. ७।२५, ४९.

मुक्तेश्वराच्या काव्यांत इतर अलंकारांचा थाट कमीच. त्याचा सर्व भर रूपकांवर. तथापि दमयंतीची पतिनिष्ठा वर्णन करतांना, त्यानें गंगेवर केलेली हेतूत्प्रेक्षा अथवा दमयंतीला भुलून दाही दिशांकडून आलेल्या राजांवर केलेली रूपकयुक्त उत्प्रेक्षा[१] किंवा अरण्यांतील दमयंतीपुढें श्वापदें भ्यालीं असें दर्शवितांना योजलेला काव्यलिंग,[२] मूळ प्रसंगाइतकाच मनोज्ञ आहे.

वरील उत्तुंग कल्पनाप्रमाणेंच उत्कट रसाविर्भावाचे व भावाविष्काराचे अनेक प्रसंग मुक्तेश्वरानें आपल्या काव्यांत वर्णन केले आहेत. नव रस व विविध भाव त्याच्यापुढें असे हात जोडून उभे राहतात कीं, त्यांच्याशीं त्यांस स्वेच्छेनें समरस होतां येतें. मुक्तेश्वर शृंगाररसाचा थोडा भोक्ता असला, तरी करुण, वीर, रौद्रादि[३] इतर रसांनीं ओथंबलेलीं वर्णनें त्याच्या काव्यांत कांहीं कमी नाहींत. दमयंतीचें मदनदशावर्णन[४] थोडें फार सांकेतिक भासलें, तरी तिनें केलेला नलाचा धांवा[५] मुळाहूनही अधिक करुणरमणीय आहे. दमयंतीला सोडून जातांना नलाच्या मनाची विकलता,[६] अशीच वाचकाच्या मनाला पाझर फोडणारी आहे. कौरवांनीं विष्णुयागाच्या वेळीं वनवासी पांडवांना दिलेल्या कुचेष्टेच्या आमंत्रणाला भीमानें पाठविलेलें खोंचदार व जशास तसें उत्तर[७]ही वीररसयुक्त आहे. कोणता कां रस अथवा भाव असेना, त्यांत व्यक्त होणाऱ्या शरीराच्या सूक्ष्म हालचाली मुक्तेश्वरानें साक्षेपानें अवगत करून घेतल्या होत्या. मैत्रेयाच्या उपदेशानें क्रोधाविष्ट झालेल्या दुर्योधनाचें वर्णन[८] दोनच ओंव्यांत पण इतकें वास्तविक वठलें आहे कीं, तसा रागीट दुर्योधन वाचकांपुढें उभाच रहावा! याशिवाय नलोपाख्यानांतील इंद्र–कलि संभाषणांत, इंद्राचें व्यक्त झालेलें मोठें मन,[९] अथवा त्याच आख्यानांत स्त्रियांच्या चंचल प्रकृतीचें त्यानें केलेलें वर्णन[१०] जेवढें सूक्ष्म तेवढेंच मुळापेक्षांही स्वतंत्र व उठावदार आहे.

मुक्तेश्वराच्या काव्यांत कल्पना व भावना यांचा मधुर संगम झाल्यामुळें, इतर कोणत्याही मराठी कवीच्या काव्यापेक्षां, त्याच्या काव्यानें वाचकांच्या

---

१ वन–६।६३. २ वन–७।५९. ३ आदि–१६।१२७–१६०. ४ वन–६।४८–५८. ५ वन–७।१२३–१४७. ६ वन–७।१०९–११७. ७ वन–१३।६०–६३. ८ वन–२।२६–२८. ९ वन–७।६–१०. १० वन–६।२०–२६.

मनावर विशेष मोहिनी पडते. मूळ ग्रंथांतील स्वभाव अथवा प्रसंगवर्णनें अधिक उद्दीपित करण्याकडे त्याचा कल असतो. तथापि कित्येकवेळां मुळांतील सुंदर स्वभावपरिपोषाला अथवा सूचक व मार्मिक संभाषणांना मुक्तेश्वरानें बगल दिल्यामुळें, मुळकथेचें स्वारस्य नष्ट झालें आहे. नल सांपडत नाहीं, असें पाहून त्याला शोधण्यास पाठविलेल्या ब्राह्मणांस करावयास सांगितलेली घोषणा मुळापेक्षांही निराळी व नीरस आहे,[१] तर पर्णादानें केलेली घोषणा ऐकून ऋतुपर्ण कांहीं बोलला नाहीं, असें मूळ भारतांत असतां, त्याच्या तोंडीं घातलेलें भाषण[२] वाच्य व निरर्थक आहे. अशींच कांहीं उदाहरणें, कै. चिंतामणराव वैद्य, यांनीं वनपर्वावरील आपल्या लेखांत[३] ग्रथित केलीं आहेत. या अनुवादांतर्गत अथवा वर उल्लेखिलेल्या कालविपर्यासाच्या दोषां-शिवाय मुक्तेश्वराच्या काव्यांत, वैरस्य उत्पन्न करणारा जो एक दोष अल्प प्रमाणांत कां होईना सांपडतो, तो त्याच्या अनवधानाचा होय. दमयंती सर्व पतिव्रतांत श्रेष्ठ होती असें वर्णन द्रौपदीपुढेंच केलें जात असतांना, पतिव्रतांच्या यादींत द्रौपदीचाही समावेश करण्यांत[४] मुक्तेश्वरानें औचित्याबद्दल फारशी काळजी घेतलेली दिसत नाहीं. असे हे थोडे दोष असले, तरी मुक्तेश्वराच्या मनोरम काव्यानें व त्याच्या अनुपम भाषाशैलीनें मंत्रमुग्ध झाल्यामुळें, वाचकांच्या ते क्वचितच ध्यानांत येतात.

मुक्तेश्वराची शैली गुणवती व ओघवती आहे. प्रसाद हा तिचा सर्व-साधारण गुण असून शृंगारकरुणादि रसवर्णनप्रसंगीं मधुर[५] व वीररसादि रसप्रसंगीं ओजस्वी[६] होऊन, ती त्या त्या रसाला अनुकूल अशी कोमल अथवा कठोर व्यंजनात्मक रचना धारण करते. त्याची वाणी सहज व स्वाभाविकतेनें स्रवणारी असून, वाचकाला नकळत वाहवत नेणारी आहे. अनुरूप रूपकांच्या योजनेमुळें थोडक्यांत अधिक पण परिणामकारक अर्थ व्यक्त करण्याची कला मुक्तेश्वराला साधली आहे.[७] आपल्या कवितेंत ठिक-

---

१ वन–८।७०. २ वन–८।७५. ३ वैद्य यांचे निबंध व भाषणें–पृष्ठें १४९–१५१. ४ वन–६।१६. ५ वन–६।५१–५८. ६ वन–२।२६–२८; वन–२।३९, ४२; वन–६।१२३–१४७; वन–१०।२५, १२२; वन–१३।६०–६३. ७ वन–६।१४१–१४३; वन–१६।३०.

ठिकाणीं उदात्त व परिस्थित्यनुरूप अनुकूल अथवा प्रतिकूल विचार गुंफण्याची संधि तो सहसा वाया दवडीत नाहीं. आदिपर्वातील कुलवतीचें कुलक्षण[१] अथवा वनपर्वातील तीर्थस्वरूप कोण? कोणाचें तीर्थ कोणतें? ब्राह्मणमहत्त्व, स्त्रियांची प्रकृति इत्यादि उल्लेख मुळाहून स्वतंत्र असून कवीच्या एतद्विषयक मताचेच निदर्शक आहेत. अतिशयोक्तीनें[२] अर्थाधिक्य दाखविण्याचें कौशल्यही त्याच्या ठिकाणीं पूर्णपणें दिसून येतें. लेखनशैलीनें लेखकाच्या व्यक्तित्त्वाची पारख होते हें खरें मानलें, तर पाल्हाळाचा कंटाळा असणें, थोडक्यांत अधिक अर्थ विशद करणें, वर्णनांत संपन्नता व उदात्तता आणणें, या मुक्तेश्वराच्या लेखनशैलीच्या वैशिष्ट्यांवरून, तो ठाकठिकीचा नीटनेटका व मोठा डौलदार गृहस्थ असला पाहिजे, अशी कल्पना करण्यास जागा आहे. मुक्तेश्वर कवि असला, तरी आपलें नित्याचें भाषण परिणामकारक व जोरदार करण्यासाठीं, कोणत्या अलंकाराची कशी योजना करावी, हें तो उत्तम जाणत होता असें दिसतें. हा गुण त्याच्यांत उपजतच असून, अभ्यासानें व निरीक्षणानें तो त्यानें वृद्धिंगत केला असावा.

मुक्तेश्वराच्या व्यक्तित्त्वासंबंधीं असा कयास बांधतां आला, तरी त्याच्या कालनिर्णयाची बाब मोठी कठीण होऊन बसली आहे. प्राचीन मराठी कवींमध्यें ज्यांनीं आपल्यासंबंधीं अथवा आपल्या काव्यासंबंधीं कालाचा स्पष्ट उल्लेख केला आहे, असे फार थोडे. अशा कवींचे जन्ममृत्युकाल ठरविण्यास विश्वसनीय साधनें उपलब्ध नसल्यामुळें, संशोधकांना तत्कालीन ऐतिहासिक पत्रव्यवहार, सनदा, दानपत्रें, वृत्तिपत्रें व महजर अशा बाह्य पुराव्यावर अथवा परंपरेनें वाहत आलेल्या प्रवाद–आख्यायिकांवरच सर्व भिस्त ठेवावी लागली आहे. ज्ञानेश्वर–रामदासासारखे जे कवि संत म्हणूनही प्रसिद्धि पावून आपल्या स्वतंत्र सांप्रदायाचे प्रवर्तक बनले, त्यांच्या शिष्यप्रशिष्यांनीं प्रत्यक्ष पाहून अगर परंपरागत हकीकतीवरून त्यांचीं चरित्रें लिहून ठेवल्यामुळें, अशा संतकवींच्या कालासंबंधीं थोडीबहुत तरी निश्चिति झाली आहे. पण एकनाथ–तुकारामासारखे जे संतकवि,

---

१ आदि–१६।९१–१०५. २ वन–५।९२; वन–८।२०१.

भागवत सांप्रदायासारख्या विश्वसांप्रदायाचे प्रवर्तक व प्रसारक बनल्यामुळें म्हणा, विशिष्ट अशी शिष्यपरंपरा मिळवूं शकले नाहींत, त्यांच्या समाधि-कालाबद्दल अगर प्रयाणकालाबद्दल अजूनही तर्कांचा लंब्रक जेथे स्थिर झालेला दिसत नाहीं, तेथे मुक्तेश्वर, रघुनाथपंडित, अथवा वामनपंडित अशा कलाकवींच्या कालनिर्णयाबद्दल अनुमान व हेकेखोरपणा यांचें केवढें पीक पिकलें असेल याची कल्पनाच केलेली बरी. कै. भाव्यांच्या आज सर्वत्र प्रमाण मानल्या गेलेल्या 'महाराष्ट्र सारस्वत' ग्रंथांत, बऱ्याच शिवकालीन कवींना निरुपायानें शाहुकालांत वावरावें लागलें असून, श्रीशिवछत्रति व रामदास यांच्यापेक्षां वयानें कितीतरी वडील अशा मुक्तेश्वरासारख्या प्रसिद्ध कवीच्या कपाळीं, रामदासापेक्षां एक वर्षानें लहान असल्याची चिठी चिकटविली गेल्यामुळें, शिंगें मोडून वासरांत शिरण्याची आपत्ति त्या बिचाऱ्यावर ओढवली आहे. या मताचीच री अलीकडे नवीन संशोधनाच्या नांवाखालीं ओढण्याचा उपक्रम, 'काव्यसंग्रह'द्वारां 'मुक्तेश्वराच्या विराटपर्वाची द्वितीयावृत्ति काढतांना, रा. दा. के. ओक यांनीं आपल्या उपोद्घातांत केल्याचें आढळून आल्यामुळें, या प्रश्नाला थोडी चालना द्यावी लागली आहे.

कोडितकर अत्रे यांच्या दप्तरांतील टिपणवहींत व सरंजामे यांच्या जंत्रींत केलेल्या नोंदीवरून, कै. भावे यांनीं मुक्तेश्वराचा जन्म, पैठणास शके १५३१ (इ. सन १६०९) मध्यें झाला, अशी जी माहिती आपल्या 'सारस्वतां'त दिली आहे, तिलाच पोषक अशी अगदीं नवीन माहिती, रा. ओक यांनीं तंजावर येथील श्रीगोविंदबाळस्वामींच्या मठांतील ग्रंथसंग्रहांत असणाऱ्या सुमारें १००।१५० वर्षांच्या एका जुन्या हस्तलिखित वहींतील नोंदीवरून देण्याचा प्रयत्न केला आहे. ती माहिती अशी कीं, "(१) जनार्दन-स्वामीच्या मातुलाचे पुत्र विसाजीपंत म्हणून कोणी होते. (२) त्यांना तीन मुली होत्या. (३) पहिली एकनाथास, दुसरी सूरोपंतास व तिसरी कमळाकर-पंतास दिली होती. विसाजीपंतानें ह्या कन्या "आप्तकीनें दिधल्या" होत्या. (४) सूरोपंत (सूर्याजीपंत) हे श्रीसमर्थ रामदासाचे तीर्थरूप, व एकनाथ हे त्याचे (रामदासाचे) मावसे. (५) कमळाकरपंत हेही रामदासाचे मावसे. (६) "एकनाथ मावसे समर्थांचे बारशास गंगातिरीं जांब्रगांवास आले होते." या नवीन विधानांवरून समर्थांच्या जन्माच्या सालीं, म्हणजे शके १५३०

(इ. सन १६०८) मध्यें एकनाथ ह्यात होतें, हें रा. ओक यांस दिसून येऊन, एकनाथांनीं मुक्तेश्वराच्या तोंडांत खडीसाखर घालून शुभाशीर्वाद दिल्याच्या आख्यायिकेची संभवनीयताही त्यांना सहजच पटली आहे. शिवाय तंजावरच्या वरील टिपणावरून शके १५३० (इ. स. १६०८) मध्यें जन्मलेल्या रामदासांच्या बारशास ज्याअर्थी एकनाथ हजर होते असें दिसतें, त्याअर्थी रा. ओकांना, एकनाथांच्या सर्वत्र मान्य झालेल्या १५२१ (इ. स. १५९९) या समाधिशकाच्या विश्वसनीयतेबद्दल शंका येऊन, सहस्रबुद्धेकृत एकनाथ चरित्र, आवटेकृत एकनाथमहाराजांच्या अभंगांच्या गाथेची प्रस्तावना, व महाराष्ट्रभाषाभूषण रा. आजगांवकरकृत एकनाथ-महाराज चरित्रांत उल्लेखलेलें खुद्द नाथांचें शके १५२५ (इ. स. १६०३) चें अभयपत्र यांच्या आधारें, शके १५३१ (इ. स. १६०९) मध्येंच एकनाथ समाधिस्थ झाले, ' असें म्हणावें लागलें आहे. '

रा. ओक यांना तंजावर येथील टिपणावरून मिळालेली ही माहिती, एकनाथ मुक्तेश्वर व रामदास यांच्या ज्ञात चरित्रांवर खरोखर मोठाच प्रकाश पाडणारी आहे! तिच्यावरून एकनाथ हे रामदासांचे मावसे व मुक्तेश्वर हे राम-दासांच्या मावसबहिणीचे जसे पुत्र ठरतात; तसेच एकनाथाचे प्रसिद्ध गुरु जनार्दनस्वामीही आपल्या शिष्याचे लांबचे कां होईना, पण श्वशुर ठरतात. कारण जनार्दनस्वामींच्या मामेभावाचीच मुलगी एकनाथांना दिली असल्याचें, वरील नोंद सांगत आहे. शिवकालीं व तत्पूर्वी तंजावर प्रांतीं स्थायिक झालेल्या मराठी कवींची माहिती मिळण्यासाठीं, कै. राजवाडे प्रभृति संशोधकांनीं आतांपर्यंत त्या प्रांतांत पुष्कळ प्रवास केला. पण रा. ओकांनाच हस्तगत झालेली, तंजावर येथील श्रीगोविंदबाळस्वामींच्या मठांतील ही जुनी हस्तलिखित वही, त्या सर्वांची नजर चुकवून इतके दिवस गुलदस्तांत कशी राहिली, याचें मात्र आश्चर्य वाटतें. तंजावर प्रांतीं रघुनाथपंडित, आनंदतनय, गोसावीनंदन अशा मराठी कवींसंबंधीं प्रचलित असलेल्या अनेक आख्यायिका, संशोधकांनीं तिकडून इकडे आणल्या. पण एकनाथ–मुक्तेश्वर–रामदासासारख्या प्रसिद्ध कवींच्या परस्परांतील अगदीं निकटवर्ती अशा या आप्तसंबंधाची कानवार्ताही त्यांना लागूं नये, यावरून प्रसिद्ध पुरुषांचा परस्परांशीं आप्तसंबंध जोडण्याचा हव्यासच कोणीतरी या हस्तलिखित वहीच्या रूपानें पुरवून घेतला असावा,

अशी शंका येते. आणखी असें कीं, या आप्तसंबंधामुळें घडून आलेलें एकनाथ–रामदासांचें हें जवळचें नातें, किंवा समर्थांच्या बारशास एकनाथांचें जांबगांवीं आगमन, या गोष्टीं केशव–महिपतीत्यादि एकनाथांच्या चरित्र-कारांना, किंवा समर्थांच्या कल्याणादि पट्टशिष्यांना व गिरिधरादि चरित्र-कारांना अज्ञात राहिल्या तरी कशा? एकनाथ–रामदासासारखे दोन महा-पुरुष नात्यानें खरोखरीच इतके जवळ असते, तर ही लोभनीय वाटणारी गोष्ट आतांपर्यंत गुप्त राहिलीच नसती; व समर्थांना किंवा त्यांच्या चरित्रकार-शिष्यांना या मोठ्या नात्याचा उल्लेख आपल्या ग्रंथांत कोठें तरी केल्या-शिवायही राहवलें नसतें. पुनः वर उल्लेखलेल्या तंजावर येथील हस्त-लिखित वहींतील नोंदीप्रमाणें, विसाजीपंतांनीं आपली पहिली व दुसरी मुलगी अनुक्रमें ज्या एकनाथ व सूर्याजीपंतांना दिली,त्या दोघांच्या वयांतील अंतर पाहतां, वरील आख्यायिका तर सर्वस्वीं असंभवनीय वाटते. एकनाथांचा जन्म शके १४५० च्या सुमारचा, तर सूर्याजीपंतांचा शके १४९० मधला आहे. म्हणजे विसाजीपंतांच्या या दोन जामातांच्या वयांतील अंतर जर ४० वर्षांचें होतें, तर त्यांच्या या दोन मुलींच्या वयां-मधील अंतरही तसेंच मोठें कल्पावें लागतें. शिवाय या मुली आप्तकीनें दिल्या असल्यामुळें, त्या साधारणतः एक दोन वर्षांच्या फरकानें जन्मलेल्या असून, त्यांचे एकनाथ–सूर्याजीपंतांशीं विवाहही, असेच एकदोन वर्षांच्या फरकानें किंवा एकदमच झाले असावे, असा सर्वसाधारण जो ग्रह वरील नोंद वाचून होतो, त्याला एकनाथ–सूर्याजीपंतांच्या वयांतील मोठ्या फरकानें बाध आल्याशिवाय राहत नाहीं. विसाजीपंतानें आपल्या मुलींसाठीं असे विषमवयाचे वर शोधून काढले असतील, असें वाटत नाहीं. म्हणून रा. ओकांच्या दृष्टिपथांत आलेल्या हस्तलिखित वहींतील या नवीन माहितीस पुराव्याच्या दृष्टीनें फारसें महत्त्व देण्याचें कारण दिसत नाहीं.

पण कांहीं असलें तरी मुक्तेश्वराचा जन्मशक ठरविणें हें एकनाथांच्या समाधिशकाच्या निश्चितीवरच सर्वस्वीं अवलंबून आहे. कारण नाथांच्या प्रयाणकालीं मुक्तेश्वर २५ वर्षांचें होतें, हें ह. भ. प. कै. पांगारकर[१] व

---

१ मुक्तेश्वर,—चरित्र आणि काव्यविवेचन (१९२२).

भारताचार्य कै. वैद्य [१] यांचें मत गृहीत धरल्यास, मुक्तेश्वराचा जन्म, नाथांच्या प्रयाणशकापूर्वी २५ वर्षें झाला होता, असें मानण्यास प्रत्यवाय नाहीं. एकनाथाचा समाधिशक १५४६ अगर १५३१ असा नवनीतकारांनीं वेळोवेळीं जाहीर केला असला तरी

" शालीवाहन पंधरा शतशकीं एकागळे विंशति "

या नाथचरित्रकार केशवबोवांनीं रचलेल्या श्लोकानुसार, अथवा

" **भूबाहू शरचंद्रमा शकविधि क्षेत्रीं तिजा जो क्रमें** "

या श्रीमत्कृष्णदयार्णवांच्या व

" **शके पंधराशें एकवीस। वर्षानाम विकारी त्यास,** "

या राघवकवीच्या प्रमाणोक्तींवरून, शके १५२१ (इ. स. १५९९) हाच एकनाथांचा निर्याणशक, पांगारकर–भावे प्रभृति सर्व संशोधकांनीं मान्य केला आहे. म्हणजे शके १५२१ च्या मागें २५ वर्षें गेल्यास सुमारें शके १४९६ (इ. स. १५७४) हा मुक्तेश्वराचा जन्मशक ठरतो. असें असल्यावर मग रा. ओकांनीं प्रकाशांत आणलेल्या, " एकनाथ समर्थांच्या बारशास गंगातीरीं जांबगांवास आले होते, " या नवीन माहितीस सहजच क्लृप्तीचें स्वरूप प्राप्त होतें.

आतां या जन्मशकांत अनुमानाचा थोडा फार भाग असला, तरी आणखी एका बाह्य पुराव्याचें पाठबळ त्यांस मिळण्यासारखें आहे. कवि मुक्तेश्वरापासून चवथे पुरुष मुक्तेश्वरबुवा गवई, यांना कोल्हापूरच्या छत्रपति संभाजी महाराजांकडून तेरवाड गांव इनाम दिल्याची जी सनद मिळाली आहे, तिचा शक १६४९ (इ. सन १७२७) हा आहे. या सनदेंत मुक्तेश्वरबुवांचा ' बहुत भले भगवद्भक्त, गायनविद्येंत अति निपुण ' असा उल्लेख केला असल्यानें, व सदर इनामही कुटुंबाचा योगक्षेम चालण्यासाठीं व थोरले मुक्तेश्वर कवि यांचा वृंदावनमहोत्सव चालविण्यासाठीं दिलें असल्यानें, तें मुक्तेश्वरबुवांच्या वयाच्या सुमारें ३०।३५ व्या वर्षी त्यांस मिळालें असावें. शिवाय या मुक्तेश्वरबुवांस कोल्हापूरकर छत्रपतींकडून शके १६८१ (इ. सन १७५९) मध्यें दुसरी एक सनद मिळाली असल्यानें, [२] त्यांची

१ वैद्य यांचे निबंध व भाषणें. २ आजगांवकर–कविचरित्र भाग १ पृ. ६४.

युर्मर्यादा मुक्तेश्वर कवीप्रमाणेंच ६०।७० वर्षांची ठरते. म्हणून मुक्तेश्वर-
ास तेरवाड गांव मिळाल्यापासून मागील तीन पिढ्या सरासरीनें प्रत्येकीं
९ वर्षांच्या मानल्यास, शके १६४९ च्या मागें १५०।१५३ वर्षें, म्हणजे
४९६ (इ. सन १५७४) हाच शक येतो, व तोच मुक्तेश्वर कवीचा
मशक मानण्यास प्रत्यवाय नसावा.

आणखी असें कीं, रामदासपंचायतनांतील रंगनाथस्वामी निगडीकर
शके १५३४) यांची जी संतमालिका कै. भावे यांनीं आपल्या 'महाराष्ट्र
ांचे स्फुट संग्रह भाग १' मध्यें छापली आहे, तिच्यांतील कवींचा क्रम
हुतांशीं कालानुसार असावा असेंच दिसतें. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ-
वक, जनार्दन, एकनाथ, रमावल्लभ, नामा पाठक, कान्हो पाठक यांच्यानंतरच
ानाथांनीं मुक्तेश्वरांचा उल्लेख केला असून, अगदीं शेवटीं शेवटीं केशवस्वामी,
काराम, रामीरामदास व वामनस्वामी यांचे नामनिर्देश आहेत, हें विशेष
क्षांत ठेवण्यासारखें आहे. श्रीसमर्थांचा तर या संतमालिकेंत उच्चारही
लेला नाहीं. यावरून ही संतमालिका रामदासांना समर्थत्व येण्यापूर्वीची
सून, रंगनाथांच्या मतानें तरी निदान मुक्तेश्वर रामदासांपेक्षांच काय तर
ष्ठापेक्षांही पुष्कळच वडील असल्याचें सिद्ध करते. रा. ओक म्हणतात
ाप्रमाणें मुक्तेश्वर जर रामदासांपेक्षां एक वर्षानें लहान व समकालीन असते,
र रंगनाथांनीं त्यांचें नांव या संतमालिकेंत आज आहे इतकें वर न घालतां,
काराम, रामीरामदास व वामनपंडितांच्या बरोबरीनें आगेंमागें कोठेंतरी
फलें असतें. यावरून रा. ओकांना दिसून येईल कीं, मुक्तेश्वरांना नमन
रतांना रंगनाथस्वामी त्यांना केवळ पूज्यच मानून राहिले नसून, आपणा-
क्षां किंवा रामदासांपेक्षां किती तरी वडील समजत होते. रा. ओकांनीं
ध्दृत केलेला रंगनाथांच्या संतमालिकेचा पुरावा याप्रमाणें त्यांच्याच उलट
ात असून, मीं वर दिलेल्या शके १४९६ (इ. स. १५७४) या जन्म-
ाकाला मात्र तो चांगलाच उपोद्बलक झाला आहे.

भाषेचें प्रमाणही या कालप्रकरणीं पुष्कळच उपयोगी पडण्यासारखें
आहे. कोणत्याही कवीच्या अगर ग्रंथकाराच्या कालाचा तलास लावतांना
जीं अंतःसाधनें नेहमीं विचारांत घेतलीं जातात, त्यांत त्याच्या भाषेंतील

विशिष्ट व्याकरणप्रयोग, शब्दसंग्रह, म्हणी—संप्रदाय व समाजकालनिदर्शक उपमा-दृष्टांत यांना महत्त्वाचें स्थान दिलें जातें. मुक्तेश्वराची भाषा संस्कृतप्रचुर असली तरी, पंतपंडितांच्या भाषेप्रमाणें क्लिष्ट होण्याइतकी ती जड बनलेली नाहीं. तिनें आपलें शुद्ध मराठी वळण सोडलेलें नसून, शिवकालांत सर्वत्र फैलावलेले फारशी शब्द, तिच्यांत फारच अल्प प्रमाणांत सांपडतात. ज्ञानेश्वरापासून एकनाथापर्यंतच्या वाङ्मयाचा मुक्तेश्वरानें कसून अभ्यास केल्यामुळें, त्याच्या भाषेवर त्यांच्या भाषेचा संस्कार अगर ठसा उमटावा यांत नवल नाहीं. मुक्तेश्वरी भारतांत दळवाडे, त्रिशुद्धि, नावेक, ओजा, सुरवाडले, आराणूक, बरपडे, साउमा असे ज्ञानेश्वरकालीन शब्द जसे सांपडतात, तसेच रोकडा, भबभवित, चवरडोली, झोटधरणी, गदारोळ, अळुमाळ, एकमिळणी, कडोविकडी, असे एकनाथांच्या वाङ्मयांत सर्वत्र भेटणारे शब्दही नेहमीं आपलें तोंड दाखवितात. युद्धप्रसंगासारख्या वर्णनांत तर मुक्तेश्वर एकनाथांच्या अशा वर्णनांचें इतकें हुबेहूब अनुकरण करतो कीं, त्याच्या 'युद्धकदना मिसळले,' अथवा 'खंडविखंड करावे' अशा वाक्यांनीं थोड्याच कालापूर्वी होऊन गेलेल्या त्याच्या आजाच्या वाङ्मयाचा स्पष्ट ठसा त्याच्या वाङ्मयावर पडल्याचा वाचकांना प्रत्यय यावा. त्याशिवाय 'घालिजे,' 'चालिजे,' अशीं कर्मकर्तरी रूपें, 'नातळे,' 'नेदित,' अशीं क्रियापदांचीं अकरणरूपें, 'शस्त्रेंकरून,' 'घनवृष्टीपासाव' अशीं नामाच्या विभक्तिरूपाला जोडलेलीं शब्दयोगीं अव्ययें; 'तुजलागोनि,' 'नमस्कार त्यालागीं,' अशीं द्वितीयेचीं रूपें; 'धर्माहस्तीं,' 'भीमाउदरीं,' असें सामान्यरूप कायम ठेऊन केलेले समास; 'पुरुषवेख,' 'हरिख,' यांत 'ष'बद्दल 'ख,' व 'शिसीं' यांत 'ष'बद्दल 'स' होण्यांत झालेला वर्णाचा फरक; 'चमत्कारला,' 'आकांतली,' अशीं नामक्रियापदें; 'स्वआश्रमा,' 'देवेन्द्र आज्ञेनें' यांत संधि करण्याची केलेली टाळाटाळ; 'आठव आठवणें,' 'शोक शोकणें' अशीं सजातीय कर्मांची योजना; 'सगुणाथिला,' 'बळाथिला,' अशीं भूतकालवाचक धातुसाधितें; इत्यादि शिवपूर्वकालीन अगर शिवकालाच्या प्रथमपादांतील भाषेंत दिसणारें सर्वसाधारण विशेष मुक्तेश्वराच्या भाषेंत जसे सांपडतात, तसेच 'धाविन्नला,' 'झाकिन्नला' अशीं भूतकालाचीं रूपें; 'न वचें' हा शब्दप्रयोग; 'नंतर' बद्दल 'पाठी,' 'कडे' बद्दल 'उजु' व 'पुढें' बद्दल 'पुढारी' शब्दांची

योजना; वर्तमानकालाबद्दल विध्यर्थाचा उपयोग; तृतीयेच्या जागीं प्रथमेच्या एकवचनाची योजना; 'उडोनि भरला,' 'वधिले न वचति;' असे थोडे भिन्न प्रयोग, इत्यादि, ज्ञानेश्वरापासून एकनाथापर्यंत चालत आलेले, पण पुढें शिवकालाच्या शेवटीं शेवटीं लुप्त होत गेलेले भाषाविशेष, मुक्तेश्वराच्या काव्यग्रंथांत दिसत असल्यामुळें, त्याचा लेखनसंसार सोळाव्या व सतराव्या शतकांच्या संधिकालांत थाटला गेला असावा, असें अनुमान निघतें.

मुक्तेश्वराच्या वाङ्मयांत येणाऱ्या जुन्या शब्दांच्या व प्रयोगांच्या बाहुल्यामुळें, कालदृष्ट्या तो लोलिंबराज—सामराजाप्रमाणेंच एकनाथयुगाकडे जसा झुकतो, तसा रामदासयुगाकडे मुळींच झुकत नाहीं. तुकाराम अगर इतर शिवकालीन कवींच्या वाङ्मयांत हटकून आढळणारें फारशी शब्दांचें प्राचुर्य, त्याच्या ग्रंथांत नसल्यामुळें, कोणत्याही शिवकालीन कवीपेक्षां, तो कितीतरी आधीचा व वडील होता, हें सिद्ध होण्यासारखें आहे. तशांत रा. दा. के. ओक म्हणतात त्याप्रमाणें, मुक्तेश्वर जर खरोखरच रामदासापेक्षां एक वर्षानें लहान असता, अगर रामदासांच्या मावसबहिणीचा मुलगा असता, तर इतर अनेक रामदासी कवींप्रमाणें, रामदासांच्या नवीन रामसांप्रदायाचा किंवा त्यांच्या शिकवणुकीचा त्याच्या वाणीवर व विचारसरणीवर स्पष्ट परिणाम झाल्याशिवाय राहिला नसता. शिवाय कालविपर्यासाचा दोष पत्करूनही आपल्या काव्यांत स्वकालीन उल्लेख करण्याच्या त्याच्या संवयीस अनुसरून आपल्यापेक्षां वडील अशा रामदासांच्या प्रचंड सांप्रदायउभारणीच्या कार्याचें, किंवा शिवाजी महाराजांनीं पुढें केलेल्या अफझुलखानवधासारख्या अनेक रोमहर्षक प्रसंगांचें शब्दचित्र रेखाटण्याचा मोहही त्यांस आवरतां आला नसता. याच्या उलट, तुकाराम, समर्थ व शिवछत्रपति यांसारख्या गाजलेल्या विभूतींचा नामनिर्देश चुकूनही त्याच्या वाङ्मयांत ज्या अर्थी येत नाहीं, त्या अर्थी मुक्तेश्वराला त्यांचा समकालीन म्हणणें धाडसाचें होणार नाहीं काय ?

वरील विधानांना पोषक अशीं, कै. इतिहासाचार्य राजवाडे यांनीं मुक्तेश्वराच्या कालासंबंधीं पूर्वी 'ग्रंथमालेंत' केलेलीं खालील विधानें बरींच मार्गदर्शक झाल्यावांचून राहणार नाहींत. "मुक्तेश्वर आपल्या आदिपर्वाच्या पंधराव्या अध्यायांत व सभापर्वाच्या आठव्या अध्यायांत, 'क्रूर फिरंग्यांचा' व 'दंडेल्या इंग्रजांचा' उल्लेख करतो. इ. सन १६६० च्या सुमारास,

इंग्रज लोक, इ. सन १६३०।४० पेक्षां अधिक सभ्यपणा व माणुसकी दाखवूं लागले होते. यावरून वरील 'दंडेल' वगैरे विशेषणांना पात्र ठरण्याच्या काळीं, म्हणजे इ. सन १६६० पूर्वी त्यानें आपलें भारत रचिलें असावें. त्याचप्रमाणें 'मुक्तेश्वर जसा इंग्रज, पोर्तुगीज, डच, पठाण इत्यादि परकीयांचा उल्लेख करतो, तसा तो फ्रेंच लोकांचा एकदांसुद्धां करीत नाहीं. फ्रेंचांची पहिली वखार इ. सन १६६८ मध्यें सुरतेस स्थापली गेली. त्या अर्थी फ्रेंचांच्या आगमनापूर्वीच मुक्तेश्वरीभारत रचलें गेलें असावें." या दोन बिधानांनीं मुक्तेश्वरी भारताचा काल, कै. राजवाड्यांनीं, इ. सन १६५० हा ठरविला असून, कै. पांगारकरांनींही त्याला आपला पाठिंबा दिला आहे.[१] पण रा. ओक व कै. भावे यांच्या मताप्रमाणें मुक्तेश्वर जर रामदासांचा किंवा शिवाजी महाराजांचा अगदीं समकालीन असता, तर इतर अनेक शिवकालीन कवींप्रमाणेंच परकीयांच्या आगमनाचा उल्लेख करण्याचें त्याच्या मनांतही आलें नसतें. परकीयाच्या आगमनाची जी प्रत्यक्ष परिस्थिति त्याच्या कानावर आली, तिचाच त्याच्या स्वभावानुसार त्यानें चट्‌कन उल्लेख करून टाकल्यामुळें, मुक्तेश्वराच्या कालनिर्णयाचा तो एक महत्त्वाचा दुवा होऊन बसला आहे. पुनः "रामदासांच्या पुढयांतल्या कवींचीं नांवें मुक्तेश्वरी भारतांत नाहींत. तुकारामाचाही नामोल्लेख नाहीं, फक्त ज्ञानेश्वर, एकनाथ व जनार्दनस्वामी यांचेच केवळ उल्लेख आहेत. तुकोबा इ. स. १६४९ सालीं स्वर्गाला गेले व त्यांची कीर्ति पैठणपर्यंत जाण्यापूर्वीच मुक्तेश्वर आटोपले होते;" या कै. राजवाड्यांच्या पुढील बिधानांनीं तर मुक्तेश्वराच्या कालाच्या अंतिम मर्यादेवर बराच प्रकाश पडण्यासारखा आहे. कारण तुकारामासारख्या महान् भगवद्भक्ताच्या सदेह स्वर्गगमनाच्या सोहळ्याची खबर, मुक्तेश्वर हयात असता तर त्याच्या कानावर न जाणें जितकें अशक्य होतें, तितकेंच ती ऐकून तिचा नामोल्लेखही न करण्याइतका मनाचा अनुदारपणा त्याच्यासारख्यानें दाखविणेंही केवळ असंभाव्य होतें. मात्र तुकारामांच्या सदेह स्वर्गवासाची वार्ता मुक्तेश्वराच्या कानीं जाण्यापूर्वीच मुक्तेश्वर आटोपले होते, असें गृहीत धरल्यास, ते इ. स.

---

१ मुक्तेश्वर—चरित्र व काव्यविवेचन पृष्ठ ३१.

१६४९ पूर्वीच एक दोन वर्षे तरी आटोपले असले पाहिजेत, व त्यापूर्वीच त्यांनीं आपलें महाभारत रचिलें असल्यामुळे, कै. राजवाडे म्हणतात तो इ. स. १६५० हा मुक्तेश्वराच्या भारतरचनेचा काल योग्य दिसत नाहीं. म्हणून मुक्तेश्वर इ. स. १५७३–७४ सालीं जन्मले असावे, त्यांनीं आपलें भारत इ. स. १६४० पर्यंत रचलें असावें, व ते इ. स. १६४५–४६ च्या सुमारास स्वर्गवासी झाले असावे, असाच वरील विवेचनाचा समन्वय करावा लागतो.

मुक्तेश्वराच्या सर्व रचनेंत त्याच्या भारतानें कवित्वाच्या व शैलीच्या बाबतींत उत्कर्षबिंदु गांठला आहे. अर्थातच ही रचना त्याच्या बुद्धीच्या परिणतावस्थेंत म्हणजे उतारवयांत झाली असें मानल्यास, इ. स. १६४० हा काल, वरील गोष्टीशीं जुळण्यासारखा आहे. कारण मुक्तेश्वर यावेळीं ६५।६६ च्या घरांत होते. इ.स. १५९९ सालीं झालेल्या एकनाथांच्या वैकुंठ-वासाच्या सुमारास, २०।२५ वर्षांचा असणाऱ्या मुक्तेश्वरानें, त्यांना ग्रंथ-रचना करून दाखविली असें गृहीत धरून, कै. वैद्य, मुक्तेश्वरी भारताचा रचनाकाल स्थूलमानानें इ. स. १६०० मानतात.[1] माझ्या मतें हा काल, मुक्तेश्वराच्या आरंभींच्या म्हणजे 'संक्षेप रामायणा'च्या रचेनचा असावा. 'मुक्तेश्वराचें भारत, आपला महाराष्ट्र स्वराज्योन्मुख झाला त्यावेळचें आहे, व त्यावेळीं महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांच्या हृदयांत ज्या उच्च मनोवृत्ति उचंबळत होत्या, त्याचें प्रतिबिंब त्याच्या भारतांत लख्ख पडलें आहे; अशा प्रकारचीं विधानें कै. पांगारकर यांनीं प्रस्तुत कालप्रकरणीं केलीं आहेत.[2] पण आदिपर्वांतील शकुंतलाख्यान अथवा सभापर्व अध्याय आठ, यांतील ज्या वर्णनांवरून तीं काढण्यांत आलीं आहेत, तेथील संदर्भ पाहतां, तीं बरींच अतिशयोक्तीचीं व ओढाताणीचीं वाटतात. 'गोवध देव ब्राह्मण अवज्ञा। करिती त्यांतें करी शूळदंड।' असें दुष्यंताच्या धर्मप्रवण राज्यकारभाराचें वर्णन करतांना, मुक्तेश्वरापुढें शिवाजीमहाराजांच्या कारकीर्दीचा उषःकाल होता असें म्हणण्यापेक्षां, स्वकालीन मुसलमानी छळाचें उग्र स्वरूपच अधिक

१ वैद्य यांचे निबंध व भाषणें. २ पांगारकर–मुक्तेश्वर–चरित्र व काव्यविवेचन पृ. ३२.

होतें, असें म्हणणें अधिक सयुक्तिक व सुसंगत आहे. विजापुरच्या अदिलशाही अंमलाखालीं दडपून जाऊन हैराण झालेल्या हिंदुप्रजेला, त्यांतून आपली सुटका कधीं होईल अशी उत्कंठा वाटत असली, तरी गोब्राह्मणप्रतिपालक मराठा राजा आतां खात्रीनें होणार अशी दृढ श्रद्धेची भविष्यवाणी त्यांतून निष्पन्न होते असें वाटत नाहीं. तसेंच मुक्तेश्वरानें आपल्या रामायणाच्या युद्धकांडाच्या शेवटीं महाराष्ट्राचा

'महाराष्ट्र जे सर्व राष्ट्रासि राजे,
जयाच्या भयें व्यापिले देव लाजे, ।
सदाचारभंगें पळाली प्रतिष्ठा,
प्रतिष्ठान त्या नाभिकारीत निष्ठा ॥'

असा जो गौरवपूर्ण उल्लेख केला आहे, तो त्याच्या पूर्व वैभवाबद्दल असून, आपल्या कालीं महाराष्ट्रांत सदाचाराचा लोप होऊन देशाची प्रतिष्ठा कशी गेली, याबद्दल खेदोद्गारच त्यानें काढले आहेत. अशा दुःस्थितींत कै. पांगारकर म्हणतात त्याप्रमाणें,गोदातीरीं पैठणास मुक्तेश्वराला मराठा राजा असावा असें वाटत नसून, मुसलमानी अंमलाखालीं सदाचारभ्रष्ट व कर्तव्यच्युत झालेल्या महाराष्ट्राला आपल्या आजाच्या वसतीनें पावन झालेलें पैठण, आश्वासन देऊन निष्ठेचा मार्ग दाखवील असा, आपल्या जन्मभूमीचा अभिमानच सांगावयाचा होता, असें स्पष्ट दिसतें. सारांश मुक्तेश्वराच्या ग्रंथांत स्वराज्योन्मुख महाराष्ट्राचें चित्र नसून, मुसलमानी सत्तेनें गांजलेल्या मनःस्थितीचेंच प्रतिबिंब पडलेलें आहे. मुक्तेश्वरी काव्यग्रंथाची रचना शिवाजी महाराजांच्या जन्मापूर्वी अथवा ते अगदीं अल्पवयी असतां झाली असल्यामुळें, 'त्यांच्या चळवळी पैठणपर्यंत मुक्तेश्वराच्या काळीं पोंचल्या नव्हत्या,' हें कै. राजवाड्यांचें विधान खरें वाटतें. स्वतःसंबंधीं फारशी माहिती न देणाऱ्या पण कालविपर्यासाचा दोष पत्करूनही स्वकालीन राजकीय व सामाजिक परिस्थितीचें प्रतिबिंब आपल्या ग्रंथांतून पाडणाऱ्या त्याच्यासारख्या कवीनें केलेले विशिष्ट उल्लेख, संशोधकांनीं अनुकूल अगर प्रतिकूल अशा पूर्वग्रहापासून सर्वथा अलिप्त राहून निर्विकार मनानेंच पारखून घेतले

पाहिजेत. मुक्तेश्वरानें केलेले ‘ भिंदिपाळ ’ इत्यादि शस्त्रांचे उल्लेख[1] जसे त्याच्या एकनाथी वाङ्मयाच्या परिचयाचे निदर्शक आहेत, तसाच ‘ कर्णाटक-यंत्राचा ’ त्यानें केलेला उल्लेख[2] मुलुखमैदानसारख्या तत्कालीन विजापूरच्या तोफांचा निदर्शक असणें शक्य आहे. यावरून मुक्तेश्वर एकनाथकालाला जसा जवळचा, तसा शिवपराक्रमापूर्वी सर्वत्र थैमान घालणाऱ्या मुसलमानी अंमलालाही अगदीं निकटचा असाच भासतो.

वरील अंतर्बाह्य पुराव्यांच्या आधारें केलेल्या विवेचनानें मुक्तेश्वराच्या कालाची आदि व अंतिम मर्यादा बहुतेक ठरल्यासारखीच झाली असून, कोडितकर अत्रे यांच्या दप्तरांतील टिपण वहीवर व सरंजामे यांच्या जंत्रीवर विसंबून कै. भाव्यांनीं आणि तंजावर येथील गोविंदबाळस्वामींच्या मठांतील कोणत्या तरी वहींतील नोंदीवर विश्वासून रा. दा. के. ओक यांनीं, मुक्तेश्वर रामदासापेक्षां एक वर्षानें लहान व समवयस्क असा जो गैरसमज प्रसृत केला आहे, त्याला बराच आळा बसेल अशी आशा आहे. तथापि महाराष्ट्रांतील अभ्यासक या वादांत कोणत्या बाजूनें आपला कौल देतात, यावरच हा प्रश्न अवलंबून असल्यामुळें, त्यांच्याच चिकित्सक बुद्धीला आवाहन करणेंच युक्त होय.



---

१ वन–१५।१८७. २ वन–१५।१८७.

# वामनपंडित : २

एकाद्या कवीनें अथवा ग्रंथकारानें आपल्या कालासंबंधीं व चरित्रासंबंधीं एकवेळ कसलेही उल्लेख आपल्या ग्रंथांत न केले तरी चालतील, पण त्याची कविता अगर ग्रंथ मात्र अगदीं निर्भेळ स्वरूपांत उपलब्ध होणें जरूर आहे. कवीच्या काव्यांत अगर ग्रंथकाराच्या ग्रंथांत त्याचें मन व व्यक्तित्त्व प्रतिबिंबित झालेलें असतें. परंतु जेथें मूळ काव्य किंवा ग्रंथच प्रक्षिप्त भागांनीं बुजबुजलेला असेल, तेथें मूळ कवीच्या अथवा ग्रंथकाराच्या अंतरंगाचें दर्शन तरी वाचकांना कसें होणार? प्राचीन मराठी वाङ्मयांत असे किती तरी कवी आहेत कीं, ज्यांनीं आपल्या काव्यकृतींत आपल्या चरित्राबद्दल व कालाबद्दल मोठ्या कटाक्षानें मूकताच स्वीकारली आहे. त्यांच्या काव्यग्रंथांची तर अशी शोचनीय अवस्था आहे कीं, या कवींच्याच खुद्द शिष्यांच्या, अनुयायांच्या व कवीचेंच नामाभिधान धारण करणाऱ्या तत्कालीन इतर कवींच्या, मूळ कविकृतीच्या धर्तीवर रचलेल्या अनेक प्रकरणांची कालांतरानें त्यांत बेमालूम भर पडल्यामुळें, मूळ कवीच्या कृतीचा आस्वाद व त्याच्या अंतरंगाचा ठाव घेणेंही अभ्यासकांना मोठें मुष्कील व्हावें. यांतील कांहीं प्रक्षेपक तर इतके पुढें गेले आहेत कीं, त्यांनीं आपलीच रचना मूळ कवीच्या तोंडीं घालून ती त्याच्या नांवावर विकली जावी, अशी मोठी कौशल्यपूर्ण योजना करतांना, मूळ कवीलाच पुरता गाडून टाकला आहे. एकट्या तुकारामाचाच अभ्यास करावयाचा म्हटल्यास, मुख्य अडचण अशी येते कीं, त्याच्या अभंगांच्या कोणत्याही प्रचलित गाथ्यांत, त्याच्या शैलीचें व विचारसरणीचें हुबेहूब अनुकरण करणाऱ्या तत्कालीन तुकयाबंधु, तुकाविप्र इत्यादिकांच्या अभंगांच्या सरमिसळीनें, मूळ तुकामाराची सोज्वळ अभंगवाणी निखालस गढूळ होऊन, त्याच्या अंतरंगाचीच काय, पण त्याच्या चरित्रांतील ठळक गोष्टींची व मागून उपस्थित झालेल्या तुकारामशिवाजी भेटीसारख्या कांहीं वादग्रस्त ऐतिहासिक मुद्यांचीही, स्पष्ट शहानिशा करण्यास ती पूर्णपणें असमर्थ व्हावी.

वामनाच्या किंवा वामनपंडिताच्या काव्याची कथा याहून कांहीं निराळी आहे, असें नाहीं. महाराष्ट्रांतील आबालवृद्धांना सारखाच प्रिय असणाऱ्या या कवीनें, आपल्या काव्यग्रंथांत स्वतःसंबंधीं अगदीं त्रोटक उल्लेख केले असल्यामुळें, त्याच्या चरित्राबद्दल वाचकांना जितकी हळहळ वाटते, तितकीच किंबहुना अधिक निराशा, वामनासारखीच तंतोतंत रचना करणाऱ्या तत्कालीन इतर 'वामनां'च्या व त्याच्या शिष्यांच्या कृतींची, त्याच्या मूळ कवितेंत नुसती परवड उडून तिचें अस्तित्व शंकित झाल्यामुळें वाटूं लागली आहे. तसें पहावयास गेलें तर वामनपंडितांची माहिती रामदासी-चरित्र-काराकडून जेवढी मिळते, तेवढी अन्यत्र कोठेंच मिळत नाहीं. श्रीसमर्थ रामदासस्वामींचे शिष्य बखरकार हनुमंतस्वामी, व 'दासविश्रामधाम'-कर्ते आत्मारामस्वामी [1] यांनीं आपल्या गुरूंचा गौरव करतांना अनुक्रमें 'यथार्थदीपिकाकार' वामनपंडिताचा व 'पंचसुधा'कार आणि कीर्तनकार वामनपंडिताचा उल्लेख केला असून, 'श्रीसमर्थप्रतापां'त गिरिधरस्वामींनीं,[2] परमार्थांत विक्रम करून दाखविणाऱ्या व ऱ्हस्वत्वामुळेंच समर्थांकडून 'वामन' असें सार्थ नांव मिळालेल्या समर्थशिष्य महंत वामनास समर्थांकडे घडलेल्या दुसऱ्या भोजनसमारंभांत तुकोबांच्या पंक्तीसच बसविलें आहे.[3] श्रीसमर्थ-चरित्रकार उद्धवसुतानें मात्र थोडी मौज केली आहे. श्रीशिवाजी महाराजांनीं समर्थांच्या आज्ञेनें परळी गडावर घातलेल्या लक्षभोजनसमारंभास आमंत्रिलेल्या साधुपुरुषांच्या यादींत वामनस्वामी [4] होते, व तेथेंच त्यांनीं अध्यात्म-निरूपण व गीता भागवतपुराण सांगितलें [5] असें वर्णन करतांना, प्रथम 'वामनस्वामी' असें गौरवपूर्वक म्हणणारा हाच ग्रंथकार, पुढें त्यांच्याच कीर्तनप्रसंगाचें व पद्यगायनाचें कौतुक समर्थांच्या तोंडून वदवितांना मात्र

---

१ दासविश्रामधाम–३७।२६. २ श्रीसमर्थप्रताप–१०।६७. ३ श्रीसमर्थ-प्रताप–१७।११. ४ वामनस्वामी, जयराम। रंगोबा स्वामी, तुकाराम॥ रंगनाथ, निंबराज परम। सिद्ध अनंत मौनी॥'–श्रीसमर्थ रामदास चरित्र–अध्याय ४६. ५ 'या उपरी वामन स्वामीचें। अध्यात्म निरूपण पंडितांचें। गीता भागवत पुराणाचें। मतें मतांतर बोलत'॥–श्रीसमर्थ रामदास चरित्र–अध्याय ४६.

'स्वामी म्हणती धन्य धन्य । ज्ञान तुझें वामना ॥'[१] असा त्यांच्या नांवाचा एकेरी उल्लेख करतो. यावरून रा. दा. के. ओक[२] म्हणतात त्याप्रमाणें, उद्धवसुत येथें, गिरिधरस्वामींनीं वर्णिलेल्या समर्थशिष्य ऱ्हस्व वामनाचा उल्लेख करीत नसून, वामनस्वामींना एकेरी नांवानीं संबोधण्याइतके आपले गुरु मोठे होते, असा रामदासांचा वरचष्माच तो सिद्ध करीत आहे, हें स्पष्ट दिसतें. शिवाय "राजा म्हणे परम पावन । नाम वामन जाणिजे" ॥ या उद्धवसुतानें शिवछत्रपतींच्या तोंडीं घातलेल्या उद्गारावरून, 'हा ऱ्हस्व (ठेंगणा) आहे' असा राजांच्या मनांतील अर्थ हेरण्यांत रा. ओक घसरले असले, तरी गिरिधरस्वामी वर्णितात तसा समर्थशिष्य ऱ्हस्व वामनमहंत तत्कालीं नसेल असें मात्र म्हणवत नाहीं. समर्थांच्या सर्व चरित्रकारांनीं आपल्या गुरूचा महिमा सांगण्याच्या जोषांत वामनस्वामींना त्यांचें अंकित बनविलें आहे, ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. तथापि या सर्व चरित्रकारांच्या व विशेषतः उद्धवसुताच्या ग्रंथावरून, वामनपंडित अथवा वामनस्वामी ही व्यक्ति समर्थकालीं पांडित्य व अध्यात्म यांत इतकी गाजलेली दिसते कीं, आपल्या सांप्रदायिक गुरूचीं चरितें लिहितांना, या सर्व ग्रंथकारांना एकीकडे त्यांचें नांव टाळणें अशक्य झाल्यामुळें, तर दुसरीकडे त्यांच्या नामोल्लेखानें आपल्या गुरुमाऊलीचें महत्त्व कमी होईल या भीतीनें, पंडितानांच उलट रामदासांचे दुय्यम बनविणें भाग पडलें आहे. अशी ही थोडी मखलाशी झाली असली, तरी यापुढील श्रीधर,[३] महिपती[४] व मोरोपंत[५] यांनीं आपापल्या ग्रंथांत वामनाला 'वामनस्वामी' या अभिधानानेंच गौरवून अनुक्रमें त्यांच्या श्लोकरचनेची, दशमस्कंद भागवतरचनेची व श्रीपतिभक्तिरसज्ञतेची तारीफ केली असल्यामुळें, या तीन ग्रंथकारांची तरी निदान, भागवत दशमस्कंदाचे व यथार्थदीपिका इत्यादिकांचे कर्ते वामनस्वामी ही एकच व्यक्ति होय, अशी खात्री होती, हें सिद्ध होतें.

कै. इतिहासाचार्य राजवाडे यांनीं आपल्या लेखांत[६] वामनस्वामी भागवतकार व वामनस्वामी रामदासी यांचा जो नामनिर्देश केला आहे,

---

१ श्रीसमर्थ रामदास स्वामींचें चरित्र—४६।३४।३५. २ वामन पंडितकवितासंग्रह भाग २ उपोद्घात, पृ. ६. ३ रामविजय—१।६४. ४ संतविजय—१०।१६. ५ सन्मणिमाला. ६ सरस्वति मंदिर, वर्ष ६.

त्यापैकीं, पहिले वामनस्वामी भागवतकर हे, श्रीधरमहिपतिमोरोपंतांनीं उल्लेखलेलेच प्रसिद्ध यथार्थदीपिकाकार वामनस्वामी असून, दुसरे वामनस्वामी रामदासी हे, गिरिधरस्वामींनीं वर्णिलेला समर्थशिष्य ऱ्हस्व वामन महंत असावा, असें आतां वरील हकीकतीवरून समजण्यास हरकत नाहीं. पण 'काव्यसंग्रहां'त प्रसिद्ध झालेल्या वामनपंडितांच्या कवितेंत वामनानें स्वत:संबंधीं केलेल्या उल्लेखावरून, लक्ष्मीनृसिंहपंडितसुत शांडिल्य गोत्री [१] व वशिष्ठ गोत्री [२] असे आणखी दोन वामन जसें उमगून आले, तसेंच आज वामनाच्या नांवावर मोडली जाणारी कविता एकाच वामनाची नाहीं, इतकेंच काय, पण ती दुसऱ्याच अनेक कवींच्या काव्याचें कडबोळें आहे, हेंही समजून चुकल्यामुळें, वामनाच्या अनेकत्वाच्या या वादास अधिकच फांटे फुटून कै. बाळकृष्ण अनंत भिडे, यांच्यासारख्या चिकित्सक विद्वानास, आपल्या निबंधांत, [३] (१) यथार्थदीपिकाकार वामन, (२) शांडिल्य गोत्री वामन, (३) वशिष्ठ गोत्री वामन, (४) शृंगारप्रिय वामन, व (५) यमक्या वामन असे पांच वामन स्थापन करण्याचा मोह झाला. आज वामनाच्या अभ्यासकाला त्यामुळें, मूळ वामन कोण, कोणत्या गोत्राचा, त्याचे ग्रंथ कोणते, त्याचा निश्चित काल कोणता, यांबरोबरच, दुसरे वामन किती व त्यांची कविता कोणती, हेच प्रश्न प्रामुख्यानें सोडविल्याशिवाय मात्र गत्यंतर नाहींसें झालें आहे.

वामन कवीच्या अनेकत्वाबद्दल याप्रमाणें कोणाच्या कांहींही कल्पना असल्या, किंवा त्याच्या चरित्राबद्दलचे उल्लेख त्याच्या ग्रंथांत सांपडत नसले, तरी त्याच्या आयुष्यांतील अत्यंत आनंददायक व संस्मरणीय अशा मलयाचलावरील गुरूपदेशाचा उल्लेख, ज्या अर्थी त्यानें आपल्या निगमसार, [४] यथार्थदीपिका, [५] गीतासमश्लोकी, [६] अनुभूतिलेश, [७] सिद्धांतविजय, [८] कर्मतत्व, [९] व

---

१ वामनपंडितांचा कवितासंग्रह—भाग १—भीष्म युद्ध—श्लो. २१. २ वामन पंडितांचा कवितासंग्रह भाग १—रामजन्म—श्लो. ४८; वामनपंडित—कवितासंग्रह—भाग—३—सिद्धांतविजय श्लो. ५६०. ३ भिडे—वामनपंडित. ४ निगमसार—१।७—२४; ९।१५८. ५ यथार्थदीपिका—१।८; ६।१०२४—१०२५; १८।१५—१७. ६ गीता समश्लोकी—१८।१७—१९। उपसंहार. ७ अनुभूतिलेश—१४६. ८ सिद्धांतविजय—६. ९ कर्मतत्त्व—१।४—५.

सद्‌गुरूची आरती [१] या कृतींत सारखाच केलेला आढळतो, त्या अर्थी हे सर्व ग्रंथ एकाच वामनाचे किंवा वामनस्वामीचे आहेत, हें स्पष्ट आहे. पुनः राजाराम प्रासादीनें आपल्या भक्तमंजरीमालेंत [२] व सदानंदाचा शिष्य सच्चिदानंदसुत यानें आपल्या ' अनुभवसारां 'त [३] उल्लेखलेल्या वामनाच्या ' शेषे ' या उपनांवास ज्या अर्थी त्याच्या यथार्थदीपिकेंत व इतर भागवती प्रकरणांत ' शेषपर्यंक ', [४] शेषशायी, [५] इत्यादि श्लिष्ट पदांनीं पुष्टि मिळते, आणि वरील ग्रंथांपैकीं 'सिद्धांतविजयां 'त [६] अथवा 'रामजन्म—सीतास्वयंवर' [७] या दोन रामायणी प्रकरणांत त्याच्या वशिष्ठ गोत्राचाही निर्देश सांपडतो, त्या अर्थी वरील सर्व अध्यात्मिक ग्रंथांचा व रामजन्म—सीतास्वयंवर या प्रकरणांचा कर्ता जो वामनस्वामी, तोच ' शेषे ' आडनांवाचा वशिष्ठ गोत्री वामन, हेंही निःसंशय ठरतें. कै. भिड्यांनीं वामनस्वामींची यथार्थदीपिकेसारखी भक्तिवेदांतप्रधान रचना पाहून, राधाभुजंग, रासक्रीडा, राधाविलास, अशा श्रृंगारिक प्रकरणांची विरोधी रसात्मक रचना एकाच कवीच्या हातून होणें शक्य नाहीं, अशी आपली समजूत करून घेतली आहे. पण केवळ वरवरच्या रसभिन्नतेच्या मुद्द्यावर अधिक जोर न देतां, त्यांनीं जर प्रस्तुत शृंगारिक प्रकरणांच्या भाषासरणीची व विचारसरणीची, वामनाच्या वरील रामायणी व इतर भागवती प्रकरणांच्या भाषासरणीशीं व विचारसरणीशीं तुलना करून पाहिली असती, तर त्यांतील साम्य त्यांच्या लक्षांत येऊन श्रृंगारप्रिय वामनाचा तृतीयपंथ त्यांना उभारावा लागला नसता. पुनः ज्या कै. भिड्यांना अनुक्रमें नृहरिदर्पण व सीतास्वयंवर, किंवा कंसवध व सीतास्वयंवर यांतील विलक्षण वर्णनसाम्य पटून, हीं दोनी तिनी काव्यें

---

१ वामनपंडित कवितासंग्रह भाग २ (द्वितीयावृत्ति) पृ. २८६. २ भक्तमंजरीमाला—३९।३४. ३ ' येविषयीं युक्तिप्रयुक्ति । ' चित्सुधा ' ' राजयोगा ' दि ग्रंथीं । **श्रीवामन शेषे** बहुधा युक्ति । श्रीसच्चिदानंद कृपें बोलिलें ' ॥. ४ ' ऐसी श्रीमद्भगवद्गीतेची टीका । नाम जीचें यथार्थदीपिका । तूज समर्पित हो शेषपर्यंका ! । श्रीवत्सांका ! वामन म्हणे ' ॥—यथार्थदीपिका —१०।९१०. ५ मृत्तिकाभक्षण—२२; चरमगुरुमंजरी—१७४. ६ सिद्धांत-विजय—श्लो. ५६०. ७ रामजन्म—६८; सीतास्वयंवर—९२.

एकाच वामनाचीं असें वाटलें, अथवा निवळ भाषासरणीच्या साम्यावरून 'गजेंद्रमोक्ष' व 'वामनचरित्र' हीं प्रकरणेंही वशिष्ठ गोत्री वामनाचींच असा त्यांनीं अंदाज बांधला,[१] त्याच भिड्यांनीं जर याच प्रकरणांच्या भाषासरणीशीं प्रस्तुत राधाभुजंगादि शृंगारिक समजल्या जाणाऱ्या प्रकरणाची भाषासरणी तुलली असती, तर वरीलप्रमाणेंच वर्णनसाम्याचा व भाषासाम्याचा साक्षात्कार त्यांस पटून, हीं शृंगारिक प्रकरणेंही यथार्थदीपिकाकार वशिष्ठ गोत्री वामनाचींच असें छातीठोकपणें त्यांना प्रतिपादन करतां आलें असतें. रसानुकूल, नादवती व सहजानुप्रासात्मक वर्णरचना; अंबुजेक्षणी–अंबु जे क्षणीं, अपूतनारी–पूतनारी, गायनाचे–गाय नाचे, कथारे–थारे, नाना–तनाना; अशीं नित्याचीं आवडतीं यमकें; शृंगाराची वेदांतांत परिणति; स्वभावोक्ति; अलौकिकाला लौकिकस्वरूप देण्याची वर्णनपद्धति; सिद्धांतप्रतिपादनांत कोटिक्रमपद्धतीची किंवा पूर्वपक्ष–उत्तरपक्षाची योजना; मोहरीला, वैखरी, अजाला, झणी, अशा आवडत्या शब्दांबरोबरच, कांजी, बईल, दावें, अंबिल, दसोडी, दादला अशा ग्राम्य शद्बांची योजना; घट-मृत्तिका, पट–तंतु, अलंकार–सुवर्ण, शुक्ति–रजत इत्यादिकांचे ठराविक नैय्यायिक दृष्टांत व मंगलाचरणांतच पुढील आख्यानाचा येणारा सारांश; हे वामनी काव्याचे अगदीं सर्वसाधारण विशेष जेथें वामनस्वामीच्या अध्यात्मिक, रामायणी किंवा इतर भागवती प्रकरणांप्रमाणेंच या शृंगारिक प्रकरणांतही दिसून येतात, तेथें हीं शृंगारिक प्रकरणेंच तेवढीं निराळ्या वामनाचीं असें कोणत्या तोंडानें म्हणावयाचें ? शिवाय ज्या यथार्थदीपिका व राधाभुजंग–रासक्रीडादि भिन्नविषयक काव्यांवरून कै. भिड्यांना ही वामनाच्या अनेकत्वाची कल्पना सुचली, त्याच यथार्थदीपिकेंत'[२] व रासक्रीडेंत[३] 'गोपींच्या कुचकुंकुमाची' कल्पना सारखीच योजलेली पाहून तर या शृंगारिक प्रकरणांचें कर्तृत्व

---

१ भिडे–वामनपंडित–पृ. ५८–५९. २ " व्रजीं चारितां गायी । कुचकुंकुमें गोपिकांचीं पायीं । तदंकित तृणें कृतार्थ ठायीं ठायीं । बल्लवस्त्रिया पढलिया त्या काय ? " ।।–यथार्थदीपिका. ३ 'गोपींच्या कुचकुंकुमें करुनिया माळा गळां माखिली । क्रीडार्थी हरिमूर्ति सावधपणें ती एकली देखिली ।। '–रासक्रीडा–१७८.

यथार्थदीपिकाकाराव्यतिरिक्त अन्य वामनाकडे देण्याचें कोणाही समंजस व्यक्तीच्या मनांत येईल असें वाटत नाहीं. कै. भाव्यांनीं[१] पुनः वामनाच्या 'गीतासमश्लोकी'च्या शेवटच्या चार सुंदर श्लोकांची धाटणी वामनाच्या इतर श्लोकबद्ध प्रकरणांतील श्लोकांच्या धाटणीशीं बेमालूम जुळत असल्याची खात्री देऊन, व 'समश्लोकीं'त उल्लेखिलेलें 'ब्रह्मस्तुति' हें प्रकरण भागवतांतलें असल्यामुळें, भागवतांतलीं श्रीकृष्णचरित्रें मराठींत याच वामनानें गायिल्याचा, तसाच 'निगमसारां'त आलेल्या भागवती प्रकरणांच्या उल्लेखाचाही हवाला सांगून, भागवतांतील शृंगारात्मक अनेक कृष्णकथा खुलवून सांगणारा वामन, आणि यथार्थदीपिकाकार वामन हे एकच पुरुष होत, असा आपला निःसंदिग्ध अभिप्राय व्यक्त केलाच आहे. याच्याही मागें पाहिल्यास, वामनपंडितांनीं, नामसुधा, वनसुधा, वेणुसुधा, चित्सुधा व प्रियसुधा, अशा 'पंचसुधा' निर्मिल्याची माहिती ज्या अर्थी आत्मारामस्वामी[२] सांगतात, किंवा गीतेची व्याख्या करणाऱ्या वामनस्वामींनींच 'श्रीहरिचीं भक्तिज्ञानरसभरित अशीं बहुचरितें रचिलीं' अशी ज्याअर्थी मोरोपंतही ग्वाही देतात,[३] त्याअर्थी हीं सर्व भागवती प्रकरणें वामनस्वामींचींच अशी अबाधित समजूत पंतांपर्यंत चालत आलेली दिसते. हींच राधाभुजंग–रासक्रीडादि शृंगारिक प्रकरणें वामनस्वामींचीं नसून, दुसऱ्या वामनाचीं आहेत, अशी जर मोरोपंतांची समजूत असती, तर आपल्या 'सन्मणिमालेंत'[४] त्यांना वंदन करतांना, याच प्रकरणांना अनुलक्षून 'रसभवना तत्कवना' असा आपला रसिक व मार्मिक अभिप्राय त्यांनीं कसा व्यक्त केला असता? यावरून कै. भिड्यांच्या पांच वामनांपैकीं, यथार्थदीपिकाकार, वशिष्ठ गोत्री व शृंगारप्रिय या तीन वामनांचा निकाल लागला असून, या तीन व्यक्ती भिन्न मानण्यास कारणीभूत होणारें वरील उपाधित्रय एकाच वामनस्वामीचें आहे, हें आतां सिद्ध झालें आहे.

राहतां राहिल्या दोन वामनांपैकीं, नृसिंहपंडितसुत शांडिल्य गोत्री वामन, व यमक्या वामन यांचा विचार करणें यापुढें क्रमप्राप्त आहे. वामन-

---

१ महाराष्ट्र सारस्वत–भाग २–पृ. ६६. २ दासविश्रामधाम–३७।२६. ३ वामनस्तुति–श्लो. ४–५. ४ सन्मणिमाला १७.

पंडिताच्या कवितेच्या प्रचलित पहिल्या भागांतील 'भीष्मयुद्ध' या प्रकरणाच्या शेवटच्या श्लोकांत,[१] वामनानें लक्ष्मी नृहरि अशीं अनुक्रमें आपल्या मातापितरांचीं नांवें दिलीं असून, आपल्या शांडिल्य गोत्राचाही उल्लेख केला आहे. पण यथार्थदीपिकाकार वामनानें आपल्या इतर ग्रंथांत आपल्या वशिष्ठ गोत्राचा स्पष्ट खुलासा केला असल्यामुळें, कै. भिड्यांनीं साहजिकच 'भीष्मयुद्ध' हें प्रकरण, व तशाच धर्तीचें पण ज्याचें कर्तृत्व शंकित आहे, असें 'जयद्रथवध' हें प्रकरणही या शांडिल्यगोत्री लक्ष्मीनृसिंहसुत वामनाचें आहे, असें आपलें मत जाहीर केलें.[२] महाराष्ट्रभाषाभूषण रा. आजगांवकर[३] यांनींही 'भीष्मयुद्ध' व 'जयद्रथवध' हीं काव्यें यथार्थदीपिकाकार वामनाचीं नव्हत, यासंबंधीं कै. भिडे यांशीं आपली एकवाक्यता दर्शवितांना, वरील दोनी प्रकरणांतील कृत्रिम यमकासक्ति, वेदांतज्ञानाचा व पांडित्याचा अभाव, आरंभींचें गणेशसरस्वतिवंदन इत्यादि विशेषांच्या अनुरोधानें 'विराटपर्व' ही, या शांडिल्यगोत्री वामनाचेंच असावें, असा आपला तर्क मांडला असून, पुढें याच कृत्रिम यमकासक्तीच्या व एकंदर शिथिल रचनेच्या मुद्द्यावर, हा 'विराटपर्व' कर्ता शांडिल्य गोत्री वामन म्हणजेच रामदासस्वामीच्या थट्टेचा विषय झालेला यमक्या वामन, असें या दोन वामनांचें एकत्व सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. अलीकडे रा. दा. के. ओक[४] यांनीं रा. आजगांवकरांची हीच कल्पना सजवितांना याहीपुढें मोठी पल्लेदार उडी मारली आहे. त्यांनाही समर्थशिष्य यमक्या वामन व लक्ष्मीनृसिंहसुत वामन यांचें एकत्व वाचकांच्या गळीं उतरवावयाचेंच होतें. म्हणून त्यांनीं केलें काय, तर गिरिधरस्वामींनीं आपल्या समर्थप्रतापांत उल्लेखलेल्या समर्थशिष्य ऱ्हस्व वामनाचा व त्याच्या देवराव नामक पुत्राचा, त्याच ग्रंथांत वर्णिलेल्या नृसिंह नामक दुसऱ्या समर्थशिष्याशीं, 'उपदेशमाला'[५]

---

१ 'ताताभिधा नृहरिपंडित माय लक्ष्मी । दे सर्वदा सगुणयुक्त उदार लक्ष्मी. ॥ शांडिल्य गोत्र, कुळदेव नृसिंह ज्याचा । दासानुदास निज वामन हो अजाचा ॥' २ भिडे—वामनपंडित. ३ महाराष्ट्र कविचरित्र भाग १—पृ. १६२—१६३. ४ वामनपंडितकृत कविता—भाग—२ ( द्वितीयावृत्ति )—उपोद्घात—पृष्ठें.५—८. ५ वामनपंडित कवितासंग्रह—भाग ३.पृ.९, श्लो.६२—६४

या प्रकरणाच्या आधारें असा कांहीं अगदीं अचूक संबंध जुळवून दाखविला आहे कीं, त्याच्या योगानें समर्थशिष्य नृसिंह, या समर्थशिष्य ऱ्हस्व वामनाचा बाप ठरून, वामननंदन देवरायाचा, आजा ठरावा. रा. ओकांची ही क्लृप्ति कितीही डोकेबाज असली, तरी वरील ' उपदेशमाला ' प्रकरणांतील " उपदेश-माला सुता देवराया । नृसिंहें बिंबाया करविली, " या ओळींतील ' सुता ' या शद्वाला आपल्या सिद्धांतास बळकटी आणण्यासाठीं त्यांनीं जी अर्थाची अजब मुरड घातली आहे, ती बरीच चिंत्य आहे. रा. ओकांच्या म्हणण्या-प्रमाणें नृसिंह जर देवरायाचा आजा होता, तर येथें ही 'उपदेशमाला' करवितांना देवरायाचा ' सुता ' असा उल्लेख कां करण्यांत आला आहे ? किंवा नृसिंह जर, रा. ओक म्हणतात तसा अधिकारी पुरुष होता, तर आपल्या नातवाकरतां ही ' उपदेशमाला ' स्वतः न रचतां, ती त्यानें आपला पुत्र जो वामन, त्याच्याकडून कां करविली ? पुनः समर्थशिष्य ऱ्हस्व वामन, जर खरोखरीच नृसिंहाचा पुत्र असता, तर गिरिधरस्वामींनीं आपल्या ग्रंथांत, देवरायाचा जसा ' वामननंदन ' असा स्पष्ट उल्लेख केला, तसाच या समर्थशिष्य ऱ्हस्व वामनाचाही ' नृसिंहसुत ' असा असंदिग्ध निर्देश करण्यास त्यांना काय हरकत होती ? यावरून गिरिधरस्वामींनाही माहिती नसलेली गोष्ट सांगण्याचा खटाटोप करतांना, रा. ओकानीं एका समर्थशिष्याचा दुसऱ्या समर्थशिष्याशीं जो अश्रुतपूर्व असा पितृत्वाचा बादरायणसंबंध, तिसऱ्याच एका प्रकरणाधारें जोडून दिला आहे, त्याला संशोधनक्षेत्रांत दुसरी जोड मिळणें दुरापास्त आहे. समर्थकालीं यमक्या वामन किंवा समर्थशिष्य ऱ्हस्व वामन ही व्यक्ति होऊन गेली असली, तरी तिचें गोत्र शांडिल्य होतें, किंवा तिचे आईबाप अनुक्रमें लक्ष्मीनृसिंह होते, असा निखालस पुरावा सांपडल्या-शिवाय निवळ ओढून ताणून या दोन वामनांचें एकत्व सिद्ध होणें कसें शक्य आहे ?

अगदीं अलीकडे [१] रा. रंगनाथ केशव साकळे वकील यवतमाळ यांनीं ' वामनपंडित दोनच ' असा एक लेख लिहिला असून, त्यांत वामनपंडित जोशी व वामनपंडित शेष अशा दोन भिन्न वामनांचा निर्देश केला आहे.

---

१ ' महाराष्ट्र '—साप्ताहिक ता. १०।९।१९४४.

पहिले वामनपंडित दुसऱ्या वामनपंडित शेष्यांच्या थोडे आधी झाले असें रा. रा. साकळ्यांचें म्हणणें असून, नवनीतकारांनींही त्यांचें उपनांव जोशी व गांव कोरेगांव, दिल्याचा पुरावा त्यांनीं सादर केला आहे. 'काव्यसंग्रहां 'त प्रसिद्ध झालेल्या 'भीष्मयुद्ध' या प्रकरणांतील उल्लेखावरून या वामन-पंडिताच्या वडिलाचें नांव जरी नृहरि ठरतें, तरी रा. साकळ्यांच्याजवळ असलेल्या शके १६९२ विकृतिनाम संवत्सरांत लिहिलेल्या चोपडींतील पाठांवरून, वामनपंडित जोशाच्या तीर्थरूपाचें नांव हरिपंडितच असावें, असा तर्क त्यांनीं बांधला आहे. या वामनानें रचलेल्या विराटपर्वाच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं 'हरि' हें नांव गोंविलें असल्यामुळें, व पुष्कळ कवि आपल्या काव्याच्या शेवटीं आपलें व आपल्या गुरूचें किंवा वडिलांचें नांव आपल्या मागें किंवा पुढें लिहीत असल्यामुळें, वामनपंडिताच्या तीर्थरूपाचें नांव हरि पंडितच, असें रा. साकळ्यांना निःसंशय वाटतें. या वामनाच्या आईचें नांव लक्ष्मी, गोत्र शांडिल्य, व कुळदैवत नृसिंह याबद्दल वकीलसाहेबांस शंका नसून, त्याच्या पुत्राचें नांव त्यांनीं देवराय असें दिलें आहे.

यापुढें वामन जोशाचे गुरु सच्चिदानंद व वामन शेष्याचे गुरु सच्चिदानंद एक नसल्याचें सांगून, पहिल्या वामनाचे सच्चिदानंद, शृंगेरी पीठावरील आचार्यांपैकीं असून त्यांचा काल शके १५४४ ते १५८५ असा रा. साकळ्यांनीं जाहीर केला आहे. काव्याबद्दल बोलतांना 'काव्यसंग्रहां'त प्रसिद्ध झालेलीं; विराटपर्व, भीष्मप्रतिज्ञा, जयद्रथवध, पार्थभाग्य, शुकरंभा-संवाद, शुकाष्टक, दशावतार, ध्यानमाळा, विष्णुध्यान, भूगोलवर्णन, गजेंद्र-मोक्ष, भागवत रामायण, रुक्मिणीपत्रिका, गोपीगीत, राजयोग, तत्त्वमाला, योगवाशिष्ठ, व्याधाख्यान, तुकारामस्तुति, उपदेशमाला, मनास बोध, सिद्धांत-विजय इत्यादि लहानमोठीं काव्यें वामनपंडित जोश्यांनीं केलीं असावीं, असें मानून, रा. साकळ्यांनीं शके १५७६ वैशाख शु॥ ६ जयनाम संवत्सरीं वारणातीरीं कोरेगांवीं वामनपंडित जोशी समाधिस्थ झाल्याचें नमूद केलें आहे.

दुसरे वामन पंडित शेष हे मूळचे नांदेडचे रहिवासी असून त्यांच्या वडिलांचें नांव अनंत, चिरंजिवांचें नांव रघुनाथपंडित व पत्नीचें नांव गिराबाई अशी माहिती, रा. साकळ्यांनीं पुरविली आहे. व्यंकटेशस्तोत्रकार देवदासानें आपल्या संतमालिकेंत वामनपंडित जोशी याचा 'वामनस्वामी'

असा उल्लेख करून शेष 'नांदेडकर' म्हणून वामनपंडित शेषांचाही त्यानें उल्लेख केल्याचें ते लिहितात. शिवाय वामन शेषाच्या गोत्राबद्दलही सदर साकळ्यांनीं एक नवीनच मुद्दा उपस्थित केला असून, त्यांचें म्हणणें असें कीं, वामनपंडित शेषांनीं आपल्या गोत्राचा आपल्या ग्रंथांत तीन ठिकाणीं जो उल्लेख केला आहे, त्यावरून हे वामनपंडित वशिष्ठ गोत्रीच होते असें स्पष्टपणें सांगतां येणार नाहीं. 'सिद्धांतविजयां'तील "रविकुलगुरोर्गोत्र जलधौ" या ओळीवरून फार तर ते वशिष्ठ वंशांतले होते असें म्हणतां येईल.

रा. साकळ्यांनीं यानंतर आपदेवकृत 'गोत्रप्रवर निर्णयां'तील वशिष्ठाचे (१) वशिष्ठ. (२) कौण्डिण्य, (३) पराशर, (४) उपमन्यु असे चार गण देऊन वामनपंडित शेष हे पराशर गोत्री होते हें ठरवितांना, शेषांचीं घरें जेथें जेथें आहेत तेथें शोध करून सर्व शेष पराशर गोत्री असल्यामुळें, व वशिष्ठ गोत्री शेष आडनांवाचे ब्राह्मण अद्याप न आढळल्यामुळें, वामनपंडित शेष, पराशर गोत्री होते, असा आपला निर्णय दिला आहे. शेंवटीं वामन-पंडितांना, सच्चिदानंद साक्षात्परमेश्वरानें यतिरूपानें जो गुरुपदेश दिला, तो मलयगिरीवर श्रीशैलाजवळ किंवा व्यंकटेशगिरीजवळ कोठेंतरी दिला असावा' असें कल्पून, रा. साकळ्यांनीं भोगांव व शके १६१७ हा वामनपंडित शेषांचा अनुक्रमें समाधिस्थलकाल स्वीकारण्यास आपली मान्यता दिली आहे.

आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या वामनाच्या ग्रंथांपैकीं, यथार्थदीपिका, समश्लोकी गीता, निगमसार, अपरोक्षानुभूति, ब्रह्मस्तुति, कर्मतत्त्व, नामसुधा, चरमगुरुमंजरी, प्रियसुधा, रामजन्म, अहल्योद्धार, सीतास्वयंवर, भरतभाव, लोपामुद्रासंवाद, नृहरिदर्पण, द्वारकाविजय, रुक्मिणीपत्रिका, रुक्मिणीविलास, भामाविलास, राधाविलास, राधाभुजंग, हरिविलास, मुकुंदविलास, सिद्धांतविजय, अनुभूतिलेश, श्रुतिकल्पलता, इतके काव्यग्रंथ रा. साकळ्यांना निःसंशय वामनपंडित शेषाचे वाटतात. पण याशिवाय 'काव्यसंग्रहां'त व इतरत्र प्रसिद्ध झालेलीं वामनाच्या नांवावर खपणारीं काव्यें, अमक्याच वामनाचीं किंवा दुसऱ्या कोणा कवीचीं, तसेंच साम्राज्य वामन वगैरे मंडळी कोणाचे शिष्य, यांबद्दल आपणास खात्रीलायक सांगतां येत नाहीं असें म्हणून, रा. साकळ्यांनीं शांडिल्य गोत्री वामनपंडित जोशी व पराशर गोत्री वामनपंडित शेष असे

दोन वामनपंडित होऊन गेल्याचा आपला सिद्धांत शेवटीं मांडला आहे. दोघांही वामनांच्या काव्यांतील यमकालंकाराच्या सढळ उपयोगावरून त्या दोघांना ' यमक्या वामन ' ही सारखीच पदवी त्यांनीं बहाल केली आहे. तथापि भगवद्गीता समश्लोकी रचतांना, पार्थसारथी भगवंताचें ध्यान करणारा व साक्षात् शेषशायी जगद्गुरूला मंगलाचरणीं वंदन करणारा वामनपंडित शेषच असून, वामनपंडित जोश्याच्या काव्यांतल्या शृंगारापेक्षां शेषांच्या काव्यांत शृंगाराचाच काय तर सर्व रसांचा उत्कर्ष झाला आहे, अशी त्यांनीं कबुली दिली आहे.

वर रा. साकळ्यांनीं कै. भिड्यांच्या पांच वामनांप्रमाणेंच आपल्या दोन वामनांचा जो प्रपंच मांडला आहे, त्यांत वस्तुस्थितीपेक्षां तर्काचाच भाग अधिक आहे, असें दिसून येईल. वामनपंडित जोशी हे वामनपंडित शेषांच्या थोडे आधी झाले, या आपल्या म्हणण्याला रा. साकळ्यांनीं कांहीं आधार दिला नसून, त्यांनीं कल्पिलेला पहिला वामनपंडितच मुळीं भ्रमाचा भोपळा असावा, असें निःसंशय वाटतें. कारण नवनीतकार ज्या वामनपंडिताला जोशी असें उपनांव लावतात, तो कोणी भिन्न नसून वामनस्वामी शेषेच कदाचित् त्याच्या जोशी वृत्तीमुळें अथवा ज्योतिष ज्ञानामुळें, भिन्नपणें निर्दिष्ट केला गेला असणें शक्य आहे. आपण वामनपंडिताचें ' जोशी ' हें उपनांव कां दिलें आहे, याला नवनीतकारांनीं जसा आधार दिलेला नाहीं, तसाच देवदासाव्यतिरिक्त इतर तत्कालीन दुसऱ्या कोणत्याही संतमालिकेंत वामनपंडित जोशी या भिन्न व्यक्तीचा उल्लेख सांपडत नाहीं. यावरून असेही असणें संभवनीय आहे कीं, देवदासाच्या संतमालिकेंतील ' शेष ' हें उपनांव ' वामनस्वामीकडे जोडावयाचें सोडून नक्कलकारांच्या गफलतीनें किंवा अनवधानानें तें कोणा नांदेडकर वामनाकडे जोडलें गेलें असावें. प्रसिद्ध वामनस्वामी शेषे हे मूळचे विजापूरचे रहिवासी, असें सर्व तत्कालीन समर्थचरित्रकार एकमुखानें सांगत असून, ' नांदेड 'चा उल्लेख आतांपर्यंत कोणीच केलेला नाहीं. नांदेड व वाढवणचे ' शेष,' वशिष्ठ गोत्री नसून पराशर गोत्री आहेत, एवढ्यावरून वामनस्वामी देखील वशिष्ठ गोत्री नसून पराशर गोत्री होते असा नवा सिद्धांत जरी रा. साकळे मांडीत असले, तरी

त्यांनीं विजापूरकडील ‘ शेष्यां’च्या गोत्राचा शोध करून तो मांडल्याचें दिसत नाहीं. कदाचित् विजापूरचे ‘ शेष ’ वशिष्ठ गोत्री असून नांदेडच्या ‘ शेषां’चे भाऊबंद निघावयाचे, व मग वामनस्वामी वशिष्ठ गोत्री होते असें म्हणणारे राजाराम प्रासादीसारखे संतचरित्रकार चुकले असें म्हणण्यापेक्षां, रा. साकळ्यांनींच अधिक शोध केला नाहीं, असा दोष त्यांच्या पदरीं यावयाचा !

तशांत आपल्याजवळ असलेल्या शके १६९२ मध्यें लिहिलेल्या चोपडींतील ‘ भीष्मयुद्ध ’ या प्रकरणाच्या पाठावरून रा. साकळ्यांनीं वामन-पंडिताच्या तीर्थरूपाचें नांव हरि पंडित असा जो आपला तर्क बांधला आहे, तो तर सपशेल चुकीचा आहे. वामनाच्या नांवावर विकल्या जाणाऱ्या ‘ विराटपर्वा ’च्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं असणाऱ्या ‘ हरि ’ या नांवावरून व पुष्कळ कवि आपल्या काव्याच्या शेंवटीं आपलें व आपल्या गुरूचें किंवा वडिलाचें नांव आपल्या नांवाच्या मागें किंवा पुढें लिहितात या सांप्रदाया-वरून, रा. साकळ्यांनीं ‘ हरि ’ ही व्यक्तीच मुळीं भिन्न असून तो वामन-स्वामीचा शिष्य होता, ही खरी कल्पना न घेतां, ‘ हरि ’ हा वामनाचा बाप होता ही नेमकी विपरीत कल्पना स्वीकारावी, याचें कोणालाही आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. वामनाच्या इतर शिष्यांप्रमाणेंच या हरीनेंही ‘ हरि वामन ’ असा आपल्या नांवापुढें आपल्या गुरूच्या नांवाचा उल्लेख केला आहे, हें रा. साकळ्यांच्या लक्षांत आलें नसावें. खुद्द वामनस्वामींचीं प्रकरणें कोणतीं याबद्दल पुढें विवेचन होईलच. पण रा. साकळ्यांच्या वामनपंडित जोश्याच्या काव्यांतल्या शृंगारापेक्षां वामन शेषे यांच्या काव्यांत शृंगाराचाच काय तर सर्वच रसांचा उत्कर्ष जेथें रा. साकळ्यांनाही जाणवला आहे, तेथें खऱ्या वामनस्वामीची उमज वाचकांना पडण्यास अडचण पडणार नाहीं, व हनुमंतस्वामींच्या पदरीं हस्तदोष बांधून आपल्या वामनपंडित जोशाचा त्यांनीं आधाराशिवाय दिलेला १५७६ हा समाधिशकही विश्वसनीय ठरणार नाहीं.

वास्तविक ‘ भीष्मयुद्ध ’ प्रकरणाच्या छापील प्रतींतील[१] शेंवटच्या श्लोकाच्या ज्या ओळीमुळें, प्रस्तुत शांडिल्यगोत्री वामनाचा प्रश्न उपटला

---

१ वामनपंडितांचा कवितासंग्रह—भाग १.

आहे, ती ओळच, 'दासानुदास हरि तो सकळा द्विजाचा,' अशी लिहिलेली अनेक हस्तलिखित प्रतींत, कै. भावे ज्या अर्थी पाहिल्याचें सांगतात,[१] त्या अर्थी प्रचलित छापील प्रतींतील, 'दासानुदास निज वामन हो निजाचा' ही ओळ प्रक्षिप्तच ठरते, व साहजिकच या प्रकरणावरील वामनाचा हक्क उडून हरीचा प्रस्थापित होतांना, कै. भिड्यांच्या व रा. साकळ्यांच्या शांडिल्य गोत्री वामनाचें अस्तित्वही आपोआपच संपुष्टांत येतें. आज वामनी ग्रंथांत नेहमीं आढळणाऱ्या 'विराटपर्वांतील' बहुतेक अध्यायांच्या शेवटीं हरीचाच उल्लेख असणें,[२] 'भीष्मशरपंजर' या प्रकरणाच्या, कै. भाव्याजवळील हस्तलिखित प्रतींत शेंवटल्या श्लोकाचे शेंवटले दोन चरण 'ऋषी बोलिला भूप पारिक्षितातें। कसा तुष्टला श्रीहरी दिक्षितातें ॥' असें असणें, व याबरोबरच याच प्रकरणाच्या छापील प्रतींतील 'काशीत नाम' इ. श्लोक या हस्तलिखित प्रतींत नसणें, किंवा कै. भाव्यांच्या जवळ असणाऱ्या बाडांतील 'जयद्रथवध' प्रकरणाच्या शेंवटींही 'दासानुदास हरि तो सकळा द्विजाचा' असाच चरण असणें,[३] या वस्तुस्थितीवरून वामनाच्या कवितेंत आढळणाऱ्या या सर्व भारती प्रकरणांचा कर्ता कोणी शांडिल्य गोत्री वामन नसून, हरि दीक्षित किंवा हरि नामक वामनशिष्य असावा, असा कै. भाव्यांनीं जो कयास बांधला आहे, त्यांत बरेंच तथ्य आहे, असें म्हणावें लागतें. कै. भाव्यांच्या या तर्कास आपला पाठिंबा देतांना, डॉ. माधव गोपाळ देशमुख यांनीं कांहीं दिवसांपूर्वी, मराठी शतकत्रयाच्या एका हस्तलिखिताच्या आधारें, वामनाच्या नांवावर विकलें जाणारें हें शतकत्रय, वामनाचें नसून हरि दीक्षिताचें आहे, असा आपला सिद्धांत मांडला असून,[४] रा. दा. के ओकांप्रमाणेंच उपरिनिर्दिष्ट 'उपदेशमाले' तील नृसिंहाशीं, या हरीचा पुत्रत्वाचा संबंध लावण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. कै. भावे[५] किंवा डॉ. देशमुख म्हणतात त्याप्रमाणें, हरि दीक्षित हा वामनशिष्य असेल[६] किंवा 'भीष्मयुद्धां-'

---

१ महाराष्ट्र सारस्वत—भाग २—पृ. ६८. २ विराटपर्व—२।१५८—१५९; ५।१३८; ७।२०९; ८।१२३. ३ महाराष्ट्र सारस्वत—भाग २, पृ. ६८. ४ सह्याद्रि—वर्ष ४ थें—अंक ३. ५ महाराष्ट्र सारस्वत भाग २—पृ. ६८. ६ "झाली कृपा सद्गुरु वामनाची। प्रसन्नवृत्ती बरवी मनाची ॥ कथामृतीं तृप्त हरी विलासे। नीचात्मवृत्ती चिदचिद् विलासे ॥" स्फुटश्लोक—वा. क. सं. ३

तील श्लोकाप्रमाणें, त्याचेही आईबाप, अनुक्रमें लक्ष्मीनृसिंह असून गोत्रही शांडिल्य असेल.[१] पण एवढ्यावरून 'उपदेशमालें'त उल्लेखलेला नृसिंह, व 'भीष्मयुद्धां'त उल्लेखलेला नृसिंह या दोनी व्यक्ति एकच होत असें गृहीत धरून, 'उपदेशमालेचें' कर्तृत्व हरीच्या गळ्यांत बांधण्याचा, डॉ. देशमुखांचा प्रयत्न यशस्वी झाला नसून, उलट या 'उपदेशमालें'तील 'सुता देवराया' व 'वामनें अर्पिली' या पदांचें स्पष्टीकरण सोइस्करपणें टाळल्याच्या आरोपास मात्र ते निष्कारण पात्र झाले आहेत. तथापि कै. भाव्यांच्या व डॉ. देशमुखांच्या हरि दीक्षिताच्या किंवा हरि वामनाच्या या नवीन माहितीमुळें, वामनपंडितांच्या प्रचलित कवितेंत, हरिवामनाच्या कवितेचा मिसळलेला प्रवाह मात्र आतां उघडकीस आला असून, शांडिल्य गोत्री वामनाचें मध्यंतरीं कांहीं दिवस माजलेलें प्रस्थ, पूर्णपणें असिद्ध ठरण्यास पुष्कळच मदत झाली आहे, यांत शंका नाहीं. वामनस्वामींच्या अगदीं समकालीं, रामदासशिष्य वामन गोसावी अगर वामन रामदासी, अथवा यमक्या वामन, ही व्यक्ति काव्यक्षेत्रांत वावरत असली, तरी यापुढें मराठी वाङ्मयांत वामन म्हणजे यथार्थदीपिकाकार वशिष्ठ गोत्री वामनस्वामी शेषे, यांची एकमेव मूर्तीच आमच्या डोळ्यासमोर उभी राहणार असून, त्यांच्या निर्मेळ काव्यरसाची माधुरी चाखण्यास आज वामन गोसाव्यासारख्या दुसऱ्या कवींच्या काव्यांनीं गढूळलेल्या त्यांच्या कवितेंतून, स्वामींचीच कविता ओळखून अलग काढणें अगत्याचें झालें आहे.

हें कार्य वामनस्वामींनींच आपल्या ग्रंथांत इतर ग्रंथांचा नामनिर्देश केल्यामुळें सकृद्दर्शनीं सुकर वाटलें, तरी अन्य स्पष्ट गमकाभावीं अथवा अन्य कवींनीं व शिष्यांनीं त्यांच्या कवितेंत त्यांच्या शैलीचा तर्जुमा करून गोंधळ घातल्यामुळें, अतिशय दुष्कर होऊन बसलें आहे. तथापि वामनस्वामींच्या यथार्थदीपिकेंत त्यांच्या निगमसार,[२] कर्मतत्त्व[३] व ब्रह्मस्तुति,[४] यांचा उल्लेख

---

१ हरिपंडितानें आपल्या 'भावबोधिनी' नांवाच्या टीकेंत आपली हकीकत दिली आहे. त्यावरून तो धारवाड जिल्ह्यांतील नरगुंदचा राहणारा होता असें समजतें. पहा—चिं. नी. जोशी—म. सा. पत्रिका—१७।१.
२ यथार्थदी.—१५।६०३. ३ यथार्थदी.—१५।९६१. ४ यथार्थदी.—१५।२१८.

सांपडत असून, त्यांच्या समश्लोकींत हरिनामसुधा,[1] योगवाशिष्ठ[2] व श्रुतिसार[3] या प्रकरणांचा स्पष्ट उल्लेख आला आहे. पुनः कर्मतत्त्वांत[4] 'चित्सुधेचा' व 'चरमगुरुमंजरींत'[5] यथार्थदीपिकेचा उल्लेख असून, 'उपादानां'त चरमगुरुमंजरींतलेच श्लोक आले असल्यामुळें, हीं सर्व प्रकरणें वामनस्वामींचींच ठरतात. 'पंचसुधा' वामनस्वामींनींच रचल्याची माहिती आत्मरामस्वामींनींही[6] दिल्याचें वर सांगितलेंच असून, 'अनुभूतिलेश' व 'सिद्धांतविजय' या दोन संस्कृत ग्रंथांचें कर्तृत्वही त्यांतील साक्षात्कारासंबंधींच्या निर्देशानें वामनस्वामीकडेच जातें. 'राजयोग' हें प्रकरण वामन शेषे यानें रचिल्याचा उल्लेख सदानंदशिष्य सच्चिदानंद यानें आपल्या 'अनुभवसारांत'[7] केलाच असल्यानें, त्याच्या कर्तृत्वाबद्दल जसा संशय राहत नाहीं, तसाच तो, 'अपरोक्षानुभूति' व 'तत्त्वमाला,' त्या त्याच धर्तीवर असणाऱ्या प्रकरणांबद्दलही असण्याचें कांहीं कारण नाहीं. 'विश्वासबंध' व 'प्रेमसरी' यांत वामनाचें नांव स्पष्ट असून, 'सीतास्वयंवर' व 'रामजन्म' यांतही त्याच्या नांवाचा व वशिष्ठ गोत्राचा उल्लेख असल्यामुळें, तीं वामनस्वामीचींच होत. यास अनुसरून 'नृहरिदर्पण' व 'सीतास्वयंवर' यांत जसें प्रसंगसाम्य आहे, तसेंच तें 'कंसवध' व 'सीतास्वयंवर' यांत असल्यानें,नृहरिदर्पण व कंसवध हीं प्रकरणेंही, त्यांचींच मानणें प्राप्त आहे. गजेंद्रमोक्ष व वामनचरित्र यांची भाषासरणी एकच असून, भरतभाव, भागवतीरामायण व द्वारकाविजय यांत कवीनें, चित्रयमकाविषयीं काढलेल्या अभिमानपूर्वक सारख्याच उद्गारांमुळें, तीं वामनाचींच होत, हें कोणीही सांगेल. बाकीच्या अहिल्योद्धार, लोपामुद्रासंवाद, इत्यादि रामायणी प्रकरणांच्या व भामाविलास, राधाविलास, राधाभुजंग, हरिविलास, रासक्रीडा, रुक्मिणीविलास, शुकरंभासंवाद, कात्यायनीव्रत, यज्ञपत्न्याख्यान, बालक्रीडा, कृष्णजन्म, मृत्तिकाभक्षण

---

१ समश्लोकी–१२।८४. २ समश्लोकी–१३।८८–८९. ३ समश्लोकी–१२।८५. ४ कर्मतत्त्व–८।७८. ५ चरमगुरुमंजरी–श्लोक १३८. ६ दासविश्रामधाम–३७।२६. ७ 'येविषयीं युक्तिप्रयुक्ति । 'चित्सुधा' 'राजयोगादि' ग्रंथीं । श्रीवामन शेषे बहुधा युक्ती । श्रीसच्चिदानंद कृपें बोलिलें ॥'

व दशावतारचरित्र इत्यादि भागवती व पौराणिक प्रकरणांच्या वामनी कर्तृत्वा-संबंधीं, वामनी काव्यांच्या विशेषांसह मागें थोडें विवेचन आलेंच असल्या-मुळें, येथें त्याची पुनरावृत्ति करण्याचें कारण नाहीं. वामनानें कीर्तनांत, 'विश्व सर्व तारणें । हेचि सर्व कारणें' ॥ व 'अर्जुना तूं जाण रे । होशिल तूं सुजाण रे ।' हीं दोन पदें [१] म्हटल्याचें उद्धवसुतानें,[२] व आणखी एका कीर्तनप्रसंगीं याच वामनानें 'ध्याता सुतकामिनी । जाय दिनयामिनी ॥' हें पद[३] म्हटल्याचें आत्मारामस्वामींनींही[४] वर्णन केलें असल्यामुळें, हीं पदें किंवा वामनपंडितकृत कवितासंग्रहाच्या तिसऱ्या भागांत येणारीं पदें, जशीं त्यांच्या सहजरचनेवरून वामनस्वामींचींच ठरतात, तशीच त्यांच्या 'भगवंताच्या आरतीची'[५] संस्कृत भाषा, 'सिद्धांतविजया'दि संस्कृत ग्रंथांच्या भाषेच्या वळणाचीच असल्यानें, ही आरती देखील त्यांच्याच खातीं जमा करण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. रा. रामचंद्र महादेव आठवले, यांनीं संशोधित केलेला 'श्रुतिकल्पलता' हा संस्कृत ग्रंथही वरील ग्रंथा-प्रमाणेंच वामनपंडितांचा म्हटल्याशिवाय गत्यंतर नसून, नवीन उपलब्ध झालेल्या कवितेपैकीं, 'आत्मबोध' हें प्रकरण[६] त्यांतील वेदांताच्या धाटणीवरून व चरमगुरुमंजरीच्या अनेक उल्लेखांवरून निःसंशय वामनपंडितांचेंच म्हणावें लागतें.

वामनपंडितांच्या कवितेंत घुसडलीं गेलेलीं, भीष्मशरपंजर, भीष्म-भक्तिभाग्य, भीष्मयुद्ध, जयद्रथवध व विराटपर्व हीं भारती प्रकरणें, शिथिलरचना, पांडित्याचा अभाव, आरंभीं असलेलें गणेशसरस्वति-वंदन, ज्ञानेश्वरांबद्दलचा पूज्यभावपूर्वक निर्देश, व शेवटीं हरि–वामनाचा किंवा हरि–दीक्षिताचा स्पष्ट उल्लेख, या त्यांतील कारणांमुळें हरि नामक वामनशिष्याचीं आहेत हें मागें सांगितलेंच असून, डॉ. देशमुखांना सांपडलेल्या

---

१ वामनपंडितकृत कवितासंग्रह–भाग ३–पद ७ वें, व २१ वें. २ श्रीसमर्थ रामदासस्वामींचें चरित्र. ३ वामनपंडितकृत कवितासंग्रह–भाग ३–पद ८ वें. ४ दासविश्रामधाम–प्रकरण ४९. ५ वामनपंडित कवितासंग्रह–भाग ३–पृ. २२९–२३०. ६ वामनपंडित कवितासंग्रह–भाग २ (द्वितीयावृत्ति) पृ. २६०–२६६.

शतकत्रयाच्या हस्तलिखिताच्या[१] शेवटीं "इति श्रीभर्तृहरिविरचितं नीतिशतकं समाप्तमस्तु ॥ टीका ॥ हरि दीक्षितकृत संपूर्णमस्तु।" असा स्वच्छ उल्लेख असल्यानें तर, हें शतकत्रयही हरि-दीक्षिताचेंच मानलें पाहिजे. अध्यात्मज्ञान व भगवंताच्या सगुणावताराच्या लीला वर्णन करणारा वामन, भर्तृहरीच्या शतकत्रयाचें किंवा जगन्नाथरायाच्या गंगालहरीचें भाषांतर भरडीत बसेल असें वाटत नाहीं. म्हणून गंगालहरीचा हा अनुवाद बरा उतरला असूनही, त्यांतील वामनी सांप्रदायांच्या अभावामुळें, व शेवटींही वामनाचें नांव नसल्या-मुळें, त्याचें कर्तृत्वही शंकितच कल्पावें लागतें. पुनः 'गीतार्णवसुधें'त 'सम-श्लोकीं'तील श्लोक अक्षरशः घेतले असल्यामुळें, व शेवटींही 'हरी'चा स्पष्ट उल्लेख असून, प्रारंभींही 'कथिन जें मनिं वामनिं रेखिलें' असेंच म्हटलें असल्यामुळें, या प्रकरणाचा कर्ता वामनशिष्य हरीच असावा हें निर्वि-वाद आहे. वामनाच्या प्रसिद्ध कवितासंग्रहांत स्थालीपाक, पार्थभाग्य, कंस-वध ( दुसरा ), गोरसविक्रय, रसनास्तुति, नाममहिमा, भक्तिमहात्म्य व भगवद्दास्य, अशीं कांहीं त्रुटित, व कवीचें नांव शेंवटीं नसलेलीं १४।१५ प्रकरणें आहेत कीं, तीं वामनस्वामींचीं कां समजावयाचीं याला पुरावा नाहीं. वामनस्वामींची स्वतःच्या पितृपदीं स्थापना करणारे, त्यांचेच शिष्य व अनुकरणकार हरिवामन, साम्राज्यवामन, विश्वनाथवामन, व बापूवामन, हे आपल्या कवितेंत आपल्या नांवाचा उघड उल्लेख करतात म्हणून म्हणा, किंवा वामननामधारी तत्कालीन वामन गोसावी रामदासी याच्या कवितेवरील रामदासी छाप पाहून म्हणा, त्यांची कविता थोडी फार निवडून काढतां येते. पण वामनस्वामींच्या सुश्लोकाची लोकप्रियता पाहून आपली नकली कविता, त्यांच्याच नांवावर धकवून नेण्याची शक्कल ज्या कांहीं थोड्या अप्रसिद्ध कवींच्या डोक्यांत आली, त्या खऱ्याखोट्या नामधारी वामनकवींची उपरिनिर्दिष्ट १४।१५ प्रकरणासारखी कविता मात्र नक्की कोणती कोणाची हें सांगणें कठीण आहे. मनास बोध, हनुमंतस्तव, करुणाष्टक, रामस्तव, व रामाचा धांवा,[२] यांवर रामदासांच्या रामसांप्रदायाची छाप स्पष्टच दिसत

---

१ सह्याद्रि मासिक-वर्ष ४-अंक ३. २ नवीन उपलब्ध झालेली कविता-वामनपंडित कविता-भाग २ ( द्वितीयावृत्ति ) पृ.२६७.

असल्यानें, हीं प्रकरणें मात्र वामन रामदासी याची असावी. रा. दा. के. ओक यांस उपलब्ध झालेल्या वामनाच्या नवीन कवितेंतील एका अभंगांत,[१] 'म्हणे गोसावी वामन' असा स्पष्ट उल्लेख असून, "आम्हीं रघुनाथाचे दास" असें म्हटलें आहे. त्यावरून हा अभंग जसा वामन गोसाव्याचा, तशाच नवीन उपलब्ध झालेल्या पदांपैकीं, रामावरील कांहीं पदें[२] ही त्याचींच असणें शक्य आहे. याच पद्यसंग्रहांत 'सद्गुरु वामन रे!'[३] 'वामन चरणीं धरि थारा,'[४] 'गुरु वामन तेथे नांदत,'[५] असा शेंवट असणारीं कांहीं पदें 'ध्रुवचरित्रकारा'[६] प्रमाणेंच कोणातरी वामनशिष्याचीं असून, ३।४ पदें देवराय वामनाचीं[७] आहेत. हा देवराय, रामदासशिष्य वामनाचा पुत्र असावा असा सिद्धांत, 'श्रीसमर्थप्रतापा' वरून रा. ओकांनीं[८] बांधला असून, 'उपदेशमालें'त[९] उल्लेखलेल्या देवरायाशीं त्यांनीं तशीच जी सांगड घालून दाखविली आहे, तिच्याबद्दल अधिक स्पष्ट पुराव्याच्या अभावीं खात्री देणें अवघड आहे. इतर वामनशिष्यांपैकीं, साम्राज्यवामन हा त्यांचा पट्टशिष्य असून, त्याचें 'सुदामचरित्र,'[१०] 'राजयोग,' 'अनुभूतिलेशा' चें भाषांतर, व 'ब्रह्मोपदेश' हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. दुसरा वामनशिष्य विश्वनाथवामन याची कविता फारशी प्रसिद्ध नसली, तरी त्यानें वामनपंडितकृत 'पाताळखंडा' चें तात्विक सार काढलें असावें, असें त्याच्या, 'पाताळखंड पाहता कृत वामनाचें। त्यांतील तांत्रिक वदे सुत विश्वनाथ॥' या उद्गारावरून[११] सिद्ध होतें. वामनपंडितांच्या नांवावर प्रसिद्ध

---

१ नवीन उपलब्ध झालेली कविता—वामनपंडित कविता—भाग २ (द्वि.आ.) पृ. २८४. २ पदें, ३,४,५,६,९,१३—नवीन उपलब्ध झालेली कविता—वामनपंडितकृत कविता संग्रह—भाग २ (द्वि. आवृ.) ३ पद २ रें. ४ पद ४ थें. ५ पद ५ वें. ६ अनेककविकृत लघुकाव्यमाला—भाग ३—पृ. ११०—१२३. ७ पदें १९—२२ (वामनपंडितकृत कवितासंग्रह भाग २ (द्वि. आवृ.) ८ उपोद्घात—पृ. ६—वामनपंडितकृत कवितासंग्रह—भाग २ (द्वि. आवृ.) ९ वामनपंडितकृत कवितासंग्रह—भाग ३. १० अनेक—कविकृत लघुकाव्यमाला—भाग १. ११ वामनपंडितकृत कवितासंग्रह—भाग २ (द्वि. आवृ.)—पृ. २९०.

असणाऱ्या "नौकाक्रीडे" च्या १६ श्लोकांपुढें आणखी जे दोन श्लोक, रा. ओक यांनीं उध्दृत केले आहेत,[1] त्यांत 'सद्भावें करि विश्वनाथ हृदयीं अत्यंत त्यांचीं प्रिती।' अशी ओळ आढळते. यावरून "नौकाक्रीडा" हें प्रकरणही वामनाचें नसून या विश्वनाथवामनाचेंच असावें, अशी शंका कोणालाही येण्यासारखी आहे. पण अशा शंका वामनस्वामीच्या कवितेच्या रूढ विशेषांव्यतिरिक्त दिसणाऱ्या त्यांच्या संग्रहांतील इतर कवितेबद्दलही येण्यासारख्या आहेत. वामनपंडितांच्या कवितेंत दिसणाऱ्या स्फुट सवाया[2] त्यांच्या शिथिल रचनेमुळें जशा दुसऱ्या कोणाच्या तरी मानाव्या लागतात, त्याप्रमाणें त्यांच्या स्फुट श्लोकांतही[3] हरि,[4] सामराज[5] इत्यादिकांच्या श्लोकांची गफलत झाल्यामुळें, या श्लोकांच्या वामनकर्तृत्वाबद्दलही कांहींच बोलतां येत नाहीं. यावरून कोणाही बुद्रुक कवीनें उठावें, आपल्या काव्याच्या शेवटीं वामनकर्तृक श्लोक घालावा व वामनाच्या नांवावर तें काव्य खुशाल खपवावें, किंवा एकाद्या श्लोकबद्ध काव्याचा धनी सांपडला नाहीं, तर संपादकांनीं तें वामनाच्या कवितेंत ढकलून द्यावें, अशा प्रकारांप्रमाणेंच 'गोपीगीता'सारखीं कांहीं सुंदर वामनी प्रकरणेंही, संपादकांच्या अनवधानानें अनंतकवीसारख्या दुसऱ्या श्लोकबद्ध रचना करणाऱ्या कवीच्या वांट्यास जावीं,[6] असा दुहेरी व दुटप्पी अन्याय वामनस्वामींच्या कवितेस आजपर्यंत सोसावा लागला आहे, असें स्पष्ट दिसतें. 'सुश्लोक वामनाचा' ही सर्वत्र झालेली ख्याति, या कवीला त्याच्या कालीं व नंतरही एकपरीनें इतकी भोंवली आहे कीं,

---

१ वामनपंडितकृत कवितासंग्रह—भाग २ (द्वितीया आवृत्ति) २ वामनपंडितकृत कवितासंग्रह—भाग २ पृ. २६९—२७१, वामनपंडितकृत कवितासंग्रह भाग—३ पृ. ४७—५७. ३ वामनपंडितकृत कवितासंग्रह—भाग २ पृ. २६८—२६९. ४ स्फुटश्लोक ९—वामनपंडितकृत कवितासंग्रह—भाग ३. ५ 'अहो येता जाता, उठत बसतां, कार्य करतां। सदा देतां घेतां वदनिं वदतां ग्रास गिळितां। घरीं दारीं शय्येवरि रतिसुखाचे अवसरीं, । समस्तांची लज्जा त्यजुनि भगवच्चिंतन करीं॥', स्फुटश्लोक वामनपंडितकृत कवितासंग्रह—भाग ३ पृ. ४४. ६ वामनपंडितकृत कवितासंग्रह—भाग ३—पृ. ३०१—३११.

कोणाही आगंतुक कवीनें त्याच्या आश्रयाला येऊन व संसार थाटून, मालकापेक्षांही तेथें शिरजोर होऊन बसावें. स्वतः वामनपंडितानें याला काय करावें?

तथापि वामनपंडितांची कविता नाहीं तरी त्यांचें चरित्र तरी या दडपेगिरीपासून बचावलें आहे, असें थोडेंच आहे. वामनस्वामींनीं आपल्या ग्रंथांत स्वचरित्रपर असे उल्लेख फारच अल्प केले असल्यामुळें व इतर कोणाही पंथनिरपेक्ष ग्रंथकारानें त्यांचें चरित्र लिहून न ठेवल्यामुळें, पंडितांच्या चरित्राबद्दल आजपर्यंत बरेच विपर्यस्त ग्रह व अवास्तव मतें माजून राहिलीं आहेत. समर्थकालीन संतमालाकारांनीं[१] वामनस्वामींचें पांडित्य व अध्यात्मिक अधिकार जाणून एकमुखानें त्यांना वंदन केलें आहे. तसेंच पंडितांच्या निधनोत्तर दोन तीन वर्षांच्या अवधींत त्यांच्या पुण्यतिथीचा महोत्सव चालावा यासाठीं, त्यांचें थोर सत्पुरुषत्व लक्षांत घेऊन, रामचंद्रपंत पंडित अमात्य व राजाराम छत्रपति यांनीं अनुक्रमें, एक चावर जमीन, वामनशिष्य विश्वात्मक गोसाव्यास इनाम[२] देतांना, वामनस्वामींबद्दल आपली नितांत भक्ति व्यक्त केली आहे. यावरून समर्थकालीं वामनस्वामी जसे संतमंडळांत वंदनीय मानले गेले होते, तसेंच नंतर राजमंडळांतही ते पूज्य समजले गेले होते, हें सिद्ध होतें. समर्थांच्या निधनोत्तर ५०।६० वर्षांत लिहिलेल्या त्यांच्या चरित्रांत,[३] वामनस्वामींबद्दल जरी फारसे उल्लेख आढळत नाहींत, तरी उद्धवसुतानें लिहिलेल्या श्रीसमर्थ रामदासचरित्रांत; रामदासांच्या तोंडीं वामनासंबंधीं एकेरी उल्लेख घालून वामनस्वामींना त्यांचें दुय्यम भासविण्याचा प्रथमच केलेला प्रयत्न मात्र आढळतो. यानंतर लिहिलेल्या बहुतेक सर्व समर्थचरित्रांत[४] वामनपंडितांचा उल्लेख करितांना, त्यांच्या गर्विष्ठपणाची, त्यांच्या भविष्यकालीन ब्रह्मराक्षसयोनीची, समर्थांच्या सूचनेवरूनच त्यांच्या मलयपर्वतगमनाची व त्यांच्या समर्थशिष्यत्वाची आख्यायिका

---

१ रंगनाथ, देवदास. २ रा. आजगांवकर—महाराष्ट्रकविचरित्र-भाग १ पृ. १६६—१६७. ३ गिरिधरस्वामीकृत—समर्थप्रताप; भीमाजीबाबाकृत समर्थचरित्र. ४ भीमस्वामीकृत—भक्तलीलामृत; आत्मारामस्वामीकृत—दासविश्रामधाम; हनुमंतस्वामीकृत—रामदासस्वामीची बखर; राजाराम प्रसादी—भक्तमंजरीमाला.

त्यांना चिकटवून, त्यांना खालीं ओढण्याचा तर इतका पद्धतशीर प्रयत्न झालेला दिसतो कीं, वामनस्वामींसारख्या एकेकाळच्या वंदनीय विभूतीची कुचेष्टा करून आपल्या दिवंगत सांप्रदायपीठसंस्थापकाची प्रतिष्ठा वाढविण्याचा एक कटच, या नंतरच्या समर्थानुयायी चरित्रकारांनीं बुद्धिपुरःसर केला असावा असें वाटूं लागतें. समर्थांच्या निधनोत्तर १००।१५० वर्षांनीं-सुद्धां आपल्या सांप्रदायसंस्थापकाचें चरित्र भक्तांना व इतरेजनांना अधिक प्रभावी दिसावें या मोहानें, या सर्व रामदासपक्षपाती चरित्रकारांनीं खरा इतिहास बाजूला सारून, वामनस्वामींना गौणता आणण्याचा प्रयत्न कसोशीनें केलेला दिसतो. खरें पाहिलें तर ज्यानें आपला 'भक्तमंजरीमाला' हा ग्रंथ अगदीं कोणत्याही पक्षाच्या आहारीं न जातां स्वतंत्रपणें लिहिण्यास हरकत नव्हती, त्या राजाराम प्रासादीसारख्या अलीकडील चरित्रकारानें देखील, वामनपंडितांची चरित्रविषयक इतर विश्वसनीय माहिती देतांना, वर उल्लेखलेल्या निराधार आख्यायिका विस्तारानें वर्णन कराव्या, यावरून हे समर्थानुयायी चरित्रकार आपल्या सांप्रदायाचा बोज राखण्याच्या विवंचनेनें व समर्थाभिनिवेशानें कसे पछाडले होते, याची उत्तम कल्पना येण्या-सारखी आहे.

या आख्यायिकांचें रण माजवून, या चरित्रकारांनीं वामनस्वामींबद्दल जसा निष्कारण गैरसमज पसरविला आहे, तसाच आपल्या चरित्रग्रंथांतून वामनस्वामीविषयक एकेरी उल्लेख घालून व रामदासस्वामींच्याच आज्ञेनें पंडितांनीं आपला 'यथार्थदीपिका' हा ग्रंथ लिहिला अशीं भरमसाट विधानें[१] करून, अथवा वामनपंडित समर्थांच्या शिष्यवर्गांत मोडत होते असा प्रवाद पसरवून, पंडितांना समर्थांपेक्षां वयानें, पांडित्यानें व अधिकारानें कमी ठरविण्याचा त्यांनी मोठा हास्यास्पद पण यशस्वी प्रयत्न केला आहे. हे सर्व चरित्रकार म्हणतात त्याप्रमाणें, काशीहून शास्त्रसंपन्न होऊन आल्यावर वामनपंडितांची रामदासतुकारामाशीं भेट घडली असेल, अथवा रा. रा. म आठवले सांगतात[२] त्याप्रमाणें, शके १५७० त चाफळ मुक्कामीं रामनवमीस

१ हनुमंतस्वामीकृत—रामदासस्वामीची बखर. २ वामनपंडित—कांहीं नवीन प्रकाश—रत्नाकर मासिक—सप्टेंबर १९३२.

पंडितांचें कीर्तनही होऊन, पुढें तुकारामाशींही त्यांचें संभाषण झालें असेल. पण यावरून उद्धवसुतानें वर्णिल्याप्रमाणें " धन्य धन्य ज्ञान तुझें वामना ! " अशी पंडितांची तोंडीं शिफारस करण्याचा, किंवा राजाराम प्रासादी लिहितात त्याप्रमाणें वामनस्वामीस मलयाचलास जाण्याची आज्ञा करण्याचा, रामदासस्वामीस वामनपंडिताहून वयाच्या किंवा ज्ञानाच्या थोरवीचा असा कोणता अधिकार प्राप्त झाला होता, याला वरील ग्रंथकारांच्या नुसत्या म्हणण्यापलीकडे तरी आधार सांपडत नाहीं. याच्या उलट ज्या रामदासांच्या सान्निध्यांत राहूनही पंडितांना " आपल्या अध्यात्मिक संशयाची निवृत्ति झाली नाहीं "[१] असा विपरीत अनुभव आला, व 'शंभर वर्षांपूर्वी जसे ज्ञानी प्राकृत ग्रंथकर्ते होते तसे आतां नाहींत'[२] असे खेदोद्गारच काढावे लागले, त्या रामदासस्वामींचें श्रेष्ठत्व व गुरुत्व, पंडितावर केवळ पक्षपातानें अंध होऊन लादण्यांत, वरील सांप्रदायिक ग्रंथकार आपल्या गुरुमाउलीची एकप्रकारें विटंबनाच करीत आहेत, असें वाटल्यावांचून मात्र राहत नाहीं. तशांत रामदास जर पंडितांचे गुरु असते, तर 'पृथ्वीतलावर सद्गुरु म्हणून पुष्कळांची आपण सेवा केली, पण आत्मोपदेश देण्यांत आपणांस एकही मान्य झाला नाहीं,[३] असे उद्गार पंडितांच्या तोंडून कां निघाले असते ? 'ब्रह्मज्ञानाबद्दल निराश होत्साते आपण गंगायमुनेच्या संगमांत देहत्याग करण्याचा निश्चय केला,[४] पण शेवटीं मलयाचलावर मार्गक्रमण करीत असतां, श्रीसच्चिदानंदानें यतिरूपानें प्रकट होऊन आपणास तत्त्वोपदेश केला' असें आपल्या उद्विग्न मनःस्थितीचें व गुरूपदेशाचें वर्णन,[५] वामनस्वामींनीं जेथें स्वमुखानें केलें आहे, तेथें रामदासांच्या आज्ञेनें ते मलयाचलाकडे गेले हें म्हणणें तरी, कोण विश्वसनीय मानील ? तसेंच या गुरूपदेशानंतर 'निगमसारादि' अध्यात्मिक ग्रंथांच्या मागून पंडितांनीं आपली 'यथार्थदीपिका' रचतांना देखील " या कारणें जी ! भगवंता । यथास्थित हे तुझी गीता । वाखाणावी म्हणून होता । बहुतकाळ संकल्प ॥ १३१॥ आणि तुझ्या कृपेचे विभागी । शिष्य, संत, भक्त, योगी । ते म्हणती कीं,

---

१ अनुभूतिलेश—श्लो. १४०. २ अनुभूतिलेश—श्लो. १४२. ३ अनुभूतिलेश—श्लो. १३५. ४ अनुभूतिलेश—श्लोक—१४३. ५ निगमसार—१।७—२४.

'जगदुपयोगी। ऐसी टीका करावी' ॥ १३२॥ परंतु देवकीनंदन। जेव्हां देईल अनुमोदन। तेव्हांच त्यातें वंदन। करीन पोटीं भाव हा ॥ १३३॥"[1] अशी ग्रंथरचनेमागील ईश्वरीप्रेरणा व शिष्य-संत मंडळींचा आग्रह, जर उघडपणें व मनमोकळेपणानें सांगितला आहे, तर रामदासस्वामींच्या आज्ञेनें पंडितांनीं 'यथार्थदीपिका' रचली, या म्हणण्यांत तरी काय हंशील? समर्थ व पंडित प्रत्यक्ष बरोबरीच्या नात्यानें वागत असत कीं कसें, हें समजण्यास आज स्पष्ट पुरावा नाहीं. पण चरित्रकार वर्णन करतात त्याप्रमाणें 'यथार्थ-दीपिका' जर खरोखर रामदासांच्या आज्ञेवरून लिहिली गेली असती, अथवा पंडितांनीं समर्थांचें शिष्यत्व खरोखरच स्वीकारलें असतें, तर ही वस्तुस्थिति निःशंकपणें आपल्या ग्रंथांतून मांडून, समर्थांबद्दल आदर दाखविण्याचा खिलाडू मनमोकळेपणा पंडितांनीं खात्रीनें दाखविला असता अशी अटकळ, त्यांच्या ग्रंथांतील थोड्याफार आत्मचरित्रपर उल्लेखांवरून बांधतां येण्या-सारखी आहे.

पण म्हणून राजाराम प्रासादी वर्णन करतो तें सर्वच खोटें, असें न मानतां, त्याच्या कांहीं हकीकतींतील तथ्यांश घेतल्यास, विजापूरच्या बाद-शहाच्या बाटवून भ्रष्ट करण्याच्या दहशतीमुळें, भिक्षावृत्ति स्वीकारण्यांत व पुढें बादशहानें देऊं केलेला सरंजाम धिक्कारून पत्नीसह काशीस गमन करण्यांत वामनपंडितांची स्वधर्मभक्ति व विरक्तवृत्ति चांगलीच कसास लागलेली दिसते. काशीस संस्कृताध्ययन करून पंडित जे महाराष्ट्रांत परत आले, ते गर्वानें फुगलेलेच आले, असें बरेच चरित्रकार वर्णन करतांना आढळतात. पण 'न जाणे कौशल्यें किमपि परि पोटीं नियम कीं। हरीच्या या लीला हरिच रचितो चित्रयमकीं ॥ तरी सर्वा ग्रंथीं प्रतिपदही अर्पूनि हरिला। अहं-कर्तृत्वाचा अनुसृतहि संस्कार हरिला ॥' असें आपल्या 'द्वारकाविजयां'त[2] निरहंकाराचे, व 'तत्त्वता अर्थ ठायीं पडो न पडो। सर्वांस टीका आपुली आवडो। हा भाव असो तरी झडो। जिव्हाचि हे ॥'[3] असें आपल्या 'यथार्थ-दीपिकें'त निरभिमानाचे व निराग्रहाचे उद्गार काढणारे वामनस्वामी, विद्येनें

---

१ यथार्थदीपिका–अध्याय १. २ द्वारकाविजय–२।४४. ३ यथार्थदीपिका–१२।१८१४.

इतके ताठर बनले असतील असें वाटत नाहीं. तरी केवळ शाब्दिक शास्त्रपठ-नानें पंडितांची परमेश्वरप्राप्तीची तहान अतृप्त राहिल्यामुळें, ती भागविणाऱ्या गुरूच्या शोधार्थ त्यांनीं पुष्कळ वर्षें प्रवासांत घालविलीं व अनेक संत-महंतांच्या भेटी घेतल्या. या प्रदीर्घ कालांत पंडितांची दृष्टि संस्कृत भाष्यकारांच्या अद्वैत ग्रंथाकडे व शंभर वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या एकनाथांच्या भक्तिप्रवण भागवती रचनेकडे वळलेली दिसते. एकनाथाप्रमाणेंच आपणही प्राकृत भाषेंत श्रीकृष्णाच्या भक्तियुक्त अगाध लीला गाव्या असें वाटून, पंडितांनीं आपल्या आवडत्या श्लोकवृत्तांत, नाथाप्रमाणेंच अनेक भागवती व रामायणी प्रकरणांची रचना केली आहे. संस्कृत–मराठी भाषांवरील असामान्य प्रभुत्व व अद्वैत भक्तिरसांत घोळलेलें पंडितांचें मन, यांचा सुंदर मिलाफ या प्रकरणांत घडल्यामुळें, पंडितांचीं हीं कृष्णचरित्रपर सर्वच प्रकरणें अतीव रसभरित व नादमधुर उतरलीं आहेत. श्रीकृष्णाच्या लीला वर्णन करतांना, इतर रसां-प्रमाणें शृंगाररसाचाही, पंडितांनीं मनसोक्त अवलंब केल्यामुळें, कै. भाव्या-सारख्या[१] कांहीं आधुनिक विद्वानांच्या रोषास ते पात्र झाले आहेत. पण पंडितांच्या कोणत्याही शृंगाररसपर प्रकरणाचें पर्यवसान वेदांतांत किंवा अध्यात्मांत होत असल्याचें पाहिल्यानंतर, कोणीही सहृदय वाचक त्यांच्यावर अश्लील शब्दरचनेंत सौख्य मानणाऱ्या वृत्तीचा आरोप करील असें वाटत नाहीं. शिवाय आपण वर्णन करीत असलेलीं राधाभुजंगादि प्रकरणें, कांहीं सकाम वृत्तीच्या वाचकांना शृंगारिक वाटतील याची कल्पना खुद्द वामनपंडितांना आली नव्हती असें नाहीं. आणि म्हणूनच "या कथा स्त्रियांच्या किंवा मन्मथाच्या नसून जगदुद्धारक द्वारकानायकाच्या आहेत, व यांमुळें सकाम वाचकांचेंही चित्त परमेश्वरमार्गाकडे लागेल"[२] असा आपल्या रचनेचा भक्तिप्रवण व पारमार्थिक हेतु त्यांनीं अगदीं स्पष्टपणें सांगून, अशा शंकाकारांना खासें उत्तर देऊन टाकलें आहे. पंडितांची वृत्ति या कालांत इतकी कृष्णमय झाली होती कीं, श्रीकृष्णवर्णनाशिवाय इतर लौकिक स्त्रीपुरुषांच्या चरित्रावर खर्ची पडलेलें काव्य, त्यांना काकतीर्थाप्रमाणें त्याज्य वाटत असे.[३] यामुळें हीं भागवती काव्यें रचणाऱ्या पंडितांची वृत्ति

१ महाराष्ट्र सारस्वत–भाग २–पृ. ६०. २ राधाभुजंग–श्लोक ५५.
३ द्वारकाविजय–२।२५.

मुक्तेश्वर–लोलिंबराजादि पूर्वकवींप्रमाणें, अथवा सामराज, नागेश, रघुनाथ-पंडितादि समकालीन कवीप्रमाणें निवळ कलाविलासात्मक नसून, एकनाथा-प्रमाणेंच अद्वैत व भक्तीचा प्रसार करणाऱ्या पारमार्थिक ज्ञानी प्रवचनकाराची आहे, हें त्यांच्या ग्रंथांच्या सूक्ष्म वाचनानें कोणालाही ठरवितां येईल. तरी भगवंताचे अलौकिक गुण लौकिक स्वरूपांत वर्णन करतांना, जी सगुण-सालंकार रचना पंडितांच्या हातून निर्माण झाली, ती शिवकालीन कलाकवींना मात्र निःसंशय मार्गदर्शक झाली आहे. या दृष्टीनें सुश्लोकरचना रूढ करण्याचा पहिला मान जसा त्यांच्याकडेच जातो, तसें खंडकाव्यात्मक अथवा आख्यानात्मक काव्यरचनेचें प्रथमचें श्रेयही त्यांनाच देणें योग्य ठरतें.

यापुढील वामनपंडितांच्या चरित्रांतील अतिशय महत्त्वाचा प्रसंग म्हणजे मलयाचलावरील त्यांच्या गुरूपदेशाचा होय. हा प्रसंग त्यांनीं आपल्या ‘निगमसार’ ग्रंथांत विस्तारानें वर्णिला असला, तरी पंडितांना ब्रह्मैक्य घडवून त्यांना ‘भार्गव वारुणी’ विद्या देणारे हे सच्चिदानंद यति कोण याबद्दल कांहीं विद्वानांत वाद माजलेला आढळून येतो. रा. रा. म. आठवले[१] यांनीं वामनपंडितशिष्य साम्राज्यवामनकृत अनुभूतिलेशाच्या भाषांतरास जोडलेल्या उपसंहारांतील गुरुपरंपरा, व कै. म. रा. बोडस[२] यांच्या ग्रंथांत दिलेल्या शृंगेरी व करवीर मठांतील आचार्यनामावळी यांच्या आधारें, वामनपंडितांनीं उल्लेखलेले त्यांचे सद्‌गुरु सच्चिदानंद यति, हे शृंगेरीच्या प्रसिद्ध पीठावरील एक शंकराचार्य होते असें सिद्ध केलें असून, आपली उपपत्ति मांडतांना, हिमालयाच्या यात्रेहून आल्यावर कडलगीस राहिलेल्या सहाव्या नृसिंहभारतीनंतर शृंगेरीपीठावर अधिष्ठित झालेले सच्चिदानंद, व क़ऱ्हाड–करवीरच्या नामावळींत उल्लेखलेले स्वयंजात सच्चिदानंद यांचें एकत्त्व, शृंगेरीचा नष्टप्राय झालेला सांप्रदाय उजळण्याचें सच्चिदानंदांचें कर्तृत्व, सच्चि-दानंदांची शके १५४४–१५८५ पर्यंतची प्रदीर्घ कारकीर्द, व वामनपंडित–सच्चिदानंद यांच्या मलबारप्रांतीय मलयाचलावरील भेटीचा शके १५८४–८५ अगर १५९१ हा काल, यांचें मोठें उद्बोधक विवेचन केलें आहे. दुसरी

---

१ ‘चित्रमयजगत्’–मार्च–एप्रिल १९३२. २ श्रीशंकराचार्य व त्यांचा सांप्रदाय–पृ. ९१–९४, १०१.

बाजू मांडणारे रा. दा. के. ओक, हे वामनपंडितांना गुरूपदेश देणारे यति साक्षात् भगवंतच होते या जुन्या मताचेच पुरस्कर्ते असून भगवंताखेरीज पंडितांचें इतर कोणाशीं गुरुशिष्याचें नातें लावूं पाहणाऱ्यावर त्यांनीं उघड बाष्कळपणाचा आरोप[१] केला आहे. असा आरोप करणें किती सोपें आहे, व संशोधकाला तें कितपत श्लाघ्य आहे, हा प्रश्न सोडून दिला, तरी वामनपंडितांनीं उल्लेखलेल्या सच्चिदानंद या नांवाचें त्यांच्या शिष्यानें दिलेल्या गुरुपरंपरेंतील व शृंगेरी–करवीरपीठाच्या आचार्यनामावळींतील सच्चिदानंदाशीं जुळणारें साम्य, सहाव्या नृसिंहभारतीनंतर सच्चिदानंदाची शृंगेरी पीठावर स्थापना, त्या ऐतिहासिक स्थापनेचें निदर्शक असें करवीरपीठाच्या नामावळींत त्यांना जोडलेलें 'स्वयंजात' हें विशेषण, वामनपंडितांनीं वर्णिलेली सच्चिदानंदांच्या पूर्वीच्या शृंगेरीपीठाची अवनत स्थिति,[२] सांप्रदायपुनरुज्जीवनाचें सच्चिदानंदांनीं केलेलें सुमारें ४५ वर्षांचें कार्य, गुरुशोधार्थ उद्विग्नमनःस्थितींत पंडितांनीं मलयाचलाकडे केलेल्या प्रवासाच्या उल्लेखावरून दक्षिणप्रांतीं शृंगेरीस त्यांच्या गमनाची शक्यता व शके १५८५ किंवा १५९१ हा सच्चिदानंदांच्या निर्याणाचा काल, या गोष्टी पंडितांनीं वर्णिलेल्या आपल्या गुरूपदेशप्रसंगाशीं व साधारणतः शके १५९३ या त्याच्या कालाशीं इतक्या जुळतात कीं, श्री. रा. म. आठवले यांच्या 'तर्कवितर्कांच्या उतरंडी व कोल्हाट–उड्या मारण्याची चपळाई'[३] सहन करूनही त्यांचा सिद्धांत मान्य करण्याकडेच मन वाहतें. भाष्यकार आद्य शंकराचार्योनीं सांगितलेल्या अद्वैत तत्त्वज्ञानाचा मागमूस आपणास कोठें लागला नाहीं, असें जे पंडितांनीं स्वानुभवाचे उद्गार[४] काढले आहेत, ते त्यांच्या सभोंवतींच्या करवीर–संकेश्वर मठांतील आचार्यासंबंधीं असणें शक्य आहे. आणि यासाठींच पंडितांनीं दक्षिणेंत शृंगेरीपीठाकडे धांव घेतली असावी.

---

१ वामनपंडितकृत कविता–भाग २–उपोद्घात पृ. ९३. २ नष्टप्राये संप्रदाये कालेनाल्पेन भूतले। नाम्ना सच्चिदानंदश्रीगुरुणा यः प्रकाशितः॥–अनुभूतिलेश–१३३. ३ वामनपंडितकृत कविता–भाग २, उपोद्घात पृ. ७७ (तळटीप). ४ संस्कृतग्रंथकर्तारो भाष्यकारादयो भुवि। यदुक्तवन्तस्तच्चापि ज्ञानं कुत्रापि न श्रुतम्॥–अनुभूतिलेश–१४१

शिवाय पीठारूढ अपात्र स्वामींना युक्तीनें दूर सारण्याचें चातुर्य, धडाडी व अधिकार या रा. आठवले यांनीं वर्णिलेल्या सच्चिदानंदाच्या अंगच्या गुणावरून, रा. ओकांनीं जर ती एक उपव्द्यापी व उलाढाली व्यक्ति होती अशी आपली समजूत करून घेतली असेल,तर यवनांची चाकरी करीत असतांनाच एकनाथांना उपदेश देणाऱ्या जनार्दनस्वामीबद्दल किंवा अध्यात्मोपदेशाबरोबरच व्यवहार-राजकारण सांगणाऱ्या, स्वधर्मरक्षणार्थ आर्यावर्तात सर्वत्र मठस्थापनेचा खटाटोप करणाऱ्या, व वेळप्रसंगीं शिवछत्रपतींना सल्लामसलत देणाऱ्या समर्थ रामदासाबद्दलही त्यांना तशीच कल्पना करून घ्यावी लागेल. यावरून शांकरसांप्रदायाची आपल्यापूर्वी विस्कटलेली घडी पुनः बसवितांना कराव्या लागलेल्या कांहीं व्यावहारिक प्रयत्नांनीं, सच्चिदानंदांच्या तपःसामर्थ्यास किंवा पंडितासारख्या आर्तजिज्ञासूस उपदेश देऊन ज्ञानसंपन्न करण्याच्या त्यांच्या अध्यात्मिक अधिकारास, थोडासुद्धां बाध येईल असें वाटत नाहीं. रा. ओक म्हणतात त्याप्रमाणें पंडितांना गुरूपदेश देणारे जर साक्षात् भगवान् चक्रपाणी होते, तर त्यांना पंडितांपुढें प्रकट होण्यास यतिवेषाची, किंवा एवढ्या लांब संभाषणाची तरी काय गरज होती ? नुसत्या दर्शनानें अथवा स्फुरणानेंही आपल्या भक्तास त्यांना कृतकृत्य करतां आलें असतें. तशांत पंडितच जेथें आपल्या मागें उभा राहिलेल्या गुरूच्या भगव्या वस्त्राचें, त्यांच्या शिखारहित मस्तकाचें, त्यांच्या हास्यध्वनीचें व सर्व उपनिषदांचें सार सांगून केलेल्या ब्रह्मात्मतेचें वर्णन करून त्यांचें नांव 'सच्चिदानंद' असें सांगतात, तेथें ती एक मानुषव्यक्ति कल्पिण्यास व रा. आठवले ठरवितात त्याप्रमाणें, ते शृंगेरीपीठस्थ सच्चिदानंद शंकराचार्य होते असें आज तरी मानून चालण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं.

या गुरूपदेशाच्या संस्मरणीय प्रसंगानंतर मात्र पंडित करवीरास थोडे दिवस राहून, तेथून जवळच असलेल्या शिगांव–कोरेगांव या वारणाकांठावरील गांवीं जाऊन राहिले, असें त्यांचे चरित्रकार सांगतात. या करवीरच्या मुक्कामांत अगदीं जगदंबेच्या देवळांत त्यांनीं 'नामसुधे'सारखे[१] एकादें

---

१ तृतीय अध्याय विचित्र येथें । संपूर्ण झाला इतिहास जेथें ॥
समर्पिला श्रीहरिपादपद्मीं । पद्मालयेच्या अति दिव्यसद्मीं ॥
—नामसुधा—३।३२.

प्रकरण रचलें असलें तरी, जी विद्या सच्चिदानंदमुखांतून त्यांना प्राप्त झाली होती, तिचें निवेदन करण्यासाठीं त्यांनीं 'निगमसार' या ग्रंथाची रचना, मुक्कामास गेल्याबरोबर वरील प्रशांतस्थलीं केली असावी. इतर कोणत्याही ग्रंथांत रचनाकाल न देणाऱ्या पंडितांनीं, तो याच ग्रंथांत शके १५९५ असा दिला आहे. यावरून गुरूपदेशाचा प्रसंगही या सालापूर्वी १।२ वर्षांचा ताजाच असावा असें अनुमान निघतें. 'निगमसारा'नंतर आपल्या अनुभवजन्य ज्ञानाचा फायदा बहुजनसमाजास देण्यासाठीं, पंडितांनीं 'कर्मतत्त्व', 'चित्सुधा', 'सिद्धांतविजय' व 'अनुभूतिलेश' इत्यादि अध्यात्मिक प्रकरणें रचलीं आहेत. पण यानंतर भगवंताच्या केवळ वदनांतून स्रवलेला गीताग्रंथ शक्य तर श्लोकवृत्तांत पण भूलोक भाषेंत, अज्ञजनांना सुलभ करून द्यावा, ही तळमळ लागूनच त्यांनीं आपली 'समश्लोकी' नांवाची गीतेची मराठी छाया, अंतःकरणाचा जिव्हाळा ओतून मोठ्या साक्षेपानें लिहिली आहे. या 'समश्लोकी'नंतर 'चरमगुरुमंजरी', 'उपादान', 'कर्मतत्त्व' वगैरे आणखी थोडीं अध्यात्मिक प्रकरणें पंडितांनीं लिहिलीं असलीं, तरी उपदेशाच्या प्रसंगानें मूळ कृष्णभक्तियुक्त अशा त्यांच्या अंतःकरणावर अद्वैतज्ञानाचें पुट चढून, ज्ञानीभक्ताच्या पदवीस चढलेल्या त्यांच्यासारख्यास भगवद्गीतेचें ज्ञानोत्तर सगुणभक्तिपर विवेचन करण्याचा हुरूप पुनः चढावा यांत नवल नव्हतें. पंडितांच्या पूर्वीचे ज्ञानेश्वर–दासोपंतादि गीताटीकाकार जसे प्रसिद्ध होते, तसे त्यांचे समकालीन रंगनाथस्वामीही कांहीं कमी गाजलेले नव्हते. पण या सर्वांच्या टीकांत गीतेचा अर्थ करतांना, मताभिनिवेशामुळें जे दोष उतरले आहेत ते स्पष्टपणें दाखवून, भगवंताच्या वाणीचा आपणास वाटतो तो खरा अर्थ लोकांपुढें मांडणें, हें त्यांस कर्तव्य वाटलें, व शिष्य–संतमंडळींचाही या कामीं विशेष आग्रह पडून 'यथार्थदीपिका' ही प्रसिद्ध गीताटीका पंडितांच्या हातून निर्माण झाली. या अनुपम पण शेंवटच्या ग्रंथांत वामनस्वामींनीं आजन्म केलेल्या शास्त्राध्ययनाची, स्मृतिपुराणादिग्रंथांच्या गाढ व्यासंगाची व त्यांच्या तर्कशुद्ध बुद्धीची जशी ओळख पटते, तशीच मतनिश्चितीनें बाणलेल्या त्यांच्या आत्मविश्वासाची, सडेतोड, स्पष्ट पण निर्भय स्वभावाचीही पूर्ण प्रतीति येते. श्रीकृष्णसंवादविषयक टीकाग्रंथ लिहितांना, अन्य क्षुद्र देवतांना

नमन करणाऱ्या ज्ञानेश्वरावर,[१] निर्गुणोपासनेचें बंड माजविणाऱ्या रंगनाथादि समकालीन टीकाकारांवर[२] अथवा आपल्या टीकेंत ज्ञानोत्तर भक्तीला मान्यता न देतां अर्थवाद करणाऱ्या इतरांवर[३] कोरडे उडवितांना, पंडितांनीं अशीच अगदीं कोणाचीही भीड ठेवलेली नाहीं.[४] यामुळें तत्कालीं जरी 'यथार्थ-दीपिकेची' उपेक्षा झाली, तरी निर्मत्सर व निरभिमान हरिभक्त आपल्या टीकेस खात्रीनें मान देतील ही त्यांची आत्मविश्वासाची भविष्यवाणी, श्रीधर, महिपति व मोरोपंत यांनीं उधळलेल्या स्तुतिसुमनांनीं खरी झाली आहे. पंडितांची ही टीका काव्ययुक्त नाहीं किंवा तिची भाषाशैलीही मोठी हृदयंगम आहे असेही म्हणतां यावयाचें नाहीं. पण तिच्यांतील बिनतोड युक्तिवादानें, निश्चित व निर्भीड प्रतिपादनानें व भक्तिरसाच्या ओघानें, वाचक नकळत वाहत जातो यांत शंका नाहीं. या टीकेमुळेंच पंडिताच्या विद्याव्यासंगाला तपश्चर्येचें व भगवत्साक्षात्काराचें तेज चढून त्यांना वामनस्वामी हें सार्थ नामाभिधान प्राप्त झालें.

वामनस्वामींनीं आपल्या आयुष्याचे शेवटचे दिवस, शिगांव-कोरेगांव येथेंच भगवच्चिंतनांत व लेखनकार्यांत घालविले. प्रस्तुत 'यथार्थदीपिका' त्यांनीं या गांवींच नदीतीरीं असणाऱ्या नारायणाच्या देवालयांत बसून लिहिली अशी प्रसिद्धि आहे.[५] पुढें तीर्थक्षेत्रें करीत महाबळेश्वरास जात असतांना

---

१ वंदिती पूजिती तूझे चरण । तरी अंतरीं इतर देवता शरण । करिती क्षुद्रदेवतामंगलाचरण । इच्छोनि कविता स्फूर्तीही ॥ जगीं मिरवोनियां सिद्धि । आपुलाल्या टीकांची केली प्रसिद्धि । तथापि नाहीं झाली अर्थसिद्धि । यथार्थ गीतारहस्याची ॥ —यथार्थ. ९।२५–२६.

२ अलीकडे कोणी टीकाकार । करूनी त्या पक्षाचा अंगीकार ॥ ज्ञानियास नलगे सगुण साकार । बोलती ऐसें ॥ —यथार्थ.–१२।१५०.

३ गीतेंत अर्थवाद । कांहीं न बोले गोविंद । आपुली न मानुनी बुद्धिमंद । अर्थवाद गीतेंत आणिती ॥ —यथार्थ.–११।११३४.

४ भीड कोणाची नाहीं । विरुद्ध अर्थ नावडे कांहीं । संमत वेदां आणि व्यासादिकांहीं । मूलग्रंथकारातें तें बोलणें ॥ —यथार्थदी. ११।११४६.

५ रा. म. आठवले—सचित्र करमणूक, दिपवाळी—अंक १९२८ इ.

वाटेंत गुन्हेगर येथें ते समाधिस्थ झाले. स्वामींच्या मागें त्यांचा शिष्य-संप्रदाय असून त्यांनीं मठस्थापनाही केली असावी असें, राजाराम छत्रपतींनीं विश्वात्मक गोसाव्यास दिलेल्या इनामपत्रावरून स्पष्ट होतें. या विश्वात्मक गोसाव्यानेंच वाईपासून चार मैलांवर कृष्णातीरीं भोगांव येथें वामनस्वामींची समाधि बांधली असून, ज्या शिगांव-कोरेगांवीं त्यांचा चिरकाल अधिवास घडला, तेथें त्यांच्या पादुकांची स्थापना करून वृंदावनही बांधलें आहे. वामनस्वामींनीं शेंवटीं संन्यास घेतला होता असा सर्वत्र समज आहे, व शिगांव-कोरेगांव येथील नारायणाच्या आरतींत[१] 'वामनसंज्ञकयतये बोधित-निजमहिमन्' असा उल्लेख असल्यामुळें, तो खरा मानण्याकडे प्रवृत्ति होते. पण वामनपंडितांसारखा अद्वैत बाणलेला अधिकारी पुरुष, मुंडनादि विधि-युक्त संन्यास घेईल याची अशक्यता पटून, रा. रा. म. आठवले यांनीं राजाराम प्रसादीचाच हवाला[२] खरा मानला आहे, व वामनस्वामींनीं संन्यास घेतला नसून, त्यांचें अग्निहोत्र अंतकालपर्यंत अबाधित चाललें होतें, असें आपलें स्पष्ट मत दिलें आहे.[३]

वामन पंडितांचा निश्चित असा जन्मशक माहित नसल्यामुळें, रामदास व पंडित यांच्या गुरुशिष्यत्वाच्या नात्याप्रमाणेंच, पंडित, रामदासापेक्षां वयानें लहान असावे, असें निराधार मत[४] आजपर्यंत चालत आलें आहे. वास्तविक काशीहून आल्यावर महाराष्ट्रांत व इतरत्र आत्मज्ञानाची प्रतीति देणाऱ्या गुरूच्या बाबतींत जी तीव्र निराशा पंडितांच्या पदरीं आली, तिच्यावरून तत्कालीं कोणाही सत्पुरुषाचें त्यांच्यावर वजन पडलेलें नव्हतें. शिवाय ते व रामदास, समकालीन असूनही रामदासांच्या नवीन रामसंप्रदायाचा पगडा पंडितांवर न बसतां, ज्याअर्थी ते एकनाथापासून चालत आलेल्या कृष्ण-भक्तीलाच चिकटून बसलेले दिसतात, त्याअर्थी पंडित रामदासांच्या कह्यांत

---

१ वामनपंडितकृत कवितासंग्रह–भाग २ (द्वि. आवृ.) पृ. ३२०. २ 'सावरिता झाला शोक । उत्तरविधान करणें आवश्यक । तों अग्निहोत्रक असे वामनासी देख । अग्नि लौकिक कामा नये ॥–भक्तमंजरी-माला–४१।७७. ३ रत्नाकर मासिक–सपटंबर १९३२. ४ ज. र. आजगांवकर–महाराष्ट्र कविचरित्र–भाग १, पृ. १८१.

न जाण्याइतके वडील असावे, अशी एक कल्पना अलीकडे माझ्या मनांत पुष्कळ दिवस ठाणें देऊन बसली होती. पण रा. दा. के ओक यांनीं तिलाच अलीकडे वाचा फोडली असून,[१] 'विजापूरच्या बादशहानें देऊं केलेला सरंजाम झुगारून काशीस शास्त्राभ्यासार्थ जातांना पंडितांचें वय २०।२५ वर्षांच्या दरम्यान असावें, काशीस १२ वर्षें विद्या शिकून परत आल्यावेळीं त्यांचें वय ४०।४१ वर्षांचें असावें, शके १५६६ हा रामदास-पंडितांच्या पहिल्या भेटीचा काल प्रसिद्ध असल्यामुळें, पंडित या वर्षी ४० वर्षांचे असावे, व शके १५९५ मध्यें लिहिलेल्या 'निगमसारां'त त्यांनीं आपल्या गुरूपदेशाचें वर्णन केलें असल्यामुळें, हा गुरूपदेश पंडितांच्या सत्तराव्या वर्षी झाला असावा,' इत्यादि विधानांवरून पंडितांचा जन्मशक, त्यांनीं शके १५२५।३० च्या दरम्यान जो ठरविला आहे, त्याला मान्यता देण्यास मला हरकत दिसत नाहीं. पंडितांचा निर्वाणशक १६१७ हाही सर्वमान्य झाला असल्यानें, वामनपंडितांची एकंदर हयात ९०।९१ वर्षांची होती, या रा. ओकांच्या कालगणनेसही कोणाचा अडथळा येण्याचें कारण नाहीं. तथापि या कालप्रकरणाला माझ्या मतें आणखी एका अधिक विश्वसनीय पुराव्याचा पाठिंबा मिळण्यासारखा आहे. समर्थकालीन प्रसिद्ध साधु रंगनाथस्वामी निगडीकर यांच्या प्रसिद्ध संतमालिकेंत,[२] वामन-स्वामींचा उल्लेख रामीरामदासानंतर लगेच केला गेला असून, समर्थांचा तर तिच्यांत निखालस निर्देशच नाहीं हें उल्लेखनीय आहे. यावरून वामनस्वामी हे रामीरामदासांपेक्षां थोडे लहान तर समर्थांपेक्षां वडील अशी रंगनाथांची देखील समजूत होती, असें दिसून येतें. रामीरामदासांचा जन्म शके १५२७ हा असल्यानें वामनपंडितांचा जन्मशक, त्या मानानें एकाददुसऱ्या वर्षानें नंतरचा, म्हणजे शके १५२८, हा मानणें युक्त होईल. तसेंच त्यांनीं शके १५९५ मध्यें रचलेल्या 'निगमसारां'त त्यांच्या गुरूपदेशाचा उल्लेख असल्यानें, तो प्रसंग शके १५९२।९३ मध्यें घडला असें मानल्यास त्या-वेळीं, रा. दा. के. ओक म्हणतात तसें पंडितांचें वय सत्तर वर्षांचें न होतां, तें ६४ वर्षें असणेंच अधिक सयुक्तिक ठरतें. पंडितांचा जीवनकाल याप्रमाणें शके १५२८ ते १६१७, म्हणजे एकंदर ८९ वर्षांचा मानावा लागतो.

---

१ वामनपंडितकृत कवितासंग्रह-भाग २, उपोद्घात पृ. १९-२०.
२ महाराष्ट्र कवि मासिक-अंक ४-पौष शके १८२५.

पंडितांचा काल हा शिवकालच असल्यानें, तत्कालीन भाषेचें वैशिष्ट्यही त्यांच्या भाषेंत सांपडून वरील कालनिर्णयास अंतर्गत पुराव्याचेंही पाठबळ मिळेल, अशी अपेक्षा केल्यास ती मात्र पूर्णपणें सफल होणार नाहीं. फारशी शब्दांचें अल्पत्व, कर्मणीप्रयोग रचनेचा व प्राकृत शब्दांचा अभाव या कांहीं गमकांवरून, वामनपंडित हे सामराजापेक्षां कनिष्ठ अथवा उत्तरकालीन अशी रा. प्र. धों. कानिटकरांप्रमाणेंच[१] माझीही पूर्वी समजूत होती.[२] पण पंडितांच्या कवितेच्या अधिक वाचनानंतर व रंगनाथांच्या संतमालिकेच्या अवलोकनानंतर वरील मतांत आज बदल करणें जरूर झालें आहे. खरें पाहिलें तर वामनपंडितांसारख्या व्युत्पन्न व अनात्मनिष्ठ कवीच्या कालनिर्णयास, त्याच्या भाषेचें प्रमाण विचारांत घेणें थोडें अयुक्तच ठरेल. पंडितांच्या रचनेचें स्वरूप अनुवादात्मक अथवा टीकात्मक असल्यामुळें, साहजिकच प्राकृतापेक्षां संस्कृतप्रचुर मराठी भाषाच तेथें मुख्यत: योजलेली आहे. त्यांना फारशी भाषा उत्तम येत होती, असें त्यांचे चरित्रकार सांगत असले, तरी त्यांनीं अवलंबलेल्या पौराणिक कथानकांचे, प्रसंगच असे अध्यात्मिक व भक्तिपर आहेत कीं, त्यांत फारशी शब्द योजणें विसंगतच गणलें गेलें असतें. तथापि पंडितांच्या मराठी भाषेस शिवकालीन भाषावैशिष्ट्याचा वासच लागला नव्हता, असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. त्यांच्या भाषेंत पातेजता, सिंतरोनी, उगला, बजागी, शिराणी; असे शिवकालीन वाङ्मयांत सांपडणारे प्राकृत शब्द जसे आहेत, तसेंच 'न वजाय' हें जुनें क्रियापद व 'न दिजेल' अशी कर्मकर्तरीप्रयोगरचना अगदीं अल्पप्रमाणांत कां होईना सांपडते. संधि करणें प्राप्त तेथें तो टाळणें, हा देखील शिवकालीन कवींचा एक विशेष, वामनपंडितांत दिसत असून, ग्राम्य शब्दयोजनेची त्यांची हौस, त्यांच्या भोंवतींच्या जीवनाची अथवा खेडेगांवच्या राहणीची निदर्शक मानतां येईल. ज्ञानदेवएकनाथाप्रमाणेंच पंडितांना मराठी भाषेचा जाज्वल्य अभिमान असूनही, मराठी भाषेचें तत्कालीन शुद्ध स्वरूप त्यांच्या ग्रंथांत जें आपणास आढळत नाहीं, त्याला त्यांचें संस्कृत अध्ययन, अध्यात्मिक विषयविवेचन व

---

१ रुक्मिणीहरण निरीक्षण, मुमुक्षु वर्ष, ८, विविधज्ञानविस्तार वर्ष ५९.

२ सामराज–पृ. १०८.

जागतिक व्यवहारापासून अलिप्तता, या गोष्टीच अधिक जबाबदार धरल्या पाहिजेत.

वामनपंडित अगर वानमस्वामी हे श्रीसमर्थ रामदासांपेक्षां जसे वयानें वडील होते, तसेच ते शिवकालांतील, सामराज, नागेश, विठ्ठल व रघुनाथपंडित इत्यादि कलाकवींहून देखील जेष्ठ होते, हा वरील विवेचनांत आलेला मुद्दा थोडाफार नवीन असून, शिवकालीन कवींचा अभ्यास करणाऱ्यास अभिनव दृष्टि देणारा आहे. रामदास व वामनपंडित हे शिवकालीन वाङ्मयसागरांतील दोन प्रचंड दीपस्तंभ असून, या दोघांनीं कवींच्या पुढील अनेक पिढ्यांना निश्चित व दूरवर मार्गप्रदर्शन केलें आहे. समर्थांनीं आपल्या व्यवहार व राजकारणाच्या शिकवणुकीनें निवृत्तिपर निद्रिस्त समाजाला कार्यप्रवृत्त व कर्तव्यतत्पर केलें, तर पंडितांनीं आपल्या खंडकाव्यात्मक नूतन काव्यप्रकारानें, व विविधाक्षरगणवृत्तात्मक सगुण सालंकार रचनेनें कलाकवींच्या एका नवीन सांप्रदायास जन्म दिला. या दोघांचीं काव्यें म्हणजे जीवन व कला यांचा मधुर संगमच असून, या संगमावर आजपर्यंत कितीजणांना अवगाहनाचें पुण्य लाभलें असेल तें काय सांगावें!



# नागेश : ३

मुक्तेश्वराच्या कालानंतर येणाऱ्या उज्ज्वल अशा शिवकालांत, तुकाराम, रामदास इत्यादि स्वतंत्र रचना करणाऱ्या संतकवींबरोबरच मुक्तेश्वराच्या लालित्यप्रधान रचनेची प्रथा चालविणारे अनेक रसिक कलाकवि निर्माण झाले. अध्यात्माच्या किंवा भक्तीच्या पार्श्वभूमिकेवर आपल्या रसिकतेचे व कल्पकतेचे मनोरे उभारतांना, फारशा मोठ्या रचनेच्या पाठीं न लागतां, महाभारत, भागवत व रामायण अशा पुराणग्रंथांतील आख्यानें व स्वयंवर-प्रसंग मराठींत आणण्याचा त्यांनीं मोठा अभिनंदनीय उपक्रम केला. या कालांत झालेल्या कलाकवींत वामनपंडित, सामराज, नागेश, विठ्ठल व रघुनाथपंडित यांचा प्रामुख्यानें समावेश होत असून, यांतील वामन व विठ्ठल वगळल्यास, बाकीचे तिघेही राजदरबारपरिचित, व्यवहारदक्ष, बहुश्रुत व मर्मज्ञ असल्याचें दिसून येतें. राजाश्रय अथवा कोणा सरदाराचा आश्रय लाभल्यामुळें, काव्यनिर्मितीची आपली हौस त्यांना मनसोक्त पुरवता येऊन, आपल्या अंगच्या कवित्वगुणांचा आविष्कारही त्यांस भरपूर करतां आला.

वामनानें, भागवत व रामायण यांतील बहुतेक ठळक प्रसंग व आख्यानें अत्यंत रसिकतेनें वर्णिलीं असून, विठ्ठलानें द्रौपदीस्वयंवर, सीतास्वयंवर, बिल्हणचरित्र व रसमंजरी, तर सामराज व रघुनाथपंडित यांनीं अनुक्रमें रुक्मिणीहरण व दमयंतीस्वयंवर हे आपल्या काव्याचे विषय कल्पिले आहेत. काव्याचा हेतु परमार्थ अथवा ईशचिंतन हा सनातन दंडक पार बदलून, मराठी वाचकवर्गाला काव्यानंदाची खरी माधुरी याच कवींनीं प्रथम चाखण्याची संवय लावली. या कालांत संस्कृत पंचमहाकाव्यांच्या धर्तीवर ज्यांनीं अनेक वृत्तात्मक सरस व सालंकार अशीं महाकाव्यें व खंडकाव्यें मराठींत निर्माण केलीं, त्यांत नागेशाचा क्रमांक बराच वरचा लागतो.

नागेशाचें 'सीतास्वयंवर' आपल्या 'महाराष्ट्र–कवीं'तून प्रसिद्ध करतांना जोडलेल्या प्रस्तावनेंत, कै. भाव्यांनीं या कवीचें वृत्त दिलें आहे.[१]

---

१ 'महाराष्ट्रकवि'–शके १८२६ भावे.

आपल्या काव्यांत ' नागेश, ' ' नागदेव, ' ' नागजोशी, ' ' नागेंद्र, ' अशा शब्दांनीं आपल्या नांवाचा उल्लेख करणारा, पण नागभट्ट हें खरें नाभाभिधान धारण करणारा हा कवि, अहमदनगराजवळील भिंगारचा[१] रहिवासी असून त्याचे वंशज अजूनही तेथें राहतात. गांवाच्या अगदीं शेवटास याचें राहतें घर असून, गांवाशेजारींच असणाऱ्या लहानशा ओढ्याच्या कांठीं याच्या घराण्यांतील मृतपुरुषांच्या समाधि आहेत. त्यांतली कोणती समाधि कोणत्या पुरुषाची, हें तर कोणास सांगतां येत नाहींच; पण आपल्या गांवांत " नागेश ' नांवाचा कोणी कवि होऊन गेला, अशी गंधवार्ताही हल्लींच्या नागेशाच्या वंशजास किंवा भिंगार येथील लोकांस नाहीं. इ. स. १९०४ सालीं कवीच्या वंशजांपैकीं त्रिवेणीबाई या नांवाची एक सुमारें ऐंशी वर्षांची वृद्ध विधवाबाई होती. वृद्धापकाळामुळें तिची स्मरणशक्ति असावी तशी नसली, तरी आपल्या घराण्यांतील पूर्वजांचीं नांवें सांगतांना, ' कोंड जोशी, ' ' मोर जोशी, ' ' नाग जोशी, ' ' नरसिंह जोशी ', अशीं कांहीं नांवें, व त्यांच्यासंबंधीं कांहीं अव्यवस्थित माहिती, आणि ' अमावास्येच्या दिवशीं चंद्र दाखविला, ' इत्यादि ठराविक हकीकतीच्या आख्यायिका, ही बाई सांगत असे. हिच्या दोन्ही चिरंजिवांस हेंही ज्ञान नव्हतें, असें कै. भाव्यांना आढळून आलें होतें.

नागेशाच्या वडिलांचें नांव मोर जोशी असून, आईचें नांव जानकीबाई असें होतें. मोर जोशास मल्हारी, त्र्यंबक व नागेश असे तीन मुलगे असून सर्वांत धाकटा जो नागेश तोच कवि म्हणून प्रसिद्धि पावला. मधला " त्र्यंबक जोशी बिन मोर जोशी, कसबे भिंगार यांसी शके १५९१ सौम्य नाम संवत्सरे जेष्ठ शु. सप्तमी वार शुक्रवार ते दिवशीं " एका कुळकर्ण्यानें लिहून दिलेला महजर प्रसिद्ध आहे.[२] नागेशानें स्वतःसंबंधींची जी माहिती आपल्या ' चंद्रावळीवर्णना 'च्या[३] शेंवटीं दिली आहे, तिच्यांत वडिल मातुश्री व दोन जेष्ठ बंधू यांचीं नांवें देतांना, स्वतःच्या कवित्वाबद्दल मोठाच आत्मविश्वास प्रगट केला आहे.[४]

---

१ पहा. 'भृंगारवासी कवि नागजोशी'–चंद्रावळीवर्णन ३१७. २ महाराष्ट्र सारस्वत, आवृत्ति ३. भाग २–भावे. ३ काव्यसंग्रह २३–चंद्रावळीवर्णन–उपसंहार. ४ " तया धाकुटा तोच नागेश पाहे; कवित्वीं जया ज्ञान संपूर्ण आहे."

या कुटुंबाची वृत्ति ग्रामजोशाची व ग्रामलेखाची–कुलकर्ण्याची होती. आपल्या काव्यांत नागेशानें सीतास्वयंवरास जाणाऱ्या भटजींचें व त्यांच्या शिष्योपशिष्यांचें केलेलें विनोदी पण यथातथ्य वर्णन, शिष्यांच्या भाषणांत आलेला तूळ, मकर या लग्नांचा कोटीयुक्त उल्लेख, लहान रामाला प्रचंड शिवधनुष्य उचलेल कीं नाहीं, या भीतीनें सीतेनें धनुष्यावर केलेलीं अनिष्ट ग्रहांचीं रूपकें, सीतारामचंद्रांच्या विवाहप्रसंगीं बारिकसारीक सोहळ्यांचें व धार्मिक विधींचें त्यानें केलेलें वर्णन व विवाहापूर्वी गणपतिस्थापना आधीं कीं, कलशस्थापना आधीं, या मुद्द्यावर झालेलें भटजींचें भांडण, या गोष्टी नागेशाची जोशीवृत्ति व भिक्षुकाच्या जीवनक्रमाशीं त्याचा असणारा निकट परिचय स्पष्टपणें दर्शिवतात. नागेश हा वत्सगोत्री माध्यंदिन शाखेचा यजुर्वेदी ब्राह्मण असून, त्याचें उपनांव मुळे व आराध्य दैवत त्रिभांडेश्वर होय. जोशीवृत्ति अजूनही याच्या वंशांत चालते. विद्वत्तेबद्दल एकेकाळीं याचें घराणें चांगलेंच प्रसिद्ध असून, नागेशाचे वडील मोर जोशी स्वतः पंचांग वर्तविण्याइतके विद्वान् ज्योतिषी होते. नगरप्रांतीं होऊन गेलेल्या कोकाट्या यशवंतराव नांवाच्या श्रीमंत सरदाराचा मोर जोशी हा पुरोहित होता, असें नागेशानें आपल्या 'चंद्रावळीवर्णनां'त म्हटलें आहे.[१] या यशवंतराव कोकाट्याची कांहींच माहिती उपलब्ध नसली, तरी आमचा कवि त्याला 'विख्यात राजा' म्हणतो एवढें खरें. मोर जोशासही बरी वाईट कविता करण्याचा नाद होता असा तर्क त्याच्या घरच्या कागदपत्रावरून कै. भाव्यांनीं ज्या अर्थी केला आहे, त्या अर्थी कवित्वगुण नागेशाला त्याच्या वडिलां-पासून परंपरेनें प्राप्त झाला असणें अधिक संभवनीय दिसतें.

आपल्या अंगांत कौशल्य नाहीं[२] असें म्हणणारा नागेश, विनयामुळेंच बहुधा असें म्हणत असावा. सीतेचें वर्णन करतांना सनक किंवा बृहस्पती-सारखे जेथें हतबुद्ध झाले, तेथें आपल्यासारख्या यःकश्चित् जोशाची स्थिति काय होईल, असें लघुत्व त्यानें आपणहून स्वीकारलें असून,[३] प्राचीन कवीबद्दल त्यानें आदर व्यक्त केला आहे.[४] तथापि हा विनय किंवा आदर,

---

१ चंद्रावळीवर्णन–उपसंहार श्लोक ३. २ सीता स्वयं. २५. ३ सीतास्वयं. श्लोक, २४, २१९. ४ सीतास्वयं. श्लोक ७.

न्यूनगंडांत ( inferiority complex ) मात्र परिणत झालेला नाहीं. उलट त्यांच्या अंगीं योग्य तो आत्मविश्वास वसत होतासें दिसून येतें. एके ठिकाणीं नागेश स्वतःस 'कविसुंदर'[1] व 'श्रीनागेशकवीश्वर'[2] असें संबोधीत असून, आपलें काव्य सर्व पृथ्वीतलावर एकटें शोभणारें व महाकवींनाही मान्य झालेलें आहे, अशी त्याला पूर्ण खात्री आहे. एकंदरीनें पाहतां आपलें 'सीतास्वयंवर' 'विद्वज्जनां मानलें' असा जो त्याला भरंवसा आहे, तो त्याची रचना साकल्यानें पाहतां सार्थच आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं.

नागेश जात्या विनोदी असून, प्राचीन मराठी कवींत त्याच्याइतका विनोदी कवि सांपडणें मुष्कील असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. परशुरामाकडे जाऊन रामावताराची वर्दी देणारा नारद, "पहा विचार कर, आतां तुझा अवतार संपला" असें ठासून सांगत असतां, दोन अलौकिक व्यक्तींच्या या लौकिक संभाषणानें, वाचकांना मौज वाटल्यावांचून रहात नाहीं.[3] त्याचप्रमाणें अहिल्यास्वयंवराच्या वेळीं पृथ्वीला सात प्रदक्षिणा घालून प्रथम परत येणाऱ्यास अहिल्या देण्याचा ब्रह्मदेवानें जाहीर केलेला पण, अष्ट दिक्पतींना व साक्षात् विघ्नहर्त्या गणपतीलाच अवघड वाटून, प्रत्येकानें आपल्या वाहनाच्या दुरवस्थेची सांगितलेली कहाणी देखील फारच मनोरंजक वाटते. दिक्पती किंवा गणपती यांच्यासारख्या प्रभावी देवांना सुद्धां, हा पण कठिण वाटावा, व त्यांनीं अगदीं एकाद्या सामान्य मानवा-प्रमाणें कांहींतरी सबब सांगून आपला आब कोणीकडून तरी राखण्याचा प्रयत्न करावा, हा प्रसंग निःसंशय करमणूक करणारा आहे. आमच्या गणपतीशीं व त्याच्या अवाढव्य दोंदिलाशीं कोणीही मुभा घ्यावी, व तशी ती आमच्या कवीनेंही घेतली आहे.[4] रावणाचें उग्र स्वरूप पाहून सीतास्वयंवरार्थ जमलेल्या राजांच्या उडालेल्या धांदलीचें व फजीतीचें वर्णनही याच मासल्याचें आहे.[5] लौकिक व अलौकिक वस्तू अथवा प्रसंग यामधील विरोधानें विनोद उत्पन्न करण्याची नागेशाची हातोटी विलक्षण असून, स्वभावनिष्ठ विनोद निर्माण करण्यांतही त्याचा सारखाच हातखंडा आहे. रामाच्या पदस्पर्शानें

---

१ सीतास्वयं. श्लोक. ३१. २ चंद्रावळीवर्णन. ३ सीतास्वयं. ३८. ४ सीतास्वयं. श्लो. १०३–१०७. ५ सीतास्वयं–३२६–३२९.

शिळेची सुंदर अहिल्या बनलेली पाहून, आपल्या घरांतल्या हिडिंबा पत्नीऐवजीं डोंगरांतली चांगली लांब शिळा रामाच्या पायाजवळ धरून तिची सुंदर नार बनवून घ्यावी, असें कांहीं सुपीक डोक्याच्या ब्राह्मणांच्या डोक्यांत येतांच, ते डोक्यावर एकेक शिळा घेऊन उभे राहिले. ब्राह्मणांच्या या कामासक्त व लोभी स्वभावाचें व वर्तनाचें कवीनें केलेलें वर्णन, जसें त्याच्या स्वतंत्र कल्पकतेचें द्योतक आहे, तसेंच तें सहृदय वाचकांची हंसून मुरकुंडी वळविणारें आहे.[१] याच प्रसंगीं एक स्त्री घरीं असून देखील रामाकडून दुसरी मिळविण्याच्या फंदांत पडणाऱ्या वरील ब्राह्मणांच्या नांवानें हांका मारणाऱ्या ब्रह्मचाऱ्याचें वर्णनही कांहीं कमी मनोरंजक नाहीं. या ब्राह्मणांनीं दोन दोन बायका केल्यावर एकदांही ज्याचें लग्न झालें नाहीं, अशा आपणांस हात जोडूनच बसावें लागणार, हा वरील ब्रह्मचाऱ्याचा झालेला समज, त्यानें बहुत दिवस कंठलेल्या अविवाहित स्थितीचा व कामुकवृत्तीचा निदर्शक आहे.[२] पुढें सुद्धां ढोंगी गोसाव्याच्या वर्तनाचें शब्दचित्र रंगवितांना, त्याच्या रोजच्या आहाराचें जें प्रमाण दिलें आहे तें वाचून, त्याच्या अपेक्षित त्यागवृत्तीचा व त्याच्या भक्कम आहाराचा मेळ घालतां न आल्यामुळें, वाचकाच्या हास्यांत विस्मयाची संमिश्र छटा उत्पन्न होते. या सर्व अन्नाचा फन्ना हा गोसावी इतक्या लवकर उडवीत असे कीं, शेवटीं चित्राहुतीशिवाय कांहींच उरत नसे.[३] अशा या औदरिकाचें वर्णन जितकें मार्मिक तितकेंच उपहासजनक उतरलें आहे. नागेशाच्या विनोदाचीं हीं उदाहरणें पाहिलीं असतां, त्याचा विनोद बहुतांशीं मानवी स्वभावांतील विरोध व असंबद्धतादर्शनावर आधारला असल्याचें दिसून येईल. असा स्वभावनिष्ठ विनोद, विनोदाच्या इतर जातींपेक्षां उच्च दर्जाचा समजला जात असून, तो उत्पन्न करणाऱ्याच्या अंगीं मार्मिकता व सूक्ष्मता असल्याशिवाय त्याची निर्मिति बहुधा होत नाहीं. सर्वच प्राचीन मराठी कवीवर जडत्वाचा व परतंत्रतेचा आरोप करणारांनीं, नागेशाचीं विनोदीवृत्ति व वर्णनें लक्षांत घेतलीं असतां, विनोदाचा धबधबा वाहविण्याचा अभिनिवेश

---

१ सीतास्वयं.–१३२, १५१. २ सीतास्वयं.–१४८. ३ सीतास्व–१९०, १९१.

बाळगणाऱ्या कोणत्याही आधुनिक मराठी विनोदी लेखकापेक्षां, तो सरस असल्याचें कबूल करावें लागेल.

नागेशाचें ग्रंथकर्तृत्वही त्यामानानें कांहीं कमी आहे असें नाहीं. त्याचें 'चंद्रावळीवर्णन' काव्यसंग्रहांतून प्रसिद्ध झाल्याचें पूर्वीच सांगितलें असून, 'सीतास्वयंवर'ही कै. भाव्यांनीं आपल्या 'महाराष्ट्र कवीं' त प्रसिद्ध केलें होतें. कै. वामन दाजी ओक वगैरे गृहस्थांनीं नागेशाचें 'रुक्मिणीस्वयंवर' पाहिलें होतें असें म्हणतात, पण कै. भाव्यानांही त्याची प्रत उपलब्ध झाली नव्हती. पुनः त्याच्या 'रसमंजरी'चीं कांहीं पानें कै. भाव्यांनीं पाहिलीं होतीं, असें ते सांगतात, पण हाही ग्रंथ साग्र असा सांपडलेला नाहीं. [१] 'शारदा-विनोद' या काव्याचींही कांहीं पानें कै. भाव्यांनीं पाहिलीं असून, या काव्याच्या शेवटीं, "मी भृंगीपुरास (भिंगारास) राहणाऱ्या 'नाना काव्यकलाचतुर श्रीनागराज' कवीनें हा ग्रंथ रचला" असा उल्लेख केला आहे. ग्रंथांत यालाच 'सरस्वतीविनोद' असें सर्वत्र म्हटलें असून, पोथीची नक्कल कोणा 'रघुनाथ' नांवाच्या लेखकानें शके १६२० बहुधान्य संवत्सरीं केलेली आहे. [२]

नागेशाला लिहिण्याचा बराच नाद असून, [३] त्यानें नक्कल केलेल्या अनेक पोथ्या याच्या घराण्यांत आहेत. परंतु हे सर्व हस्तलिखित ग्रंथ म्हणजे या पोथ्यांचीं विस्कटलेलीं सुटीं पानें पोत्यांत भरून कैक वर्षें लोळत पडल्या-मुळें, आजमितीस त्यांतून एकही ग्रंथ पुरा निघत नाहीं. यांपैकीं एक 'स्वप्नासंबंधीं फलाची' पोथी सचित्र असून, कवीस चित्रें काढण्याचा फार नाद असावा असें त्यावरून दिसतें. नागेशाचे कांहीं श्लोक पूर्वीं आबाल-वृद्धांच्या तोंडीं असत, ही एकच गोष्ट, एकेकाळच्या त्याच्या लोकप्रियतेची निदर्शक ठरेल.

सुमारें ५०।५५ वर्षांपूर्वी नागेशाच्या घराण्यांतील पुष्कळ म्हणजे गं. भा. त्रिवेणीबाईच्या मताप्रमाणें शें दोनशें पोथ्या, कोणा महाबळेश्वरकर शास्त्र्यानें त्यांच्या घरून महाबळेश्वरास नेल्या. तेथून पुढें त्या पोथ्या वाईस

---

१ 'महाराष्ट्र कवि'–शके १८२५. भावे. २ महाराष्ट्र सारस्वत, आवृत्ति ३, पृ. ७५. ३ महाराष्ट्र कवि, शके १८२५–भावे.

गेल्याचें कै. भाव्यांना कळलें होतें. यावरून वाईप्रांतीं आमच्या कवीचे कांहीं ग्रंथ सांपडण्याचा मात्र बराच संभव आहे.

नागेशाच्या ग्रंथांचीं नुसतीं नांवें, व त्याच्या उपलब्ध काव्यग्रंथांचें अंतरंग लक्षपूर्वक पाहिल्यास, त्याच्या विद्वत्तेबद्दल व अध्ययनाबद्दल खरी कल्पना येण्यासारखी आहे. 'चंद्रावळीवर्णन' हें आख्यान त्यानें अग्नि-पुराणाच्या आधारें रचिलें असून, आपल्या 'सीतास्वयंवरा'ला त्यानें विठ्ठल-बीडकराप्रमाणेंच

"कांहीं श्रीहनुमंत नाटककथा, कांहीं रघूवंशिची।
कांहीं आदिकविप्रमेयरचना, कांहीं गिरा देशिची ॥"

अशा ग्रंथांचा आधार घेतलेला दिसतो. 'सीतास्वयंवरां'तील कांहीं श्लोक,[१] हनूमन्नाटकांतील तशाच श्लोकांचा स्पष्ट अनुवाद असून, तेथील कांहीं वर्णनां-वरून सामराजाप्रमाणें आमच्या कवीचाही 'रघुवंशा'शीं असलेला दृढ परिचय दिसून येतो. स्वयंवराच्या मंडपांत जमलेल्या राजांची माहिती सांगतांना, सीतेची सखी रामाचें व त्याच्या पूर्वजांचें जें वर्णन[२] करतें, तें रघुवंशाच्या पहिल्या व पांचव्या सर्गापासून नवव्या सर्गापर्यंतच्या कथाभागां-वरून रचिलें आहे. रंगमंडपांत जमलेल्या राजांचें निरीक्षण करीत सीता चालली असतां, राजांनीं केलेल्या शृंगारचेष्टा[३], रघुवंशाच्या सहाव्या सर्गांतील इंदुमतीच्या स्वयंवरांतील राजांची आठवण करून देतात. इंदुमतीची सखी जशी सुनंदा, तशी सीतेची जया, हें साम्य देखील 'रघुवंशा'च्या छायेचेंच स्पष्ट द्योतक असून, धनुर्भंगानंतर, राम शिबिकारूढ होऊन विवाहाकरितां जनकगृहीं जात असतां, त्याची मिरवणूक पाहण्यास सरसावलेल्या पौरस्त्रियांची जी धांदल नागेशानें वर्णिली आहे,[४] ती तर रघुवंशाच्या सातव्या सर्गांतील अजराजाच्या अशाच मिरवणुकीचें निवळ प्रतिबिंब आहे. 'चंद्रावळीवर्णनां'त चंद्रावळीचें अवयववर्णन व 'सीतास्वयंवरां' तील सीतेच्या आपादमस्तक अवयवांचें केलेलें वर्णन, संस्कृत कवींच्या संकेतास धरून असून, नागेशाचा पंचमहा-

---

१ सीतास्व.–३२०, ३५९. २ सीतास्व.–२७८–२८३. ३ सीतास्व.–२७३–२७५. ४ सीतास्व.–३८४–३८७.

काव्यांशीं असणारा परिचय त्यावरून स्पष्ट होतो. सीतेच्या निरनिराळ्या अवयववर्णनांत साधलेले, व्यतिरेक, हेतूत्प्रेक्षा, अपह्नुति व रूपक इत्यादि अलंकार, त्याच्या साहित्यशास्त्राच्या ज्ञानाची साक्ष देत असून, सीतास्वयंवरास हजर राहण्यास गेलेल्या ऋषिमंडळींचा उल्लेख करतांना,[१] प्रत्येक ऋषीच्या प्रभाववर्णनावरून त्याचें नांव सूचित करण्याची त्याची कौशल्यपूर्ण पद्धतीही, भागवत पुराणासारख्या पुराणांचें त्याचें अवलोकन सिद्ध करते. नागेशाची 'रसमंजरी' म्हणजे, भानुदासाच्या 'रसमंजरी'चें रूपांतर असून, रामाच्या विवाहसमयींच्या मिरवणुकींत असणाऱ्या स्त्रियांचीं चित्रिणी, पद्मिनी, हस्तिनी व शंखिनी अशा चार जातींच्या स्त्रियांचीं जीं लक्षणें[२] त्यानें दिलीं आहेत, तीं तर 'अनंगरंगां'त दिलेल्या अशाच वर्णनाचा अक्षरशः अनुवाद आहे. नागेशासारखा रसिक कवि असे कामशास्त्रविषयक ग्रंथ दृष्टीआड करणार नाहीं यावरून, व त्यानें आपल्या काव्यांत ठिकठिकाणीं योजलेल्या संस्कृत शब्दांवरून त्याच्या संस्कृत भाषेच्या ज्ञानाबद्दल शंकाच रहात नाहीं. बहुश्रुततेनें एकादा कवि कांहीं संस्कृत शब्द योजील, पण जेथें तो अखर्व, प्रमाणिक, सुरगोप, धम्मिल्ल, मनु, विभाकर, देशांतक, विंशतिनेत्रशंका, धिषण, हिमवासनाहीं, आरव, मेढा, व परिपाक, असे अगदीं अपरिचित शब्द योजतो, तेथें संस्कृत भाषेचें पूर्ण ज्ञान अथवा विस्तृत वाचन असल्याशिवाय तो ते कसा योजील? 'सीतास्वयंवरां'तील विश्वामित्रानें केलेली गंगेची स्तुति, रामानें शिवधनुर्भंग केल्यावर सीतेनें केलेली रामाची स्तुति,[३] अथवा सीतेचें कुचवर्णन[४] हे भाग वाचले असतांही, त्याच्या संस्कृतप्रचुर रचनेची थोडी कल्पना येईल. शिवाय 'ज्ञान, अज्ञानिया सांग जो शीकवी,' या चरणावरून व 'आगमसूत्रा' या रामास लावलेल्या विशेषणावरून, वेद, वेदांगें नागेशाच्या कानावरून तरी गेलीं असावीं, असें वाटतें. 'रामरक्षेचा' त्यानें केलेला उल्लेख[५] तसा महत्त्वाचा नसला, तरी 'हनहतलामा' हें रामास दिलेलें विशेषण व केवळ प्राकृतांतच रूढ असणाऱ्या 'मकरकशीर्षा' वृत्ताची त्यानें केलेली योजना, त्याच्या प्राकृतभाषाज्ञानाचा थोडाफार पुरावा देतात.

---

१ सीतास्वयं–७०. २ सीतास्वयं–३७९–३८२. ३ सीतास्व. ३६६–३७०. ४ सीतास्व. २४०. ५ सीतास्व. ३३०.

वरील प्रपंचाचा निष्कर्ष इतकाच कीं, नागेशाचें संस्कृत भाषेचें व वाङ्मयाचें ज्ञान उत्तम असून, त्यानें वाचलेल्या संस्कृत भागांचा मराठी अनुवाद करून तो योग्य स्थलीं योजण्याचें त्याचें कौशल्यही विलक्षण आहे. पंचमहाकाव्यें व तदनुषंगिक ग्रंथ त्यानें चिकित्सेनें अभ्यासल्याचें प्रत्यंतर, त्याचीं काव्यें पदोपदीं देतात. अलंकारांचा व छंदःशास्त्राचाही अभ्यास त्यानें कसोशीनें केलेला असून, काव्य, नाटक, पुराणग्रंथ व अनंगरंगासारखे कामशास्त्रविषयक ग्रंथ, त्यानें रसिकतेनें वाचले होते. असें असतां कांहीं ठिकाणीं केवळ यमकानुप्रासाकरितां थोड्या संस्कृत–मराठी शद्बांची त्याच्या हातून ऱ्हस्वदीर्घाच्या बाबतींत ओढाताण झाली म्हणून, "त्याचा संस्कृत भाषेशीं साधारण परिचय असावा,"[१] असें म्हणणें कितपत न्यायाचें होईल ? वामनपंडितांच्या रचनेंतहि अशी ऱ्हस्वदीर्घाची ओढाताण कांहीं कमी झालेली नाहीं! पण त्यांच्या संस्कृत भाषाज्ञानाबद्दल असें शंका घेण्याचें धाडस आजपर्यंत कोणीं केलेलें नाहीं. नागेश खऱ्या अर्थानें विद्वान् होता किंवा नाहीं हा प्रश्न विवाद्य असला, तरी तो उत्तम संस्कृतज्ञ असून त्या भाषेंतील ललित वाङ्मयाचें त्यानें सूक्ष्म अध्ययन केलें होतें, याबद्दल कोणाचेंच दुमत होण्यासारखें नाहीं.

तथापि नागेशाच्या अध्ययनास त्याच्या बहुश्रुततेची जोड मिळाली होती. यशवंतराव कोकाट्यासारख्या जहागीरदाराच्या पदरीं वागण्याचें भाग्य लाभल्यामुळें, श्रीमंतांच्या तैनातींत असणाऱ्या अनेक गोष्टींचें त्याला प्रत्यक्ष ज्ञान घडलें होतें. ललकारणाऱ्या भालदार चोपदारांचा व राजांच्या पटाईत शिपायांचा त्याला जसा नित्याचा परिचय होता,[२] तसाच "हुद्दा फिरल्यावर माणसाची फार लाजिरवाणी स्थिति होते," असें[३] नारदाच्या तोंडून परशुरामास सांगतांना, त्याच्या डोळ्यापुढें नित्याच्या घडणाऱ्या राजकीय उलाढालीमधील त्याचा मुरब्बीपणा स्पष्ट होतो. नागेश मोठा चौकस असून, आपल्या कालच्या अनेक गोष्टींचें ज्ञान त्यानें फार परिश्रमानें मिळविलेलें दिसतें. सीतास्वयंवरास जमलेल्या राजांच्या यादींत, त्यानें आपल्या कालच्या

---

१ महाराष्ट्र कवि, शके १८२५–भावे. २ सीतास्व–१७०, १७३.
३ सीतास्व–३९.

महाराष्ट्र, सौराष्ट्र, चव्हाण, राणे, तुंगार, शृंगार, मोरे, गोरे, तोरे, गुजर, सिरसाट, संक्राड व साटे इत्यादि मराठा राजांचीं नांवें गोंविलीं आहेत. कदाचित् ज्या यशवंतराव कोकाट्यांचा या घराण्याला आश्रय होता, त्याच्याच परिचयानें वरील मराठा सरदारांची माहिती त्याला झाली असावी. पुढें नागेशानें अगस्त्याश्रमांतील फळाफुलांच्या वर्णनानें व सीतेच्या अंगावरील बारीकसारीक दागिन्यांनीं आपल्या काव्याला मोठी संपन्नता आणली असून, अशीं वर्णनें सामराजांच्या अगर रामदासांच्या[१] ग्रंथाशिवाय इतरत्र क्वचितच सांपडतात. त्यांतही आमच्या कवीनें सीतेच्या अंगावरील दागिने सांगतांना अशा कांहींचा उल्लेख केला आहे कीं, ते त्याच्यासारख्या साक्षेपानें माहिती जमविणाऱ्या शोधकाशिवाय सांगतांच येणार नाहींत. सोळाव्या शतकांत रूढ असणाऱ्या बायकांच्या दागिन्यांचें नागेशानें साग्र प्रदर्शनच मांडलें असून, इतकें तपशीलवार वर्णन निरंजनमाधवाशिवाय कोणाही मराठी कवीनें केलेलें नाहीं. डोक्यांतील दागिन्यांत, मोर, बोर, कांसव, मासा, आवळे, सालफळ, बेलफळ हे जसे विशेष आहेत, तसेच नाकांतील दागिन्यांत फुली, बेंसर, मोर, मोती व नथ अशीं पांच नांवें उल्लेखनीय आहेत.[२] कानांतील 'तोंगलें' व 'नागोत्तरें' नवीनच असून, गळ्यांतील अंबरसा, हयकोल, अहिदोरा, व हंबेल, बोटांतील जेहगीर व पायांतील 'जेहर' हे मुसलमानी पद्धतीचे दागिने, नागेशाच्या काळीं अहमदनगर प्रांतावर असणाऱ्या मुसलमानी अंमलाची साक्ष देतात. मिथिलेंत वाजणाऱ्या कर्णे, नफेऱ्या, नगारे, तुतारे, दमामे इत्यादि अनेक वाद्यांचा[३] किंवा रामाच्या हातांतील बांकदार, भाला, समशेर, तरवार व पराणी इत्यादि हत्यारांचा,[४] आमच्या कवीनें उल्लेख करून आपली बहुश्रुतता अशीच व्यक्त केली आहे. हीं हत्यारें त्याच्या काळीं मराठा सरदारांच्या उपयोगांत असतीलही कदाचित्. पण याहीपेक्षां रामाच्या घरच्या घोड्यांच्या जाती[५] सांगतांना मात्र, नागेशानें आपल्या चौकसपणाची कमालच केली आहे.

---

१ रामदास–ब्रह्मारण्यवर्णन–रुक्मिणीहरण निरीक्षण–प्र. धों. कानिटकर–पान २. २ रुक्मिणीहरण निरीक्षण–पान ५. ३ सीतास्व–१६८. ४ सीतास्व–२९२. ५ सीतास्व–२९७–२९८.

अहमदनगरसारख्या राजधानींत व कोकाटे सरदाराच्या दरबारीं त्यानें हें अश्वजातिशास्त्र अवगत करून घेतलें असावें. या बहुश्रुततेच्या गुणामुळेंच श्रीरामकालीन वर्णनप्रसंगीं स्वकालीन मुसलमानी भूषणांचा, वाद्यांचा व हत्यारांचा उल्लेख करून नागेशानें कालविपर्यासाचा दोष पत्करला असला, तरी याच दोषामुळें आपणांस नागेशाच्या कालाचा व तत्कालीन परिस्थितीचा कयास बांधण्यास मदत होत असल्यानें, तोच आपणांस उलट उपकारक झाला आहे.

तरी देखील नागेशाची ललितवाङ्मयवाचनाची अभिरुचि, त्याचें चित्रकलेचें ज्ञान, त्याची बहुश्रुतता व चौकसपणा लक्षांत घेतां, 'शारदा विनोद' या त्याच्या काव्यांत 'नानाकाव्यकलापचतुर नागराज कवि' असा जो स्वतःसंबंधीं त्यानें निर्देश केला आहे, तो सार्थ मानावा लागतो. आपल्या रसिक अभिरुचीप्रमाणें, वाचलेल्या ग्रंथांतून चटकदार व रसभरित कथाप्रसंग तो निवडून काढतो. या त्याच्या शृंगाररसप्रिय वृत्तीमुळेंच एवढ्या अग्नि-पुराणांतून 'चंद्रावळीवर्णन' तेवढेंच त्याला स्वीकरणीय वाटलें. चंद्रावळी-नामक एका गवळ्याच्या स्त्रीवर भुलून, श्रीकृष्णानें तिच्या बहिणीच्या रूपानें तिची एकांतांत गांठ घेऊन तिला चकित केल्याचें वर्णन देणारें हें आख्यान, नागेशानें विशेष कौतुकानें खुलविलें आहे. आमच्या कवीची सौंदर्यसमीक्षाही त्याच्या रसिक वाचनाचें परिणत फल असून, आपल्या रसिक वृत्तीस व सौंदर्य-पिपासु दृष्टीस वाव मिळावा, म्हणून विषयांतर पत्करूनही नवीन प्रसंग तो स्वप्रतिभेनें निर्माण करतो. 'सीतास्वयंवरां'तर्गत अहिल्योद्धारप्रसंगीं ब्राह्मणांच्या अनेक टाकाऊ स्त्रियांचीं जीं वर्णनें, व तद्विरोधी पत्नीत्वास सर्वस्वीं ग्राह्य अशा सुंदर स्त्रियांचीं जीं लक्षणें त्यानें दिलीं आहेत, तीं त्याच्या सौंदर्यदिदृक्षेचींच प्रतीकें समजलीं पाहिजेत. त्याचप्रमाणें रामाच्या मिरवणुकींतून जाणाऱ्या स्त्रियांच्या वर्णनांतही नागेशाची मार्मिकता दिसून येत असून, "स्त्री आपल्या कोणत्या अवयवसौष्ठवानें पुरुषाच्या नजरेंत भरेल, तें सांगतां यावयाचें नाहीं," हें तत्त्व वरील वर्णनानें सुचविण्यांत त्याचें पुरुषस्वभावपरिज्ञान चांगलेंच व्यक्त झालें आहे.

पण कित्येक वेळां नागेशाचा ताळ सुटून त्याच्या रसिकतेची मजल अश्लीलतेपर्यंत अथवा बीभत्सतेपर्यंतसुद्धां जाते. रसिक माणसांत हा प्रकार सर्व-

साधारण असला, तरी 'त्यांत थोडा गांवढळपणा आहे' असें कै. भावे जें म्हणतात,[1] तें चंद्रावळीबरोबरच्या गोपांगनांनीं श्रीकृष्णाच्या संवगड्यांना हांसडलेल्या कांहीं अश्लील शिव्यांवरून अगदीं खरें वाटतें.[2] आपल्या 'सीतास्वयंवरां'तही अहिल्या-इंद्राच्या रतिप्रसंगींच्या संभाषणांत,[3] व पुढें भोंदू गोसाव्याच्या कावेबाज वर्णनांत,[4] नागेशानें सद्भिरुचीचा भंग करणारी भाषा वापरली आहे. चार लोकांत जे शब्द उच्चारतांना मनाला खंत किंवा किळस वाटावी, ते काव्यांत योजतांना आमच्या कवीला कवडीची दिक्कत वाटलेली नाहीं! ब्राह्मणांच्या कुरूप स्त्रियांचीं लक्षणें,[5] रावणाला पाहून राजांची उडालेली गाळण,[6] अथवा शिवधनुष्य उचलतांना रावणाची झालेली फजीति,[7] हीं स्थळें वरील विधानाची सार्थता पटविणारीं आहेत. कदाचित् आपल्या काव्यांत सर्वच नवरसांचा परिपोष व्हावा या अभिनिवेशानें, किंवा रावणासारख्या राक्षसी व्यक्तीबद्दल लोकांना घृणा वाटावी म्हणूनही, नागेश अशी भाषा वापरीत असावा. पण एवढे मात्र खरें कीं, अश्लील व बीभत्स यांमधील सूक्ष्म फरक, या कवीनें लक्षांत घेतलेला नाहीं.

बीभत्साची गोष्ट सोडल्यास, अश्लीलत्वाच्या बाबतींत वामनपंडितांसारख्या वेदांती कवीनें आपल्या 'राधाभुजंग' व 'राधाविलास' अशा प्रकरणांत जेथें शृंगाराचा अतिरेक केला आहे, तेथें नागेशाला एकट्यालाच जबाबदार धरून चालणार नाहीं. मुक्तेश्वरानें देखील आपल्या काव्यांत[8] अशा वर्णनास बहर आणला असला, तरी जी गोष्ट संस्कृत कवींनीं केलेली चालते, ती मराठी कवींनीं केलेली पुरवत नाहीं, ही पक्षपाती सनातनी वृत्ति सर्वथा निषिद्ध मानली पाहिजे. कालिदासाच्या मेघदूतांतील कांहीं पांचट श्लोक रसिकांनीं मिटक्या मारीत वाचावे, व तोच प्रकार नागेशासारख्या मराठी कवीनें मराठींत केला म्हणून त्याच्यावर 'अश्लील' असा शिक्का बसावा, याला संस्कृत भाषेची गूढ रम्यताच बहुधा कारण असावी. शृंगारिक मराठी

---

१ महाराष्ट्र सारस्वत-आवृ. ३-पृ. ७५. २ चंद्रावळीवर्णन-२२६-२४०. ३ सीतास्व-११४-११७. ४ सीतास्व. १८५. ५ सीतास्व. १४१. ६ सीतास्व. ३२७-३२८. ७ सीतास्व ३४३, ३४७. ८ शकुंतलाख्यान-आदिपर्व.

काव्यें, संयमानें वाचण्याची संवय वाचकांच्या अंगीं मुरल्याशिवाय वरील मनोवृत्ति नष्ट होणार नाहीं.

नागेशाच्या वर वर्णन केलेल्या गुणाबरोबरच त्याच्या बुद्धीच्या सूक्ष्मतेबद्दलही अवश्य उल्लेख केला पाहिजे. तो डोळे उघडे ठेऊन वागत असल्यामुळें, आपल्या सभोंवतींचें जग त्याला बारकाईनें पाहतां आलें आहे. गुरुशिष्यांचे तत्कालीन संबंध, शिष्यांचा बडबड्या स्वभाव, गोसाव्याचें बकध्यान इत्यादि केव्हां तरी पाहिलेल्या गोष्टी, त्यानें आपल्या स्मृतिसंपुटांत ठेऊन दिल्या होत्या. कोंकणस्थ हे बुद्धीचे तरल असतात असा समज, आतांप्रमाणेंच नागेशकालींही होता असें दिसतें. तसेंच शास्त्रापेक्षां रूढीकडे ग्रामजोशाचें कसें लक्ष असतें, अथवा विवाहविधींतील कृत्यें ठराविक क्रमानेंच झालीं पाहिजेत यावर त्यांचा कसा कटाक्ष असतो, इत्यादि गोष्टींचें सूचक म्हणून दोन भिक्षुकांचें जें भांडण [1] कवीनें वर्णन केलें आहे, तें त्याच्या नित्याच्या व्यवसायापैकींच कोणाला वाटलें, तरी त्याच्या सूक्ष्मावलोकनाचेंच फल समजलें पाहिजे.

आतां काव्याच्या व्याख्येबद्दल संस्कृत साहित्यशास्त्रकारांत मतमतांतराचा जरी गलबला उडालेला असला, तरी 'भावना व कल्पना यांच्या द्वारां रमणीय अर्थाची निष्पत्ति' या काव्याच्या सर्वसाधारण व्याख्येस अनुसरून, नागेशाच्या काव्यांत दोघींचाही विलास पहावयास सांपडतो. आपल्या 'सीतास्वयंवर' काव्यांत नवरसांचा परिपोष झाला आहे, असा त्याचा अभिनिवेश [2] आहे. इंद्र-अहिल्या संभाषणांत शृंगार, तर गौतम-अहिल्येच्या संभाषणांत कारुण्य, रामानें शिवधनुष्य आपल्या पदनखानें उचलण्यांत वीर, तर शिवधनुर्भंग झाल्यावर पृथ्वीतलावर व अन्यत्र उडालेल्या हाहाःकारांत रौद्र, सीतास्वयंवरास जाणाऱ्या गुरु-शिष्यांच्या वर्णनांत हास्य, तर स्वयंवरमंडपांत रावणाच्या आगमनानें राजांच्या उडालेल्या धांदलींत भयानक, ब्राह्मणांच्या कुरूप स्त्रियांच्या वर्णनांत व रावणानें शिवधनुष्य उचलतांना झालेल्या त्याच्या फजीतींत बीभत्स, तर रामपदस्पर्शानें शिळेची अहिल्या बनण्यांत अद्‌भुत, व शेवटीं रामाच्या 'शुभमंगल सावधान' समयीं शांत, अशा नवरसांचा परिपोष निरनिराळ्या

---

१ सीतास्व–४०३–४०६. २ सीतास्व.–३१.

प्रसंगीं आमच्या कवीनें केला आहे. तरी एकंदरींत शृंगार, हास्य व बीभत्स या तीन रसांचेंच प्राधान्य त्याच्या काव्यांत दिसून येईल.

नागेशाला भावनेचा आविष्कार उत्तम साधतो. अहिल्यारूपी शिळेस पाय लावतांना, रामाची चलचित्तवृत्ति व त्यांचें हळुवार मन उत्तम व्यक्त झालें असून, शापित अहिल्येनें गौतमाची केलेली विनवणी, हृदयाला पाझर फोडणारी आहे. प्रचंड शिव धनुष्य व वामनमूर्ति राम यांचा विरोध पाहून, रामाला धनुष्य उचलेल कीं नाहीं, याबद्दल सीतेला लागलेली चिंता, तिनें केलेल्या देवांच्या नवसांमुळें उत्कटतेनें प्रतीत झाली आहे. धनुष्य उचलण्या-पूर्वी रावणाचें ब्रह्मांडाला गवसणी घालणारें भाषण, व धनुष्य उचलतांन त्याखालीं सांपडलेल्या रावणानें सुटकेप्रीत्यर्थ तेथें जमलेल्या राजांची व लोकांची केलेली विनवणी, या परस्परविरोधी प्रसंगांच्या तुलनेनें, एकाच माणसाची भिन्नपरिस्थितींतील भिन्न भावना चितारण्यांत नागेश कसा कुशल आहे, हें पटल्यावांचून रहात नाहीं.

कल्पनाविलासांतही आमचा कवि कोणत्याहि इतर प्रतिभासंपन्न कवी-पेक्षां कमी ठरणार नाहीं. सीतेच्या आपादमस्तक व तपशीलवार वर्णनांत, तिच्या पदनखांवर केलेल्या हेतूत्प्रेक्षा, तिच्या कटीवर केलेले व्यतिरेक, तिच्या रोमराजीचें वर्णन करतांना साधलेल्या हेतूत्प्रेक्षा व अपह्नुति, तशाच पयोधरावरही उभारलेल्या हेतूत्प्रेक्षा, नागेशाच्या बुद्धीचे अनेक नवनवोन्मेष दाखवितात. उत्प्रेक्षा हा एकच अलंकार असा आहे कीं, त्यांत वर्ण्यवस्तूच्या ठिकाणीं कवीला निरनिराळे कल्पनाविलास करितां येतात. नागेशानें याच अलंकाराचा भरपूर उपयोग केला असून, त्यानें केलेल्या शरीरवर्णनांत संस्कृत कवींच्या ठराविक संकेतांच्या आधारें, त्यानें आपल्या योजकतेचें व आंगच्या प्रतिभेचें स्वातंत्र्य कांहीं ठिकाणीं निदर्शनास आणलें आहे. संस्कृत ललित वाङ्मय रसिकतेनें वाचून, त्यांतील ज्या रम्य कल्पना नागेशानें आपल्या मनांत सांठविल्या, त्यांनाच आपल्या प्रतिभेनें बाळसें चढवून, त्यानें सीतेच्या पयोधरादि अवयवांचें वर्णन केलें आहे. या अवयववर्णनाव्यतिरिक्त मिथिला नगरींतील उंच फडफडणाऱ्या निशाणावर आमच्या कवीनें

**‘ काय येत नभिं निर्मळ मासा ’**

अशी जी नाविन्यपूर्ण उत्प्रेक्षा केली आहे, ती तर सर्वांनाच कौतुकास्पद वाटण्यासारखी आहे. भावना व कल्पना यांचें इतकें अभिनव मिश्रण नागेशाशिवाय दुसऱ्या मराठी कवीनें क्वचितच दाखविलें असेल.

काव्याच्या वरील दोन घटकांबरोबरच, नागेशाच्या काव्यांत प्रसाद, ओज व माधुर्य, या त्रिगुणांपैकीं, प्रसाद व माधुर्य यांचेंच अस्तित्व मोठ्या प्रमाणांत आढळून येतें. प्रसाद हा गुण सर्व रसांना पोषक असून, काव्य उच्चारतांच या गुणामुळें, त्याच्या अर्थाचा मनःपटावर होणारा विस्तार अपेक्षित रसाची निष्पत्ति तत्क्षणींच करतो. अर्थसुलभता हा तर आमच्या कवीचा एक विशेष असून, सोप्या शब्दांत वर्णिलेलीं त्याचीं शृंगारहास्यरसादि वर्णनें त्यामुळेंच वाचनीय झालीं आहेत. ‘साहित्यदर्पणां’त दिलेल्या माधुर्याच्या व्याख्येप्रमाणें,[१] मनाला विरघळून टाकणारीं वर्णनें आमच्या कवीच्या काव्यांत फार नसलीं, तरी ‘सीतास्वयंवरां’तील गौतमाश्रमवर्णन[२] व द्रुतविलंबित वृत्तांतील त्याची बहुतेक रचना[३] या गुणाचीही उत्तम प्रतीति आणून देतात.

अर्थाला व रसाला सर्वस्वीं अनुकूल अशी नादवती वर्णरचना ( sound with the sense ) योजणें, हा नागेशाचा आणखी एक विशेष असून, करुण अथवा शृंगाररसवर्णनप्रसंगीं त्याची रचना मृदु, तर रौद्र, भयानक व बीभत्सरसवर्णनप्रसंगीं ती कठोर स्वरूप धारण करते. पण एवढें मात्र खरें कीं, आमच्या कवीला अर्थालंकारांपेक्षां शब्दालंकारांचीच अधिक गोडी आहे. नागेश आपल्या काव्यांत अनुप्रास, यमक व श्लेष यांची अशी लीलया पेरणी करतो कीं, पादांच्या शेवटीं दोन दोन अक्षरांची श्लिष्टच काय, पण चार चार पांच पांच अक्षरांचीं यमकें योजतांना त्याला किमपिही त्रास वाटत नाहीं. नाचे, नाचे; काचे, कांचे; वर दानें, वरदानें; विराजतो, कविराज तो; अशीं कांहीं त्याचीं आवडतीं यमकें आहेत. तरी एवढ्यावरून अथवा त्याच्या काव्यांत एक दोन स्थलीं[४] आलेल्या समुद्र यमकांवरून “मोरोपंतांप्रमाणें पुष्कळ अक्षरांचीं लांब लांब यमकें करण्याच्या हौसेनें यानें आपल्या रचनेस क्लिष्टता आणली आहे”[५] असा आमच्या कवीच्या

---

१ चित्तस्य द्रवीभूतमयोल्हादो माधुर्यमुच्यतें–साहित्यदर्पण. २ सीतास्व–८९–९४. ३ सीतास्व–९०–९५; १२९–१३१; १६३–१६५. ४ चंद्रावळी-वर्णन–२८५; सीतास्व. २८९. ५ महाराष्ट्र सारस्वत आवृ. ३. पृ. ७४–भावे.

रचनेवर सरसहा क्लिष्टतेचा आरोप करणें मात्र वाजवी होणार नाहीं. यमकाकरितां नागेश वामनाच्या मानानें शद्बांची ओढाताण क्वचितच करीत असून, त्याच्या कवितेंत उलट सभंग श्लेषात्मक यमकांची सुंदर उदाहरणें पुष्कळच सांपडतील. अनुप्रास तर त्याच्या रचनेचा आणखी एक महनीय विशेष मानतां येईल.

वरील विवेचनावरून नागेशाचें काव्य सर्व बाजूनें अगदीं निर्दोष आहे, असें म्हणण्याचा उद्देश नाहीं. वृत्तसुखार्थ त्यानें न्हस्वदीर्घांची ढिली[१] रचना केली असून, एकाच श्लोकांत एकदां आलेल्या कल्पनेची त्याच श्लोकांत, किंवा पुढील एक दोन श्लोकांत तो पुनरुक्ति करतो.[२] आतां बीभत्सवर्णनानें त्याच्या काव्यास थोडेंबहुत गालबोट लागलें असलें, तरी हे अल्प दोष वगळल्यास नागेशाच्या काव्यांत भावनांचा व कल्पनांचा रम्य विलास प्रत्ययास येऊन, प्रसाद व माधुर्य या दोन गुणांचा झालेला गौरव तर मुळींच झांकला जात नाहीं. त्याच्या काव्यरचनेवरून साहित्यशास्त्राशीं त्याचा चांगलाच परिचय दिसत असतां, "तसेंच काव्य म्हणावें कशाला? या साध्या गोष्टीसंबंधींची ही यांची कल्पना अगदीं पुसट व अंधुक असल्या-मुळें, त्याच्या काव्यांत अनेक तऱ्हेचे दोष आले आहेत," हा आरोप[३] मग टिकणें कसें बरें शक्य आहे?

वरील काव्यगुणाप्रमाणेंच नागेशाच्या वर्णनशैलींतही त्याचें व्यक्तित्व सामावलेलें आहे. खंडकाव्याच्या सामान्य धर्तीस अनुसरून त्याच्याही काव्यांत व्यक्तिवर्णनें व स्थलवर्णनें यांना योग्य तें स्थान मिळालें असलें, तरी स्थलवर्णनापेक्षां तो व्यक्तिवर्णनांत अधिक रमतो, हें मात्र निःसंशय. कोणत्याही व्यक्तीचें अगर पात्राचें तो अशा कांहीं बारकाईनें वर्णन करतो कीं, ती व्यक्ति अगर तें पात्र वाचकाच्या डोळ्यांपुढें साक्षात् उभें रहावें. गुरुशिष्यांत झालेल्या हास्यविनोदाचें असेंच शब्दचित्र[४] नागेशानें अशा कौशल्यानें काढलें आहे कीं, तसा प्रसंग आपण आपल्या डोळ्यांनीं पहात आहों, असा भास

१ उदा. शिबिकारुढ, क्षिरोदरीं, अनुपम्य, तीन्हे, चरणेकघात—सीता-स्वयंवर. २ सीतास्व—१०, २५, २६, २७४, २७५. ३ महाराष्ट्र सारस्वत आवृ. ३, पृ. ७४. ४ सीतास्वयं—७२—७७.

होतो. निरनिराळे कुरूप शिष्य व गडबड्या स्वभावामुळें तट्टावरून खालीं आपटणारे वृद्ध गुरुजन, तट्टाला फोक मारणारे शिष्य व त्यांच्या माकडचेष्टा, नागेशानें फारच सूक्ष्मतेनें पाहून वर्णिलेल्या दिसतात. ढोंगी व भोंदू गोसाव्याच्या वर्तनाचें वर्णन करून त्यानें तत्कालीन बुवाबाजीवर चांगलाच प्रकाश पाडला असून, अशा गोसाव्याच्या डोळ्याची हालचाल, त्याचा प्रचंड आहार, विधवांना लगामीं लावण्याचें त्याचें कसब इत्यादि गोष्टींवर असलेला आपला कटाक्ष दर्शिवतांना, स्वकालीन एकाद्या गोसाव्याची कुलंगडी बाहेर काढण्याची संधि, या वर्णनाच्या मिषानें त्यानें साधून घेतलेली दिसते. नागेश रसिक वृत्तीचा असल्यामुळें, पुरुषवर्णनापेक्षां स्त्रीवर्णनाकडेच त्याचें चित्त अधिक वेधलें आहे. कुरुप स्त्रीचें त्यानें केलेलें वर्णन जितकें वास्तविक, तितकेंच सीतेसारख्या अथवा चंद्रावळीसारख्या सुंदर स्त्रीचें त्यानें केलेलें वर्णन, अलौकिक, काव्यमय व स्वर्गीय असेंच म्हणतां येईल. 'सीतास्वयंवरां'-तील गौतमाश्रमवर्णन, पुनः 'चंद्रावळीवर्णनां'त हरिवनवर्णनप्रसंगीं जसेच्या तसें उतरून स्थलवर्णनाबद्दल आपलें अनौत्सुक्य त्यानें दाखविलें असून, हें किंवा 'सीतास्वयंवरां'तील मिथिला नगरीच्या लांबूनच्या दृश्याचें वर्णन, कायम ठशाचें, अतिशयोक्तिमय व कृत्रिम असेंच म्हटलें तरी चालेल. या वर्णनांत संस्कृत वाङ्मयाच्या सरणीप्रमाणें चैतन्यारोपाचा (pathetic fallacy) अवलंब कवीनें केला असला, तरी कै. भावे म्हणतात त्याप्रमाणें [१] मिथिलेचें हें वर्णन [२] नागेशकालीन अहमदनगर राजधानीचेंही अस्पष्ट चित्र असू शकेल. नागेशाच्या कालीं अहमदनगर प्रांतावर असलेला मुसलमानी कडक अम्मल, त्यानें आपल्या काव्यांत योजलेल्या फारशी शब्दांनीं व कर्णे तफेऱ्या इत्यादि राजव्यवहारकोशांत सांपडणाऱ्या वाद्यांच्या उल्लेखानें सूचित केला आहे.

पण इतकें असूनही आमच्या कवीच्या वर्णनशैलीबद्दल थोडेफार आक्षेप काढण्यांत आले आहेतच. खुद्द कै. भाव्यांनींच "वर्णनाची मर्यादा किती असावी, वगैरे साध्या गोष्टींसंबंधाचीही याची कल्पना अगदीं पुसट व अंधुक असल्यामुळें, याच्या काव्यांत अनेक तऱ्हेचे दोष आले आहेत. हा एकदां वर्णन करूं लागला म्हणजे मूळ कथानक अगदीं नजरेआड करतो; व

१ महाराष्ट्र सारस्वत—आवृ. ३ पृ. ७५-भावे. २ सीतास्व-१६६-१७४.

वर्णनाचा अगदीं कंटाळा येऊन वाचक मनांत दहादां पुरे पुरे म्हणेपर्यंत हा आपलें चऱ्हाट चालूंच ठेवतो. तसेंच वर्णन कशाचें करावें आणि कशाचें न करावें, हा विधिनिषेध तर याला काडीइतका नाहीं" असा आरोप[१] केला असून 'चंद्रावळीवर्णनां'त दिलेलीं गोपींचीं नांवें व श्रीकृष्णाच्या अनेक संवगड्याच्या नांवांवर कोटी साधतांना त्यांच्या स्वभावाचीं केलेलीं वर्णनें वाचून कदाचित् तो कोणाला खरा वाटण्याचाही संभव आहे. पण कै. भाव्यांचीं वरील विधानें आमच्या कवीच्या "सीतास्वयंवरा'स मुळींच लागू पडणारीं नसून, त्यानें आपल्या या काव्यांत आपल्या वर्णनांना विनोदाची जी अप्रतिम जोड दिली आहे, त्यामुळें उलट पक्षीं हीं वर्णनें वाचकाला पुनःपुनः वाचावीशीच वाटतील. सीतेच्या वर्णनांत तर नागेशाची प्रतिभा अशी कांहीं चमकली आहे कीं, संस्कृत काव्यांची गोडी असणाऱ्या रसिक वाचकांस, असें उत्प्रेक्षामय वर्णन कवीनें आणखी लांबविलें तर बरें असेंच वाटेल. जागजागीं स्वप्रतिभेनें त्यानें असे नवीन व स्वतंत्र प्रसंग निर्माण केले आहेत म्हणून त्याच्या काव्यांस एक निराळीच लज्जत येऊन, मराठी कवीवरील शृंगार व भक्ति या रसांचा एकतंत्री अवलंब केल्याच्या आरोपालाही खासें उत्तर मिळण्याचा संभव आहे. कोणत्याही प्रतिभासंपन्न कवीला आपल्या बुद्धीला गवसणी घालतां येत नाहीं, हें कै. भाव्यांना माहित नव्हतें असें म्हणवत नाहीं, व अशा वेळीं नागेशासारख्या संपन्न कवीनें थोडेसें विषयांतर करून आपल्या आंगची विनोदबुद्धि व बहुश्रुतता दाखविली, म्हणून त्याच्या वर्णनास 'चऱ्हाट' असा शेरा त्यांच्यासारख्या प्राचीन कवींच्या अभिमान्यानें मारावा हें तर अधिकच विस्मयकारक आहे. शिवाय आपण अतिशयोक्ति करून कोठे वर्णनविस्तार करतों, याची कवीला जाणीव असून, आपल्या सीतास्वयंवरांत

**श्रीराम येईल भजोनि येथें, म्हणोनि साही ऋतुवास येथें ।**
**याकारणें मिश्रित वर्णनांनीं, ने देइजे दूषण पंडितांनीं ॥**[२]

अशी स्पष्ट क्षमायाचना अथवा विनंति वाचकांना त्यानें करून ठेविली आहे. तशांत निरनिराळ्या प्रकारचीं वाद्यें, दागिने, हत्यारें व घोडे यांची

---

१ महाराष्ट्र सारस्वत–आवृ. ३. पृ. ७४–भावे. २ सीतास्व–९९.

स्वकालीन वर्णनें आपल्या काव्यांत मध्यंतरीं थोडें विषयांतर करून गोविलीं म्हणून जर आमच्या "कवीला कशाचाच विधिनिषेध नाहीं" असा टीकाकारांनीं गहजब उडविला, तर आमचे प्राचीन मराठी कवी एकजात संसारपराङ्मुख व निवळ टाळकुटे असून त्यांचें आजूबाजूला काडीचेंही लक्ष नव्हतें, अशी ओरड करावयासही त्यांना कोठें जागा राहणार नाहीं.

तरी तत्त्वज्ञानाच्याबाबतींत संत कवींच्या सनातन प्रथेप्रमाणेंच नागेश शांकरमतानुयायीच आहे. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या। जीवो ब्रह्मैव नापरः।' असें अद्वैत तत्त्वच [१] त्याला मान्य असून कर्में बंधनरूप आहेत, व जन्म-मरणाच्या फेऱ्यांतून सुटणें हाच मोक्ष, अशीं पारमार्थिक तत्त्वें त्यानें आपल्या दृष्टीपुढें ठेविलीं आहेत. [२] हठयोगादि निवळ कर्ममार्ग सांगणारीं शास्त्रें त्याला कुचकामाचीं वाटत असून, अहंभावाच्या लोपानें सर्वत्र समदृष्टि झाल्यासच यमाचा फेरा चुकवितां येतो, अशी त्याची खात्री आहे. [३] या अद्वैताबरोबरच जड अज्ञानाची बेडी तोडण्यास श्रीरामनामाचा अचूक तोडगा सांगतांना, निर्गुण–सगुणोपासनेची इतर संत कवींप्रमाणेंच तो अशी बेमालूम सांगड घालतो [४] कीं, ज्ञानेश्वरापासून चालत आलेल्या ज्ञानोत्तर भक्तीचा प्रसार करण्याची उज्ज्वल परंपरा तो येथें चालवीत असल्याचें स्पष्ट दिसतें. 'सीतास्वयंवर' रचना हा अशीच भक्ति प्रकट करण्याचा एक प्रकार असून, नागेशकालीं, श्रीसमर्थांनीं संस्थापिलेल्या रामभक्तीच्या नूतन सांप्रदायाचें ती एक प्रतिमाच म्हणावयास हरकत नाहीं. नागेशाच्या या काव्यांत रुजू झालेली ही रामभक्ति त्याला जशी मोक्षदायक झाली असेल, तशीच ती त्याच्या कालावर प्रकाश पाडणारी ठरली आहे.

भाषेच्या बाबतींतही नागेश असाच वैशिष्ट्यपूर्ण आहे असें म्हणतां येतें. कारण कोणत्याही ग्रंथकाराचा अगर कवीचा काल ठरविण्यास इतर बाह्य गोष्टी जशा उपयोगी पडतात, तद्वत्‌च त्याच्या भाषेसारखीं अंतः-साधनेंही उपकारक होतात, हा न्याय त्याला लागू पडतो. नागेशाची भाषा,

---

१ चंद्रावळीवर्णन–३०५. २ सीतास्व–८, ११, १४. ३ सीतास्व–१८, २६, ३२. ४ सीतास्व.–८.

जुने मराठी,[1] संस्कृत,[2] अपभ्रष्ट[3] व फारशी[4] अशा चतुर्विध शब्दांनीं अलंकृत झाली असून, ती जिवंत व कसलेली आहे, हें त्यानें योजलेल्या अनेक मराठी म्हणीं[5] वरूनही लक्षांत येण्यासारखें आहे.

'रघुवंशा'सारख्या आधारभूत संस्कृत ग्रंथांतील श्लोकांचा जेथें अनुवाद करण्याचा प्रयत्न झाला आहे, अशीं स्थलें सोडल्यास, आमच्या कवीची भाषा संस्कृतशब्दप्रचुर किंवा समासबद्ध आहे, असें कदापि म्हणतां येणार नाहीं. तथापि कोणत्याही कवीच्या लेखनशैलींत याच्या व्यक्तित्वाचा अगर त्याच्या काळचा असा ठसा उमटलेला असतो हें खरें मानल्यास, नागेशाच्या काव्यांत येणारे, सिंतरणें, फड्ड, नामर्द, लंडी, कारभारी, शेला, पटका, वाडा, झरोका, विपारे, ग्लांति, हे शब्द, त्याचें समर्थकालीनत्व दर्शवितात. 'सीता-स्वयंवरां'त, होइजे, घेइजे, साधिजे, अशीं कर्मकर्तरी प्रयोगाचीं रूपें

---

१ भार, सज, माला (मायला), उटाळी, सपेटी, वोपा, जनला, वोजा, समापणें, तारा, सांवरिली, बहुवस, बहुवस्त, भातुकें, बरग, बांदरी, सींतरणें, तलगा, करवाडे, बाडे, जमदाडें, परज, मेहुणें, सातें, डगला, निशाणें, पेलणें, गांठीं, रळी, झासा, संचणें, गदूटी, थोट, खुळी, चाट, तिवाटी, कुऱ्हाडी, खटाळी, गटाळी, सटाळी, फुटाळी, पाळी, शारें, धडफुडे, धडका, विपारे, लंडी, ग्लांति, बरवंटी, परवंटी, सळें, कुडपुणें, पूर्वील, हटेलैं, ठोंक, निचरणें, आयती, भुलणें, आवा. २ प्रमाणिक, अखर्व, सुरगोप, धम्मिल्ल, मनु, विभाकर, देशांतक, धिषण, कुक्कुर, परिपाक, आरव, ग्रीवाखर्व, मुदिर, सौराज्य, मरूज, भुक्ति, कामागार, बहुभर्तृका. ३ साहे (साह्य), जाला (झाला), सइंवर, येक (एक), उच्छाप, बुद्धुर. ४ हुदा, मेवा, तमासा, दमामा, तमाम, तोहबंदी, हयकोल, सरताज, हंमैल, जेहगीर, जेहर, माडी, झरोका, तोरा, बागदार, हुमिया (हुमा), बदक्षान्, नामर्द, हराम, सादर, शफत, सफेरत, चादर, गल्बला, गपा. ५ हुदा फिरणें, रान लावणें, उरीं फुटणें, शिरीं धोंड बसणें, डोळे घालणें, खोळे पाडणें, तारूं लुटणें, टिका घेणें, रानें लावणें, कपाटें देणें, ठोक फोडणें, मांडीखुटी येणें, करीं धरणें, मुरकुंडी घालणें, शंका येणें, चुडे राखणें.

आढळत असून, 'मारें करूनि' अशा तृतीयेच्या उदाहरणांत, तृतीयेच्या रूपापुढें 'करून' जोडण्याच्या रीतीप्रमाणेंच, 'शुभलक्षणेशीं' असें ज्ञानेश्वरकालीन सहार्थी तृतीयेचें रूपही कोठें तरी डोकावतें. पंचमीचे ऊन–हून प्रत्यय, शब्दाच्या सप्तमीच्या[१] रूपापुढें जोडलेले सांपडत असून, द्वितीयेच्या प्रत्ययाबद्दल 'लागुनिया' या शब्दाचा, प्रत्ययासारखा उपयोग[२] केलेला आहे. तसेंच षष्ठ्यर्थी सामान्यरूप घालण्याची ज्ञानेश्वरीची पद्धति,[३] एक दोन ठिकाणीं अवलंबलेली आहे, तर षष्ठीकरितां एके ठिकाणीं द्वितीयेचाही उपयोग केलेला आहे.[४] पुनः एकाच शब्दाला दोन सप्तमीचे प्रत्यय[५] लावल्याचें उदाहरणही त्याच्या काव्यांत आढळत असून 'लागणें' याबद्दल 'निघणें' या शब्दाचा उपयोगही[६] नागेशाच्या भाषाशैलीचा आणखी दुसरा विशेष म्हणतां येईल. पुढें 'झाला असता' याबद्दल 'होता,' अशीही शब्दयोजना त्यानें केली असून, 'म्हणून' बद्दल 'म्हणवुनि' असा तर तो सर्रास उपयोग[७] करतो. त्याचप्रमाणें, नामापासून क्रियापद करण्याची पद्धति[८] व सजातीय कर्मांची[९] ( Cognate objects ) उदाहरणेंही त्याच्या काव्यांत कांहीं कमी नाहींत.

तरी आमचा कवि वृत्तसुखार्थ जे दोष पदरीं घेतो, त्यांत संधि करण्याची टाळाटाळ,[१०] जेथें होत नाहीं तेथें केलेला संधि,[११] मूळ शब्दांतील मात्राच्युति,[१२] मुळांत नसेल तेथें कान्याची भर,[१३] व पाहिजे तेथें घडवून आणलेला वर्णागम[१४] इत्यादिकांचा समावेश होत असून, शब्दश्लेष[१५] नकारार्थी अव्ययुक्त क्रियापदें[१६] व संस्कृत शब्दांचीं अपभ्रष्ट रूपें[१७] असे नागेशाच्या भाषेचे आणखी थोडे विशेष उल्लेखनीय आहेत. कवीची शब्दसंपत्ति अफाट

---

१ 'कपाळींहुनि'. २ गौतमालागुनिया. ३ कन्यके लाभ. ४ ब्रह्मांडासि करीन दोन शकलें. ५ भूतळींत. ६ करूं निघाला. ७ सीतास्वयं–११७. ८ आशिर्वदला. ९ नवस नवसणें. १० पिच्छ–आशा, श्रवण–अवधि, नृप–अवतारा. ११ धरिताहे, करिताहे. १२ देखेबद्दल 'देख,' 'चिंचपेटी'बद्दल 'चिंचपटी' १३ 'बदामे' बद्दल 'बादामे.' १४ तीक्षण, आकरोटें, मारिग. १५ पर (शत्रू), व पर (पिसें). १६ नोबलें, नायकाल. १७ अनुपम्य, रघोत्तमा, सैन्यकास.

असूनही, तो कांहीं शद्बांचा दास बनतो, या नियमाला सामराजही अपवाद नाहीं. पण नागेशाचा अगदीं लाडका असा शब्द नसूनसुद्धां, 'सज' हा शब्द सामराजाप्रमाणेंच इतर शद्बांच्या मानानें त्यानें थोडा अधिक वेळां वापरला आहे.

वरील शद्बांप्रमाणेंच नागेशानें राजव्यवहारकोशांत सांपडणाऱ्या शद्बां-व्यतिरिक्त, बरेच अरबी व फारशी शद्ब आपल्या काव्यांत योजले आहेत. मुसल-मानी राज्यांत त्याच्यासारख्या विचक्षण कवीस फारशी भाषेचें ज्ञान झालें नसतें, तरच तें एक नवल होतें. पण त्यानें असे कांहीं बारिकसारिक शद्ब [1] वापरले आहेत कीं, त्यामुळें असेच फारशी शद्ब उपयोगणाऱ्या सामराजापेक्षां त्याचें हें परकीय भाषाज्ञान अधिक वाटावें. सामराजाच्या काव्यांत फारशी शद्बांचा भरणा नागेशापेक्षां अधिक आहे, असें श्री. प्र. धों. कानिटकर [2] म्हणत असले, तरी तशी मोजदाद केल्यास हें शद्बांचें नागेशाच्या काव्यांत प्रमाण तितकें अल्प भरेल असें वाटत नाहीं. शिवाय सामराजाच्या महाकाव्यांतील हजार श्लोकांचें, व नागेशाच्या खंडकाव्याचें ४१५ श्लोकांचें मान लक्षांत घेतल्यास, त्रैराशिकानें नागेशाचेच फारशी शब्द सामराजापेक्षां अधिक भरण्याचा संभव आहे. नागेशाची भाषा याप्रमाणें जुनी व सामराजाच्या भाषेशीं पुष्कळ बाबतींत अगदीं तंतोतंत जुळणारी असली, तरी 'शिकवीस,' 'बसलीत' अशीं जुन्या वर्तमानकाळाचीं रूपें, 'नवजाय' हें मुक्तेश्वरी वाङ्मयांत सांपडणारें क्रिया-पद, विशेष्याप्रमाणेंच विशेषणाचा केलेला लिंगभेद, व पुनः सजातीय कर्मांचा अधिक वेळां केलेला उपयोग, हे सामराजाचे सर्वसाधारण भाषाप्रकार आमच्या कवींत सांपडत नसल्यामुळें, कालदृष्ट्या नागेश सामराजानंतर झाला व त्यानें सामराजाचीं काव्यें पाहिलीं असावीं असाच तर्क करण्याकडे मन वाहतें.

हें आतां वर्णिलेलें शब्दप्रभुत्वच नागेशाच्या वृत्तप्रभुत्वास कारणीभूत झालें आहे. सामराजाप्रमाणें त्यानेंही आपल्या काव्यांत सर्वसाधारण उपजाति वृत्ताची योजना केली असली, तरी द्रुतविलंबित, स्वागता, भुजंगप्रयात, वसंततिलका, स्रग्विणी, इंद्रवज्रा, तोटक, मदिरा, चंपकमाला, माल्यभारा, अशीं सर्वपरिचित व प्रमाणिका, मकरकशीर्षा अशीं थोडीं अपरिचित

---

१ सफेरत, सरताज, हुमिया. २ रुक्मिणीहरणनिरीक्षण.

वृत्तेंही त्यानें वापरलीं आहेत. या शेवटच्या दोन वृत्तांचा अवलंब नागेशाच्या समकालीन अशा कोणाही कवींनीं केला नसल्यामुळें, त्याचें छंदःशास्त्राचें ज्ञान खोल असावें असें अनुमान निघतें. डॉ. माधवराव पटवर्धन यांनीं आपल्या 'छंदोरचना' या प्रमाणग्रंथांत, 'प्रमाणिका' वृत्ताचें लक्षण व इतिहास दिला असून, त्यांत 'मराठींत उदासदासकृत महाबळचरित्र आणि अनंतकृत सुरतसुधन्वाख्यान (६७–७४) नि बभ्रूवाहनाख्यान (१।५९–६५) इत्यादिकांची रचना प्रमाणिका वृत्तांत आहे,' असा हवाला दिला आहे. त्याचप्रमाणें 'मकरकशीर्षा' वृत्ताचेंही लक्षण व इतिहास सांगतांना, राजशेखराची 'कर्पूरमंजरी', व रूपदेवकृत 'स्तवमाला' अशा प्राकृत काव्यांचा व वि. वा. भिडेकृत 'जीवजागृती'चा त्यांनीं उल्लेख केला आहे. आपला ग्रंथ शक्य तितका प्रमाणभूत व सर्वसंग्राहक व्हावा, म्हणून ब्रह्मांड धुंडाळणाऱ्या माधवरावांचें लक्ष, हीं दोन्हीं वृत्तें मराठींत बहुधा पहिल्यानेंच योजणाऱ्या नागेशाकडे न जातां, तें उदासदास व अनंत यांसारख्या कोंपऱ्यांतल्या, किंवा राजशेखरासारख्या प्राकृत, व भिड्यासारख्या अगदीं अलीकडच्या कवीकडे मात्र जावें, याचें खरोखरच आश्चर्य वाटल्यावांचून रहात नाहीं. डॉक्टरसाहेबांचें लक्ष जर यापूर्वी आमच्या कवीकडे गेलें असतें, तर वरील दोन्हीं वृत्तांचीं उदाहरणें, त्यांना स्वतः बनवून आपल्या ग्रंथांत समाविष्ट करण्याची तसदी न पडतां, या दोन वृत्तांच्या स्वकृत उदाहरणांपेक्षां नागेशाच्या श्लोकांच्या उदाहरणांनीं, त्यांच्या ग्रंथाचें प्रामाण्य वाढण्यासही अधिक मदत खात्रीनें झाली असती. तथापि या समवृत्तांप्रमाणेंच अर्धसमवृत्तांच्या बाबतींतही नागेशाचें थोडें वैशिष्ट्य दिसून येतें. इंद्रवज्रा व उपेंद्रवज्रा यांच्या मिश्रणानें साधणारें उपजाति वृत्त त्यानें सर्वत्र जरी योजलें असलें, तरी आपल्या 'सीतास्वयंवरांत,' भुजंगप्रयात व स्वागता यांच्या मिश्रणाचें,[१] व पहिल्या–तिसऱ्या ओळींतील १४ व दुसऱ्या–चवथ्या ओळींतील १५ अक्षरांचें, वरून मिश्र मालिनीसारखें दिसणारें[२] अशीं हीं दोन अर्धसमवृत्तांचीं प्रचलित वृत्तदर्पणांत न सांपडणारीं उदाहरणेंही इतर तत्कालीन काव्यांतील वृत्तांच्या मानानें वाचकांचें चित्त थोडें फार वेधणारींच

---

१ सीतास्व–४०. २ सीतास्व–५१.

आहेत. या वृत्तांच्या नांवाबद्दल, वे. शा. सं. बो[illegible] यांजकडे पृच्छा करतां, त्यांनीं “ अनंतरोदीरितलक्ष्मभाजौ पादौ यदीयावुपजातयस्ताः!” असा ‘वृत्तरत्नाकरा’चा दाखला देऊन, वरील श्लोकांचें वृत्त उपजाति असल्याचा आपला निर्णय दिल्यानंतर तर, नागेशाच्या वृत्तशास्त्रांच्या सूक्ष्म ज्ञानाबद्दल माझा आदर वाढल्याशिवाय राहिला नाहीं.

कवीनें आपली नवरसात्मक काव्यरचना एकच एक वृत्तांत गुंफून दाखविण्यांत त्याचें वृत्तकौशल्य अधिक कीं, ती विविध वृत्तांत ग्रथित करण्यांत अधिक, त्याबद्दल कांहीं विद्वानांत मतभेद असल्याचें दिसून येतें. पण अनेक वृत्तात्मक रचनेंत अक्षर—मात्रांच्या ठराविक संख्येचें व वर्णांच्या र्‍हस्वदीर्घत्वाचें जें बंधन कवीला पाळावें लागतें, तें त्यांस एकवृत्तात्मक रचनेंत वारंवार पाळावें लागत नाहीं. शिवाय अनेक वृत्तांत रचना करतांना व वरील बंधनें पाळतांना, कवीच्या वर्णनौघांत जो खंड पडतो, तो न पडतां, रचना तर कृत्रिम न व्हावी व वृत्तांच्या मर्यादा तर पाळल्या जाव्या, यासाठींच अशा कवीच्या गांठीं विपुल शब्दसंपत्ति असावी लागते. पुनः शृंगारादि विविध रस विविध वृत्तांनीं जसे आळविले जातील, तसे ते एकाच वृत्ताच्या ठराविक साच्यांत आविष्कृत होणार नाहींत. ‘उपजाति’ वृत्तांत कथानकाचा अखंड ओघ जसा वाहूं लागेल, तसेंच व्यक्तीच्या उत्कट मनःस्थितीचें शब्दचित्र, अथवा सायंकाळ व चंद्रोदयासारखी शीतल वर्णनें ‘मालिनी’सारख्या सहजकोमल व करुणरसपोषक वृत्तांतच परिणामकारक होतील. त्याच-प्रमाणें कोणत्याही गंभीर प्रसंगाच्या वर्णनाला ‘शिखरिणी’ जसें योग्य आहे, तसेंच कोणाचाही आर्ततेनें धांवा करतांना ‘स्वागता’ हें वृत्तच समुचित ठरलें आहे. अनेक पदार्थांच्या याद्या किंवा तपशील, यांचें वर्णन देतांना ‘स्रग्धरा’ व ‘शार्दूलविक्रीडिता’सारख्या प्रदीर्घवृत्तांचा जसा उपयोग होतो, तसाच कांहीं क्रिया द्रुतगतीनें चालल्या आहेत असें वर्णन करतांना, ‘द्रुतविलंबिता’चा स्वीकारही अपरिहार्य होईल. मनाची असहायता व प्रसंगाची मंगलता व्यक्त करण्यास ‘पृथ्वी’सारखें जसें दुसरें प्रभावी वृत्त नाहीं, तसेंच भक्ताच्या किंवा आर्त नायकाच्या मनाचीं आंदोलनें ‘हरिणी’शिवाय चित्रितच केलीं जाणार नाहींत. अनेकवृत्तात्मक रचना याप्रमाणें निरनिराळ्या रसांना व भावांना पोषक होऊन, वैचित्र्यानें वाचकांच्या मनाचा उल्हास वाढविते. एकवृत्तात्मक

रचना उलट रस–भावनांना बहुतांशीं प्रतिकूल होऊन वाचकांनाही कंटाळ-वाणी होते. म्हणूनच इतकीं बंधनें पाळून इष्ट रसाचा उठाव करणारा अनेकवृत्तव्यवसायी कवीच वृत्तप्रभु ठरत असून, संस्कृत महाकाव्यांत केलेला अनेक वृत्तांचा आश्रय, हेंच वृत्तप्रभुत्वाचें गमक मानलें गेलें आहे.

नागेशानेंही सामराजाप्रमाणें निरनिराळ्या सोळा गणवृत्तांचा प्रसंगानुसार अवलंब केला असून, त्याचें वृत्तप्रभुत्व कळण्यास त्यांचा, व प्रमाणिका–मकरकशीर्षा यांसारख्या अपरिचित वृत्तांचा त्यानें केलेला उपयोग पुरेसा आहे. कधीं कधीं वृत्ताचें नांव त्या त्या श्लोकाच्या शेवटच्या चरणांत तो अशा कांहीं कौशल्यानें गुंफतो [१] कीं, वर्ण्यविषयाचें वैशिष्ट्यही त्यानें आपाततः सूचित केलें जावें. अशा प्रकारची रचना निरंजनमाधवानेंही केली असून, वृत्तें लक्षांत ठेवण्यासही तिचा फार उपयोग झाला आहे.

यानंतर आमच्या कवीचें कविमंडळांतील स्थान ठरविण्यास त्याची सम-कालीन कवींशींच तुलना होणें इष्ट आहे. वामन, सामराज, विठ्ठल व रघुनाथपंडित हे आख्यानकवि नागेशाच्या समकालीनांत मोडत असून, वामनपंडितांची रचना इतकी विपुल आहे कीं, त्या बाबतींत नागेश त्याच्या पासंगालाही लागणार नाहीं. तथापि नागेशाप्रमाणें पंडित जरी रसिक म्हणतां आले, तरी नागेशाची बहुश्रुतता, त्याचें राजदरबारचातुर्य, त्याच्या स्वतंत्र प्रसंग-निर्मितींत दिसणारी कल्पकता, व आपल्या रचनेंत त्यानें केलेलें विनोदाचें मिश्रण, या सर्व गोष्टींचा पंडितांमध्यें अभावच दिसेल. पंडित, नागेशापेक्षां विद्वान् व व्युत्पन्न असले, तरी त्यांबरोबरच विद्वज्जडत्व, क्लिष्टता व तर्ककर्कशता हे दोष त्यांच्या काव्यांत शिरलेले आहेत. नागेशाचें काव्य उलट प्रासादिक, प्रतिभासंपन्न व ललितरम्य वाटतें. त्याच्या काव्यांत त्याच्या व्यक्तित्वाचें प्रतिबिंब जसें स्पष्टपणें दिसतें, तसें पंडितांच्याच काय, पण इतर कोणत्याही मराठी कवींत प्रतीत होत नाहीं. विठ्ठलकवींचीही रचना नागेशापेक्षां पुष्कळच आहे. चित्रकाव्यरचना, व छंदःशास्त्रनैपुण्य हे या कवीचे विशेष असून, संस्कृतांतलीं अनेक अपरिचित वृत्तें जशीं त्यानें मराठींत आणलीं आहेत, तशीच आपली काव्यरचनाही थेट संस्कृत महा-

---

१ सीतास्व.–६८, १४३, १४५.

काव्याच्या धर्तीवर उभारण्याचा त्यानें अभिनिवेश धरला आहे. विठ्ठलाच्या व्यापारी पेशामुळें, प्रवासांत मिळालेली बहुश्रुतता त्याच्या काव्यांत कोठें कोठें व्यक्त झाली असली, तरी शब्दरचनेचे चित्रविचित्र प्रकार करण्यांत गुंतल्यामुळें, त्याच्या काव्यांत म्हणावा तसा रसपरिपाक उतरला नाहीं. कवि या नात्यानें नागेश बहुतपरीनें विठ्ठलापेक्षां श्रेष्ठ आहे. त्यांची बहुश्रुतताही विठ्ठलापेक्षां मोठी असून, रसिकतेंत, सूक्ष्मावलोकनांत व कल्पकतेंत तर त्या दोघांची तुलनासुद्धां होणार नाहीं. आपलें काव्य सरस व चटकदार कसें करावें हें नागेश उत्तम जाणत असून, विठ्ठल त्या मानानें धीरगंभीर, संस्कृताच्या टराविक चाकोरींतून जाणारा म्हणून कृत्रिम व जड वाटतो.

रघुनाथपंडिताची गोष्ट याहून थोडी निराळी आहे. त्याची रसिकता अभिजात स्वरूपाची असून, नागेश त्या मानानें थोडा ग्राम्य व पांचट भासतो. कोणतीही गोष्ट अगर प्रसंग वाच्यार्थानें न सांगतां व्यंगार्थानें सांगणें हा रघुनाथाचा एक विशेष असल्यामुळें, त्यानें आपणास प्रिय असणाऱ्या शृंगाररसास, नागेशाप्रमाणें 'उत्तान' व 'संभोग' अशा स्वरूपांत बहकूं न देतां, 'मुग्ध' व 'विप्रलंभ' यांसारख्या प्रशांत व मोहक स्वरूपांत वावरूं दिलें आहे. आपण जें जें पाहिलें, तें तें आपल्या काव्यांत ओतण्याचा नागेशासारखा अभिनिवेश, रघुनाथपंडितानें धरलेला नाहीं हें खरें असलें, तरी सूक्ष्म भावनांची नेमकी तार छेडणें, कल्पनेची उत्तुंग भरारी मारणें, व सुंदर नयनमनोहर सृष्टिवर्णनें करणें, या उच्च अभिरुचिनिदर्शक सर्वच बाबतींत, रघुनाथपंडित नागेशासच काय पण कोणत्याही मराठी कवीस हार जाणार नाहीं. नागेशांत विनोदाचा भाग अभिनव असला, तरी काव्यगुणांत वामन–विठ्ठलांपेक्षां जसा तो श्रेष्ठ ठरेल, तसा रघुनाथपंडितापेक्षां मात्र ठरणार नाहीं.

तथापि या सर्व कलाकवींत नागेशाची ज्याच्याशीं सर्व बाजूंनीं तुलना होईल, असा कवि सामराजच होय. या दोघांत अनेक बाबतींत इतकें कल्पनातीत साम्य आहे कीं, रघुनाथपंडित व आनंदतनय यांच्या व्याहीपणाच्या आख्यायिकेप्रमाणेंच यांच्या मित्रत्वाची, किंवा देवनाथ–रघुनाथपंडित यांच्या भेटीच्या आख्यायिकेप्रमाणेंच नागेश–सामराजांच्या भेटीची तरी निदान आख्यायिका असेल कां, अशी कल्पना मनांत

आल्यावांचून रहात नाहीं. सामराज नगरप्रांतीं असतांना, नागेशासारख्या त्याच्या समव्यवसायीशीं त्यांची गांठभेट होणें शक्य आहे, व सामराजाची ज्येष्ठता व श्रेष्ठता लक्षांत घेतां, त्याचें 'रुक्मिणीहरण' पाहूनच आपलें 'सीतास्वयंवर' रचण्याची स्फूर्ति नागेशाला झाली असावी. सामराज व नागेश यांच्या काव्यांत जें आश्चर्यकारक भाषासाम्य आढळतें, तें तत्कालीन भाषेचें सर्वसाधारण स्वरूप मानलें, तरी दोघांच्या काव्यांतील वर्णनसाम्य मात्र, परस्परांच्या वाङ्मयऋणाबद्दल शंका उत्पन्न केल्याशिवाय रहात नाहीं. सीता-स्वयंवरास गेलेल्या अनेक देशांच्या राजांचीं नांवें, सामराजाप्रमाणेंच, पण थोड्या अधिक तपशिलानें नागेशानें आपल्या काव्यांत दिलीं आहेत. त्याच-प्रमाणें सामराजानें केलेलें, रुक्मिणीस्वयंवरास जाणाऱ्या ब्राह्मणांचें व त्यांच्या शिष्यवरांचें विनोदी वर्णन,[1] व नागेशानें केलेलें सीतास्वयंवरास जाणाऱ्या ब्राह्मणांचें विनोदी वर्णन, यांत विलक्षण साम्य आढळतें. नागेशानें गौतमाश्रमवर्णनांत दिलेली फुलाफळांची यादी, सामराजाच्या काव्यांतही तशीच पण अधिक विस्तारानें अवतरली आहे. नागेशकृत मिथिलावर्णन व सामराजकृत द्वारकावर्णन, वाद्यें, खंदक, फरा इत्यादि बऱ्याच बारीक तपशिलांत जुळतें. श्रीकृष्ण द्वारकेहून कुंडिनपुरास आल्यावेळीं त्यांस पहावयास धांवलेल्या पौरस्त्रियांची धांदल, व रामास पहावयास धांवलेल्या मिथिलेंतील पौरस्त्रियांची धांदल, रघुवंशांतील एकाच प्रसंगावर दोघांनींही आधारलेली, म्हणून अगदीं सारखीच आहे. सीतेच्या अंगावरील अलंकार कांहीं अपवाद सोडल्यास बहुतेक रुक्मिणीच्या अंगावर दिसत असून, नागेशाची सीता, स्वरूपाच्या जडण-घडणींत पुष्कळ अंशीं सामराजाच्या रुक्मिणीसारखीच भासते.

सामराज व नागेश यांच्या काव्यांतील वरील वर्णनसाम्य लक्षांत घेतलें असतां, सामराजाचें महाकाव्य पाहूनच त्याला आपलें 'सीतास्वयंवर' रचण्याची बुद्धि झालेली दिसते. हे दोघेही कवि तुल्यबलच असून, बहुश्रुतता, व्युत्पन्नता व रसिकता हे गुण दोघांतही सांपडतील. पण महाकाव्यरचनेची मुळापासूनची आकांक्षा जी सामराजांत दिसते, ती मात्र नागेशांत नाहीं.

---

१ रु. ह. ६।४०–५७.

त्याला एक त्रुटित खंडकाव्य अथवा आख्यानकाव्य रचावयाचें असल्यामुळें, त्यांस अनुसरून व्यक्ति व स्थलवर्णनासारख्या बाह्यवर्णनांत आपलें कौशल्य दाखविण्यास त्यांस पूर्ण वाव मिळाला आहे. महाकाव्यरचनेंत कथानकाच्या दीर्घतेकडे, रसपरिपोषाकडे, व त्यांतील पात्रांच्या स्वभावपरिपोषाकडे कवीचें लक्ष अधिक वेधल्यामुळें, त्यांस पात्रांच्या किंवा स्थलांच्या बाह्यवर्णनांतील बारीकसारीक सूक्ष्म तपशिलावर आपलें बुद्धिसर्वस्व खर्चण्यास अवसर सांपडत नाहीं. सामराज व नागेश यांत हाच मौलिक वृत्तीचा फरक आहे. सामराजाला आपलें महाकाव्य एका ओघांत व एका दमांत संपवावयाचें असल्यानें, उपजातिवृत्तासारखी धांवती वृत्तयोजना त्याला करावी लागली. महाकाव्य रचतांना मनाला लागलेल्या पुढील ओढीमुळें, रुक्मिणीच्या आपादमस्तक अवयववर्णनावर नागेशाच्या काव्यांतील सीतावर्णनाप्रमाणें त्यांस अनेक अलंकारांचा थाटमाट उडवितां आला नाहीं. तसें पाहिलें तर, सामराज हा भावनाप्रधानच अधिक असल्यामुळें, नागेशाप्रमाणें अर्थालंकारांनीं नटलेल्या बाह्यवर्णनाकडे त्याचें चित्त लागत नाहीं. श्रृंगारवर्णनाच्या बाबतींत सामराज नागेशापेक्षां संयम पाळणारा असला, तरी दोघांचेंही लक्ष पुरुषवर्णनापेक्षां स्त्रीवर्णनाकडेच अधिक आहे. पण सामराज स्त्रियांचें अंतरंग अधिक जाणतो, तर नागेश त्यांच्या शरीरवर्णनांतच अधिक रमून जातो. या दोन कवींच्या मनोरचनेंत जो हा भेद होता, तोच अनुक्रमें त्यांच्या काव्यरचनेंत उमटला असल्यामुळें, नागेशापेक्षां सामराजाची महाकाव्यरचनेची पात्रता आपोआपच सिद्ध झाली आहे.

शिवरायांच्या सर्वत्र दिग्विजयानें व त्यांच्या वैभवसंपन्न व डोळ्यांना दिपविणाऱ्या राज्याभिषेकानें तत्कालीन कवींची स्वतंत्र बुद्धि अधिकच फोंफाऊं लागून, मराठी भाषेच्या उद्यानांत न भूतो न भविष्यति असा एक प्रचंड वाङ्मयवृक्ष निर्माण झाला, व तो कलात्मक काव्यांच्या अनेक फळांफुलांनीं बहरून गेला. वामन, सामराज, नागेश, विठ्ठल, रघुनाथपंडित व आनंदतनय हे कवी कोणत्या तरी एका उपासनेचे भोक्ते असले, तरी कोणत्याही एका विशिष्ट सांप्रदायाचे बंदे नव्हते. वामन व सामराज यांना कृष्णभक्ति विशेष प्रिय होती, तर रामदासांच्या कोदंडधारी रामाची उपासना युक्त वाटल्यामुळें, नागेश, विठ्ठल, रघुनाथपंडित व आनंदतनय आपणास रामभक्त म्हणवीत असत. समर्थांनीं तत्कालीं रामभक्तीचा जो हा प्रसार केला त्यामुळें, 'सीतास्वयंवरा'-

सारख्या रामचरित्रपर विषयावर रचना करण्याची ज्यांना स्फूर्ति झाली, त्यांत अनंत, अमृतराय, आनंदतनय, गिरिधर, जयरामस्वामी, गोसावीनंदन, नागेश, वामन, विठ्ठल, विष्णुदास व वेणाबाई अशा अकरा कवींचा समावेश होत असून, यांपैकीं आनंदतनय, वामन, नागेश, विठ्ठल व वेणाबाई यांच्याच कृती आज विशेष प्रसिद्ध आहेत. आनंदतनयानें जनकाच्या शिव-धनुर्भंगाच्या पणापासून आपल्या काव्यास प्रारंभ करून, राजे लोकांचें स्वयं-वरास गमन, सीता व तिची दासी यांचें राजेलोकांबद्दल संभाषण, सीतेची चिंता, रावणाच्या प्रचंड शरीराचें वर्णन, त्याची बढाई व धनुष्य उचलतांना झालेली फजीति, रामकृत शिवधनुर्भंग व सीतेकडून रामास वरमालार्पणविधि, असे बहुतेक नागेशाप्रमाणेंच प्रसंग वर्णिले आहेत. त्याची रचना ओजस्वी, जोरदार, व अलंकारप्रचुर असून, 'आरणीच्या शिपायास' साजेशी आहे. वामनानें या प्रकरणाचा उपयोग भक्ति व ज्ञान यांचा समन्वय करण्यासाठींच केल्यामुळें, स्वयंवराचा गोडवा तेथें बिलकुल राहिलेला नाहीं. वेणाबाईनीं आपलें प्रकरण, रामभक्तीनें प्रेरित होऊन मानसपूजेप्रमाणें सर्व सोहाळ्यासह वर्णिलें आहे. एकनाथांच्या रुक्मिणीस्वयंवराचा कित्ता वर्णन-शैलीच्या बाबतींत त्यांनीं गिरविला असून, भक्तीचा ठसा त्यांच्या सर्व काव्य-भर उठलेला आहे. वामन व वेणाबाई यांनीं भक्ति व ज्ञान यांचा उपदेश हें जसें मुख्य ध्येय नेऊन स्वयंवरप्रसंग हें केवळ एक साधन मानलें, तसें विठ्ठल व नागेश यांनीं केलें नाहीं. नागेशानें परशुराम व जनकराजा यांच्या मुलाखतीपासून प्रारंभ करून, सीतेच्या कन्यादानांत आपल्या काव्याची परिसमाप्ति केली आहे, तर विठ्ठलानें कथाभागाच्या बाबतींत त्याचेंच अनुकरण केलें आहे. तथापि या सर्वांच्या कृतींचा विचार केल्यास स्वतंत्र प्रसंग, विनोद, कल्पकता, रसिकता व बहुश्रुतता, 'या गुणांत नागेशाचेंच 'सीतास्वयंवर' इतरांच्या तशाच कृतींपेक्षां श्रेष्ठ दर्जाचें ठरणार असून, "नागेशांत थोडेसें अंगचें वारें आहे" या कै. भाव्यांच्या[१] उक्तींत बरेंच तथ्य असलेलेंही आढळून येणार आहे.

यापुढें नागेशाच्या कालासंबंधीं थोडाबहुत विचार करणें ज़रूर आहे. कोणत्याही कवीचा स्थलकाल ठरविण्यास अंतःसाधनें व बहिःसाधनें

१ महाराष्ट्रसारस्वत—आवृ. ३, पृ. ७५.

पारखून घ्यावीं लागतात. कवीनें आपल्या काव्यांत केलेले आत्मचरित्रपर उल्लेख, त्याची भाषापद्धति, तत्कालीन सामाजिक, राजकीय, धार्मिक स्थित्यंतरें अथवा घडामोडी व त्यानें केलेले कालविपर्यासाचे दोष, इत्यादींचा समावेश अंतःसाधनांत होत असून, त्या कवीच्या समकालीन व उत्तर-कालीन लेखकांनीं त्याच्यासंबंधीं केलेले उल्लेख, कवीच्या कालीं व प्रांतीं रूढ असलेले अलंकार, पेहराव, शस्त्रें इत्यादि गोष्टी, बहिःसाधनांत अंतर्भूत होतात. नागेशाचा काल ठरविण्यास वरील दोन्ही प्रकारच्या साधनांबरोबरच, सामराजाशीं असणारें त्याचें निकट साम्य फारच महत्त्वाचें असून, सामराजाच्या कालनिश्चितीवर नागेशाच्या कालाची रूपरेखा बरीच अवलंबून आहे.

रा. प्र. धों. कानिटकर [१] व रा. गो. रा. राजोपाध्ये [२] या दोघाही विद्वानांनीं सामराजाच्या कालाबद्दल मांडलेल्या उपपत्तीची विस्तरशः छाननी केल्यास, (१) सामराज एकनाथानंतर झाला ही गोष्ट निःसंदिग्ध आहे. (२) 'मोर' हा दागिना नगर—नाशिक या विशिष्ट प्रांतींच रूढ असून, सामराज, नागेश, जयराम व परमानंद यांनीं ज्या अर्थी त्याचा आपल्या काव्यांत सारखाच उल्लेख केला आहे, त्याअर्थी ते सर्व समकालीन व त्या प्रांताचे रहिवासी निदान कांहीं दिवस तरी होते, असें म्हणतां येईल; पण त्यावरून या सर्वांनीं आपलीं काव्यें एकाच काळीं लिहिलीं असें मात्र म्हणतां येणार नाहीं. सामराज नगर प्रांतीं असतांना त्यानें हा दागिना पाहून ठेवून, पुढें तो आपल्या काव्यांत योजणेंही शक्य आहे. (३) शके १५९६—९८ च्या सुमारास राजव्यवहारकोशाची रचना होऊन तो रूढ झाल्यावरच मराठींत माजलेल्या फार्शी शद्बांचें बंड कमी झालें. सामराज व नागेश यांच्या काव्यांत फार्शी शद्बांचें प्राचुर्य सारखेंच दिसतें, त्या अर्थी तीं या कोशरचनेपूर्वी झालीं असावीं. (४) सामराज व नागेश यांच्या काव्यांतील भाषापद्धति, वर्णनें व प्रसंग यांतील आश्चर्यकारक साम्य पाहतां, ते दोघेही समकालीन ठरतात. (५) मराठी वाङ्मयांत अनेक-वृत्तात्मक रचनेचा प्रारंभ, मुक्तेश्वर—लोलिंबराज—वामन यांनीं केला असला, तरी

---

१ रुक्मिणीहरण निरीक्षण, मुमुक्षु वर्ष ८, विविधज्ञानविस्तार—वर्ष ५९.
२ मुमुक्षु—मार्च १९२२.

सामराजानें आपल्या रुक्मिणीहरणांत १६ गणवृत्तें योजून अशा रचनेला अधिक चालना दिली. नागेशानें आपल्या 'सीतास्वयंवरां'त प्रमाणिका, मकरकशीर्षा, चंपकमाला, मदिरा, अशा सामराजाहून निराळ्या व मराठीला थोड्या अपरिचित पण विविध अशा संस्कृत गणवृत्तांचा अवलंब केल्यामुळें, नागेशाचें 'सीतास्वयंवर' सामराजाच्या 'रुक्मिणीहरणा' नंतरचें ठरतें. (६) सामराजानें आपल्या काव्यांत अनेक राजव्यवस्थांतर्गत शब्दांचा, राजचिन्हांचा, व युद्धविषयक परिभाषेचा जो उल्लेख[१] केला आहे, त्यावरून व त्याच्या भाषेवरून त्याच्या शिवकालीनत्वाबद्दल शंका राहत नाहीं, इतकें नव्हे तर 'रुक्मिणीहरणां'त श्रीकृष्णाच्या आमात्यचूडामणींचें जें वर्णन[२] आलें आहे, तें शिवराज्याभिषेकसमयीं उपस्थित असलेल्या अष्ट-प्रधानांच्या वर्णनाशीं[३] बऱ्याच बाबतींत जुळत असल्यानें, सामराजानें आपलें हें काव्य शिवराज्याभिषेकानंतर म्हणजे शके १५९६ नंतर पूर्ण केलें असावें. बाळंभटाच्या दत्तकपत्रावर सामराजानें साक्ष घातल्याचा जो पुरावा प्रसिद्ध आहे,[४] तो या राज्याभिषेकाच्या काळचाच असल्यानें, या विधानास बळकटीच येते. (७) रुक्मिणीहरणांतील फलवर्णन,[५] समर्थांचें ब्रह्मारण्यवर्णन, व नागेश-कृत गौतमाश्रमवर्णन, यांत कल्पनातीत साम्य असल्यानें, सामराज, समर्थ, व नागेश, समकालीन ठरतात. (८) महाराष्ट्रांत भागवती कथेचा व श्रीकृष्णभक्तीचा पगडा एकनाथकालीं व नंतर कांहीं वेळ विशेष होता. लोलिंबराज व वामनपंडित यांनीं भागवती कथेवरच भर दिला असून, सामराजावर भागवती कथेची, कृष्णभक्तीची व एकनाथांच्या रचनेची छाप अधिक आहे. म्हणूनच त्यानें 'रुक्मिणीहरण' हा प्रसंग आपल्या काव्यास निवडला, व आपल्या 'मुद्गलाख्यानां'तही श्रीकृष्णाचा उल्लेख त्याला केल्याशिवाय राहवलें नाहीं.[६] शिवकालांत जे इतर आख्यान-कवी झाले, त्या बहुतेकांनीं 'सीतास्वयंवर' प्रसंगावरच रचना केलेली

---

१ सामराज—पृष्ठ १०५—१०६—द. सी. पंगु (१९४०). २ रुक्मिणी-हरण—५।२५—३२. ३ सामराज—पृ. १०६—द. सी. पंगु. (१९४०) ४ सामराज—पृ. २७. द. सी. पंगु (१९४०). ५ रु. ह. ३।४९. ६ मुद्ग—५९.

आढळते. यावरून हे सर्व कवी रामदासांच्या रामसंप्रदायाचा पगडा महाराष्ट्रांत बसल्यानंतर उदयास आलेले आहेत. 'नलदमयंती'कर्ता रघुनाथपंडित हा रामदासांचा अंकित व रघुनाथभक्त होता हें प्रसिद्ध आहे. सामराज हा समर्थ रामदासांचा समकालीन असूनही त्याच्यावर रामसंप्रदायाचा परिणाम झालेला मुळींच दिसत नाहीं. उलट आपल्या काव्यांत एका ठिकाणीं त्यानें रामचरित्रांतील रामाचें वैगुण्यच[1] दाखविलें आहे. यावरून तो रामदासांच्या रामसंप्रदायाच्या पूर्वीचा, व या सांप्रदायाच्या आहारीं न जाण्याइतका ज्येष्ठ किंवा निदान रामदासांचा समवयस्क म्हणजे शके १५३०मध्यें जन्मला असावा. (९) नागेशाचें 'सीतास्वयंवर' हें त्यानें उतार वयांत रचलेलें अखेरचें काव्य[2] असून, महाराष्ट्रांत समर्थांच्या रामसांप्रदायाचें प्रस्थ माजल्यावरच रचिलें असावें. त्यावरून नागेश, त्या सांप्रदायाच्या कह्यांत जाण्याइतका म्हणजे सुमारें १०।१५ वर्षांनीं तरी रामदासापेक्षां अगर सामराजापेक्षां कनिष्ठ असावा. शके १६०० हा कै. भाव्यांनीं दिलेला नागेशाचा काल, त्याच्या 'सीतास्वयंवर' रचनेचा असावा, व तो या काव्याच्या झालेल्या हस्तलिखित प्रतीच्या १६१६ या शकाशीं अथवा १५९६ या 'रुक्मिणीहरणा'च्या शकाशीं जुळणारा आहे. सामराजाप्रमाणें नागेशही दीर्घायुषी होता असें मानण्यास पुरावा असून, त्याच्या वंशांतील गं. भा. त्रिवेणीबाई, ८० वर्षांची होऊन वारली; यावरून नागेशही ७५–८० वर्षें वाचला असावा. त्यानें आपला काव्यरचनेचा व्यवसाय, अगदीं मरणकालापर्यंत चालू ठेवला असेल, हें संभवत नाहीं, व शेंवटीं त्याच्या शरीरांत व बुद्धींत कदाचित् तितका त्राणही राहिला नसेल. म्हणून काव्यरचनेचा हा व्यापार त्यानें आपल्या वयाच्या साठ वर्षांपर्यंत चालू ठेविला, व याच वर्षीं त्यानें आपली शेंवटची कृति "सीतास्वयंवर" निर्मिली असें मानल्यास, शके १५४०–१६१५ हा अदमासानें नागेशाचा काल ठरतो. या सुमारें ७५ वर्षांच्या काळांत त्यानें आपली सर्व काव्यरचना केली असावी.

या विवेचनावरून नागेश हा सामराजाचा अगदीं समकालीन असून, वामनपंडितांच्या मागें दिलेल्या नवीन जन्मशकाप्रमाणें, हे दोघेही त्यांच्या-

---

१ रु. ह. ७–१६३. २ सीतास्व.–९–१४.

पेक्षां वयानें कनिष्ठ ठरतात. नागेश हा मुसलमानी अमदानींत वाढलेला असल्यानें त्याच्या सीतेच्या अंगावर मुसलमानी पद्धतीचे दागिने पडून तिला ओढणीही घ्यावी लागली आहे.[१] रामालाही हातांत 'बागदार,' 'समशेर' व 'पराणी' अशीं हत्यारें घ्यावीं लागलीं असून त्याच्या पागेंत विदेशी घोडे खेकाळत आहेत. रावणाला पाहून थंडी भरलेल्या कांहीं राजांना कपाळाला पटका बांधावा लागला आहे. सीतेच्या स्वयंवरास जमलेल्या राजांत मोरे, चव्हाण, राणे इत्यादि मराठे सरदार असले, तरी भोसल्यांचें नांव नाहीं हें पाहून आश्चर्य वाटतें; पण नागेशानें, ज्यांचा 'शिसोदये' असा उल्लेख केला आहे, त्यांनाच पुढें भोसले हें नांव पडलें असल्यामुळें, वरील उणीव अंशतः तरी भरून निघाली आहे. शिवकालीन कलाकवींच्या नभोमंडळांत वामन सामराज रघुनाथादि दैदीप्यमान ग्रह-गोलकांप्रमाणेंच नागेश हा आपल्या अनन्यसाधारण दीप्तीनें चमकत असून, त्याच्या अभ्यासानें तत्कालीन काव्यवाङ्मयावर एक निराळाच प्रकाश पाडला जात आहे. शिवाय त्याच्या काव्यांत त्याच्या कालाचा व व्यक्तित्वाचा ठसा पूर्णपणें उठल्यामुळें, त्याचें काव्य पौराणिक कथाभागावर आधारलें असूनही, त्या कालाचें प्रतिनिधिकच म्हणावयास हरकत नाहीं. अशा या आजपर्यंतच्या उपेक्षित मानकऱ्याची यापुढें तरी निदान उपेक्षा होऊं नये, एवढेंच जातां जातां येथें सुचवून ठेवावेसें वाटतें.



---

१ सीतास्व–२१८.

# रघुनाथपंडित : ४

'नलदमयंतीस्वयंवराख्यान' या उत्कृष्ट काव्याचा कर्ता रघुनाथपंडित, याच्या व्यक्तित्वावर व कालावर प्रकाश पाडण्याचा बराच कौतुकास्पद प्रयत्न गेल्या दशकांत कांहीं विद्वानांकडून झाला असला, तरी हा प्रश्न निःसंदिग्ध रीतीनें सुटला असें मात्र म्हणवत नाहीं. या काव्याची तोंडओळख प्रथमतः कै. परशुरामपंततात्या गोडबोले यांनीं सन १८५४ सालीं आपल्या 'नवनीता'च्या, व नंतर कै. माधव चंद्रोबा डुकले यांनीं १८६० सालीं आपल्या 'सर्वसंग्रहा'च्या द्वारां, महाराष्ट्र रसिकांना करून दिली असून, सन १८८३ सालीं कै. ज. वा. मोडक यांनीं 'काव्यसंग्रहां'तून अरणीकर आनंदतनयाचें 'ताटकावध' काव्य प्रसिद्ध करतांना, त्याच्याखालीं "आनंदतनय व रघुनाथपंडित हे परस्पर व्याही होते" अशी तळटीप[१] देऊन रघुनाथपंडिताबद्दल थोडेंबहुत कुतूहल जागृत केलें. सन १९०० सालीं कै. वि. का. राजवाडे तंजावरला गेले असतां, रघुनाथपंडिताबद्दल तिकडे प्रचलित असलेल्या कांहीं आख्यायिका त्यांना समजल्या, व 'गजेंद्रमोक्ष' व 'रामदासवर्णन' हे रघुनाथपंडितांचे आणखी दोन काव्यग्रंथही त्यांना उपलब्ध झाले.[२] यानंतर १९०३–४ सालच्या सुमारास कै. घ. सां. मळकर्णेकर यांना कारवार येथे दमयंतीस्वयंवराची जी एक हस्तलिखित प्रत सांपडली, तिच्या शेवटीं असणाऱ्या—

> **नळातें देऊनी वर पियुषपानींही गगनीं।**
> **निघाले त्यामागें नळसहकरी राजगमनीं॥**
> **स्वराज्यीं सर्वांतें द्विजऋषिजनांतें सुखि करी।**
> **कथा ऐसी चंदावरकर रघूनाथचि करी॥**

---

१ अनेक कविकृत कवितासंग्रह भाग १–पृ. ६. २ संकीर्ण लेखसंग्रह–(ग्रंथमाला) राजवाडे, 'रघुनाथपंडित' व 'आनंदतनय' हे दोन निबंध.

या श्लोकाच्या चौथ्या चरणावरून, हें काव्य रचणारा रघुनाथपंडित चंदावरकर, हा सुप्रसिद्ध कै. सर नारायणराव चंदावरकरांचा पूर्वज असावा अशी त्यांना शंका आली, व महाराष्ट्रभाषाभूषण रा. आजगांवकर यांनींही ती प्रत वाचून आपल्या 'कविचरित्रां'त "हा कवि जातीनें सारस्वत ब्राह्मण असून चंदीचंदावराकडील राहणारा असावा," असें अनुमान प्रदर्शित केलें. आपल्या 'गोयकरांची गोयांभायली वसणूक' या पुस्तकांत, रा. वालावलीकर यांनीं 'चंदावरकर' हा नामनिर्देश व नलोपाख्यानांतील कांहीं कोंकणी शब्द यांच्या आधारें, रघुनाथपंडित हा सारस्वत ब्राह्मण असून कारवार जिल्ह्यांतील चंदावरचाच आहे, असा आपला ठाम सिद्धांत मांडला. रा. अ. का. प्रियोळकर यांनीं यानंतर वरील कल्पनेचा निरास करण्याचा प्रयत्न करतांना, नलोपाख्यानकर्ता रघुनाथपंडित हा शिवाजी महाराजांच्या अष्ट-प्रधानांपैकीं न्यायशास्त्री पंडितराव पदारूढ रघुनाथपंडितच असून, तो कारो-मांडेल किनाऱ्यावरील एके काळीं मराठी राज्याचें व सारस्वताचें केंद्र होऊन राहिलेल्या तंजावरचा देशस्थ ब्राह्मण होता, असा आपला अगदीं अभिनव असा सिद्धांत प्रतिपादिला.[१] रा. पाटणकर,[२] रा. गो. रा. राजोपाध्ये,[३] रा. वालावलीकर ऊर्फ शणै गोंयबाब[४] व रा. श्री. म. वर्दे[५] इत्यादि विद्वानांची वरील सिद्धांतावर साधकबाधक चर्चा प्रसिद्ध झाल्यानंतर, रा. प्रियोळकरांनीं आपल्या 'दमयंतीस्वयंवरा'च्या संपादणीस[६] जोडलेल्या विस्तृत प्रस्तावनेंत, पुनः साकल्यानें सर्वांच्या मतांचा विचार करून आपल्या मूळ सिद्धांताचाच पुनरुच्चार अधिक आत्मविश्वासानें केला आहे. आज महाराष्ट्रीय सामान्य वाचकांच्या व विद्वानांच्या मनांत रा. प्रियोळकरांच्या वरील सिद्धांतानेंच मूळ धरलें असून, 'नलोपाख्यानाचा कर्ता शिवाजीचा प्रधान' या कल्पनेला निश्चित स्वरूप आल्याचें दिसून येत आहे.

म्हणूनच रा. प्रियोळकरांच्या मनांत वरील कल्पनेचा उदय कसा झाला हें पाहणें निखालस मनोरंजक होईल. रघुनाथपंडिताचें स्थळ चंदावर,

१ विविधज्ञानविस्तार—मार्च-एप्रिल-मे १९३१. २ विविधज्ञानविस्तार—आगष्ट-सपटेंबर १९३१. ३ लोकशिक्षण—डिसेंबर १९३१. ४ वि. वि.—फेब्रुआरी—मार्च—१९३३. ५ वि. वि.—एप्रिल—मे—जून—१९३३. ६ दमयंतीस्वयंवर—१९३५.

हें राजवाड्यांच्या मताप्रमाणें तंजावर हें ठरल्यावर, आनंदतनय, सामराज वगैरे शिवकालीन कवींच्या भाषेशीं त्याच्या भाषेच्या सादृश्यावरून तो शिवकालीन असावा असें प्रियोळकरांचें मत झालें. ‘ रामदासवर्णन ’ या त्याच्या काव्यांतील वर्तमानकालीन उल्लेखच काय, तर त्यांतील एकंदर वर्णन स्वतः डोळ्यांनीं पाहून नंतर केलें असलें पाहिजे असें वाटून, हा कवि रामदासांना गुरु मानणारा असा कोणी तरी पंडित असला पाहिजे अशी यापुढें त्यांची स्वाभाविकच कल्पना झाली. दमयंतीस्वयंवराच्या भाषेच्या व रचनेच्या अंतर्गत पुराव्यावरून व त्या काव्यांत जे अनेक फारसी-अरबी शब्द आले आहेत त्यावरून, त्याचा कर्ता चांगलाच विद्वान् संस्कृत पंडित व दरबारांत वागलेला असला पाहिजे असा तर रा. प्रियोळकर यांचा ग्रह झालाच, पण उपरिनिर्दिष्ट ज्या श्लोकांत हा कवि चंदावरचा असल्याचा उल्लेख आहे, त्याच श्लोकांत ‘ स्वराज्यीं सर्वांतें द्विजऋषिजनातें सुखि करी ’ ही वास्तविक नलवर्णनपर उक्ति, कविचरित्रपर आहे अशी आपली सोईस्कर समजूत करून घेऊन रा. प्रियोळकरांनीं या ल्हानशा तर्काच्या सुताच्या आधारानें, आपल्या कवीकडे द्विजऋषिजनांना संतुष्ट करण्यासारखा कांहीं तरी तसाच महत्त्वाचा अधिकार असला पाहिजे व स्वराज्यांत म्हणजे शिवाजीच्या राज्यांत अशा प्रकारचा अधिकारी म्हणजे त्याचा पंडितरावच अशा उच्चतर कल्पनेच्या स्वर्गावर स्वारी केली. शिवकालांत गाजलेले ( १ ) रघुनाथ नारायण हणमंते (२) रघुनाथ बल्लाळ कोरडे (३) रघुनाथपंडित—पंडितराव (४) रघुनाथभट उपाध्ये ( न्यायशास्त्री ) (५) रघुनाथभट चाऊरकर (६) रघुनाथभट नवहस्त; पंडितराये—ऊर्फ रघुनाथ गणेश नवहस्त ( वशिष्ठगोत्री रामदासी ) व (७) रघुनाथ गणेश ( अनंतदेवीय रघुनाथ गोवर्धनोद्धार, स्त्रीधर्मकथन, नरकविषयविवेचन, प्रायश्चित्तकुतूहल इ. ग्रंथ लिहिणारा ) असे सात रघुनाथ रा. प्रियोळकरांपुढें होते. त्यांतून आपल्या सिद्धांताच्या सिद्धीसाठीं, पहिले दोन व शेवटचे दोन रघुनाथ त्यांनीं वगळले, व उरलेले मधले तीन रघुनाथ म्हणजे रघुनाथ पंडितराव, रघुनाथभट्ट उपाध्ये व पंडितवरिष्ठ रघुनाथभट्ट चाऊरकर या सर्व एकच व्यक्ति होत असें दाखवून, तीच पुनः रघुनाथपंडित कवि (नलोपाख्यानकार), अशी आपल्या सिद्धांताची त्यांनीं रचना केली आहे. पण यांपैकीं रघुनाथ पंडितराव व रघुनाथभट्ट उपाध्ये यांचें ऐक्य दाखवितांना, ज्या

पंडितराव बखरीचा आधार रा. प्रियोळकरांनीं घेतला आहे तिच्यांतील विधानें व शक इतके विसंगत आहेत कीं, तिच्या प्रामाण्याबद्दल कोणाचेंही मन साशंक झाल्यावांचून राहणार नाहीं. सदर बखरींतील " चंदावराहून व्यंकोजी राजे यांनीं कांहीं कार्याकरितां शिवाजीराव यांजकडे रघुनाथभट उपाध्ये यांस रायगडास पाठवून दिलें. हे मोठे विद्वान् होते, सबब महाराजांनीं आपलेपाशीं ठेऊन घेतले. पंडितराईचें पद दिलें, व दानाध्यक्ष केलें. शके १५८३ सन १६६१. " या विधानावरून व्यंकोजीराजे यांनीं रघुनाथभटास शिवाजीकडे पाठविलें हें स्पष्ट होत असलें, तरी केव्हां पाठविलें हें स्पष्ट होत नाहीं. रा. प्रियोळकर म्हणतात त्याप्रमाणें, शके १५८३ (१६६१) मध्यें व्यंकोजीनें रघुनाथभटास शिवाजीकडे पाठविलें, व शके १५९६ मध्यें होणाऱ्या राज्याभिषेकसमयीं रघुनाथभटास पंडितराईचें पद देऊन दानाध्यक्ष करण्यांत आलें, असें गृहीत धरल्यास, राज्याभिषेकसमयीं शंभुभट उपाध्याला अष्ट-प्रधानांत (न्यायशास्त्री) पंडितराव अशी पदवी दिली, असें याच बखरकारानें जें आणखी विधान केलें आहे, त्यांशीं वरील विधानाची संगति लागत नाहीं. व्यंकोजीनें इ. स. १६७५ च्या सुमारास तंजावरचें राज्य आपल्या ताब्यांत घेऊन तंजावरांत उर्फ चंदावरांत मराठेशाहीची खरीखुरी स्थापना केली अशी जर रा. प्रियोळकर माहिती पुरवितात,[१] तर इ. स. १६६१ मध्यें तंजावरांत आपलें कायमचें प्रस्थ स्थापन झालें नसतांना, व्यंकोजी स्वतंत्रपणें रघुनाथभटास शिवाजीकडे रायगडास पाठवील हें संभवनीय दिसत नाहीं. शहाजीराजांनीं देखील रघुनाथभटास शिवाजीकडे पाठविलें असलें, तरी केव्हां पाठविलें, रघुनाभटास पंडितराईचें पद शिव-राज्याभिषेकसमयीं देण्यांत आलें कीं, सभासदबखरीप्रमाणें जयसिंग-प्रकरणाच्या वेळीं कीं, शके १५८३ (१६६१) मध्यें, इत्यादि गोष्टींचा उलघडा पंडितराव बखरींवरून निःसंदिग्धपणें होऊं शकत नसल्यामुळें, श्री. प्रियोळकरांनीं रघुनाथभटास चंदावरचा ठरविण्यासाठीं, त्यांच्या महाराष्ट्रांत झालेल्या आगमनाचा वरील बखरीवरून दिलेला पुरावा निःसंकोचपणें स्वीकारतां येत नाहीं. पुनः शहाजीनें रघुनाथभटास शिवाजीकडे पाठविला असें पंडितराव बखर म्हणत असली, तरी राधामाधवविलासचंपूच्या प्रस्तावनेंत शके

---

१ दमयंतीस्वयंवराख्यान–प्रास्ताविक–पृ. १३.

१५८३ मध्यें शहाजीनें कोणाला तरी शिवाजीकडे पाठविलें, असें ज्याअर्थी कै. राजवाडेही चांचपडत म्हणतात, व सभासदबखरीमध्यें रघुनाथ बल्लाळ सबनीस यास शहाजीनें जसें पुण्यास बालशिवाजीबरोबर रवाना केलें असें म्हटलें आहे, तसा रघुनाथभटास पाठविल्याचा उल्लेख केला नसल्यामुळें, शहाजीनें कोणास पाठविलें याचा समाधानकारक निकाल लागत नाहीं. तसेंच रघुनाथ-भटास चंदावरकर असें जें उपनांव लावण्यांत आलें आहे, तें त्याच्या तिकडील दीर्घकालीन वास्तव्यामुळेंच असलें, तरी त्याचें हें वास्तव्य तंजावरांत मराठी सत्तेच्या आधींच झालें होतें, असें मानण्यास रा. प्रियोळकरांना जी जागा सांपडली आहे,[१] तिचा मागमूस इतरांना मात्र लागणें शक्य दिसत नाहीं. वास्तविक जीं कांहीं मराठी घराणीं तंजावराकडे गेलीं, तीं शहाजीबरोबरच तिकडे गेलीं, असें इतिहास सांगत असतां, तंजावरांतील पंडित लोकांच्या पुरातन वास्तव्याचा, तेथील पूर्वीच्या राजेप्रधानांच्या विद्वत्तेचा व ग्रंथ-कर्तृत्वाचा, आमच्या रघुनाथभटाशीं केवळ पांडित्याच्या आधारावर जो जुना घनिष्ठ संबंध रा. प्रियोळकर जोडूं पहात आहेत, व "त्याचा विद्याभ्यास व संस्कृत भाषेचा व्यासंग तंजावरांत इतर पंडितांच्या सांनिध्यांत झाला असला पाहिजे," असें जें छातिठोक अनुमान करीत आहेत, त्याला त्यांनीं काय आधार दिला आहे? विजापूरकरांची तंजावर-वरील पहिली स्वारीच मुळीं सन १६४४ च्या सुमारास होऊन, शहाजीचा व तंजावरचा प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष असा संबंध याच वेळीं आला असें जर खुद्द रा. प्रियोळकरांनाच वाटतें,[२] तर त्यापूर्वी तरी निदान रघुनाथभटाचा संबंध तंजावराशीं होता असें त्यांनाच काय, पण कोणालाही म्हणतां यावयाचें नाहीं. तंजावरच्या रघुनाथनायकाचे 'गजेंद्रमोक्ष' व 'नलचरित्र' हे संस्कृत ग्रंथ रघुनाथपंडिताच्या नजरेखालून गेले असतील असें फार तर म्हणतां येईल. पण रघुनाथपंडित संस्कृतज्ञ होता, व त्यानेंही 'गजेंद्रमोक्ष' व 'नलोपाख्यान' रचिलें आहे, एवढ्यावरून त्याचें अध्ययन व विद्याव्यासंग कांहीं काल तंजावरच्या रघुनाथ नायकाच्या आश्रयाखालीं झाला असावा[३] व तो

---

१ दमयंतीस्वयंवराख्यान–प्रस्तावना, पृ. १४. २ दमयंतीस्वयंवराख्यान–प्रस्तावना, पृ. ९. ३ दमयंतीस्वयंवराख्यान–प्रस्तावना–पृ. ३२.

शहाजीकडे अधून मधून येऊन जाऊन होता, असें अनुमान काढून त्याला तंजावरचा पुरातन रहिवासी करण्याचा रा. प्रियोळकरांचा प्रयत्न निवळ अफाटच म्हटला पाहिजे.

तथापि वर वर्णन केल्याप्रमाणें, रघुनाथभट उपाध्यास, पंडितराव बखरीच्या आधारें रघुनाथ पंडितराव बनवून, व तंजावरांत शहाजीचें पाऊल पडण्यापूर्वी तो तेथील रघुनाथ नायकाच्या सांनिध्यांत संस्कृत भाषेचा व्यासंग करीत असला पाहिजे, अशा अनुमानानें त्याचें संस्कृत पांडित्यच केवळ दाखवून रा. प्रियोळकर थांबले नसून, या अनमानधक्क्याच्या पांडित्याच्या मोठ्या आधारावरच 'राधामाधवविलासचंपू'त जयराम पिंड्यानें उल्लेखलेल्या पंडितवरिष्ठ रघुनाथभट्ट चाऊरकराशीं त्याचें ऐक्य सिद्ध करण्याचा त्यांनीं भगीरथप्रयत्न केला आहे. रघुनाथपंडिताला शहाजीच्या दरबारांत चाऊरकर असें जें उपनांव होतें, तें 'चंदावरकर' अथवा 'तंजावरकर' याचें अपभ्रष्ट रूप होय, असें जरी रा. प्रियोळकर म्हणतात, तरी 'चंदावर'चें 'चाऊर' झाल्याचें अन्य उदाहरण त्यांना दाखवितां न आल्याचें, रा. वर्दे यांनीं नमूद केलें आहे.[१] या शिवाय शहाजीकडून किंवा व्यंकोजीकडून महाराष्ट्रांत जाणाऱ्या रघुनाथपंडितास चंदावरकर हें उपनांव दिलें जाणें जसें शक्य आहे, तसें खुद्द शहाजीच्याच दरबारांत असणाऱ्या रघुनाथपंडितास मिळणें शक्य नाहीं, अशी रास्त शंका रा. वर्दे यांनीं उपस्थित केली असून, रघुनाथ चंदावरकराचा रघुनाथपंडित चाऊरकरांशीं अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं असें ठरवितांना, 'चाऊरकर' हे नीरथडीचे चावरे असल्याचा कै. राजवाड्यांचा हवालाही त्यांनीं देऊन टाकला आहे.[२] यापुढें कै. राजवाड्यांच्या मताप्रमाणें शके १५७५ ते १५८० च्या दरम्यान शहाजीच्या दरबारीं वास्तव्य करून आपला 'चंपू' रचणाऱ्या जयरामानें, रघुनाथपंडिताचा 'चंदावरकर' असा खरा उल्लेख न करतां 'चाऊरकर' असा अपभ्रष्ट व चुकीचा उल्लेख कसा केला, व पांच वर्षांतही त्यानें आपली चुकी कशी सुधारली नाहीं, या रा. वालावलीकर यांच्या शंकेनें,[३] रा. प्रियोळकरांना सूचना

---

१ विविधज्ञानविस्तार–वर्ष–६४–अंक ५. २ विविधज्ञानविस्तार वर्ष ६४, अंक ५. ३ विविधज्ञानविस्तार, जुलै–१९३१.

मिळाल्यामुळें, जयरामानें रघुनाथपंडिताचा ‘चाऊरकर’ असा उल्लेख जातां जातां ऐकला व आपली चूक सुधारण्यास त्यास अवसरही न मिळण्या-इतका त्याचा मुक्कामही त्या दरबारांत अगदीं थोडा होता, असें दाखविण्या-साठीं, कै. राजवाडे यांनीं ठरविलेला ‘चंपू’चा शके १५७५–१५८० हा काल झुगारून देऊन तो शके १५८३ पर्यंत बाढविण्याची रा. प्रियोळकरांनीं कशी मखलाशी केली आहे, याचें रा. वर्दे यांनीं मोठें मार्मिक व मनोरंजक विवेचन केलें आहे.[१] जयराम पिंड्ये व रघुनाथपंडित यांची फक्त ओझरती भेट झाली, असें कोणीकडून तरी सिद्ध करण्यासाठीं, रघुनाथपंडित शहाजीकडून शिवाजीकडे निघून आल्याचें, व जयराम पिंड्ये कर्नाटकांत गेल्याचें अगदीं योगायोगाचें शके १५८३ हेंच साल, ‘चंपू’तील तत्पूर्वीच्या कांहीं घडामोडीच्या स्पष्ट उल्लेखामुळें, मार्मिक वाचकांच्या गळीं उतरत नाहीं असें पाहून, अलीकडे रा. प्रियोळकरांनीं आपल्या संपादणीच्या प्रस्तावनेंत[२] आपला पूर्वीचा पवित्रा बदलला असून, सदर ‘चंपू’ व्यंकोजीच्या सांगण्यावरून जयरामानें शहाजीची स्तुति व वर्णन करण्याच्या उद्देशानें शहाजीच्या मरणानंतर लिहिला, असा कोणा कै. के. व्ही. लक्ष्मणराव, एम्. ए. यांच्या कै. राजवाड्यांच्या मताचें खंडन करणाऱ्या अभिप्रायाचा दुजोरा मिळविला आहे. पण अशा फुसक्या पुराव्याच्या जोरावर जयराम व रघुनाथपंडित यांचा दृढ परिचय खोटा ठरवून त्यांची ओझरतीच भेट झाल्याचा आपला एळकोट रा. प्रियोळकर सोडीत नसंल, तरी ‘राधामाधव-विलासचंपू’चे सूक्ष्म अभ्यासक व इतर मार्मिक वाचक, रा. प्रियोळकरांच्या निवळ भिडेसाठीं रघुनाथभट चंदावरकर व रघुनाथ चाऊरकर या वास्तविक भिन्न असणाऱ्या व्यक्ति एकच मानण्याचा मोटा प्रमाद करतांना, जयरामा-सारख्या चौकस व सूक्ष्म दृष्टीच्या पंडितवरिष्ठाच्या गळ्यांत ‘चंदावरकर’ यांचें ‘चाऊरकर’ असें अपभ्रष्ट रूप अनवधानानें ऐकून तें आपल्या दरबारी ग्रंथांत समाविष्ट केल्याची अश्लाघ्य चूक बांधणार नाहींत अशी आशा आहे. जयरामासारखा संस्कृत पंडित केलें तर मराठी शब्दांचें संस्कृतीकरण करील, अपभ्रष्ट रूप कदापि आपल्या संस्कृत ग्रंथांत योजणार

१ वि. वि. वर्ष ६४ अंक ५. २ दमयंतीस्वयंवराख्यान–प्रस्तावना पृ. १६.

नाहीं, हा वालावलीकरांचा[१] एकच मुद्दा इतका जोरदार आहे कीं, त्यावरून रघुनाथपंडित चावरे या भिन्न पंडितवरिष्ठाचाच उल्लेख जयराम करीत आहे, हें सिद्ध होण्यासारखें आहे.

आणखी याहीपेक्षां दिलेलखान व मिरजाराजा जयसिंग यांना अवरंगजेबानें शिवाजीविरुद्ध पाठविलें असतां, जयसिंगाकडे रघुनाथपंडितानें शिष्टाई करून शिवाजीमहाराजावरील अरिष्ट दूर केल्याचें श्रेयही आपल्या कवीच्या पदरीं बांधण्याचा उपक्रम सभासदबखरीच्या आधारें रा. प्रियोळकरांनीं केला आहे.[२] त्यांच्या म्हणण्याप्रमाणें सदर बखरींत उल्लेखलेले रघुनाथपंडित व रघुनाथपंत कोर्डे या अगदीं वेगळ्या व्यक्ति असून, "रजपुताजवळ प्रसंग पडला तर हे थोर शास्त्रज्ञ आहेत, रजपूतही शास्त्र जाणतो, त्याशीं यांशीं गांठ बरी पडेल" असा विचार करून शिवाजीनें रघुनाथ-पंडिताला ज्याअर्थी त्याच्याकडे पाठविलें, त्याअर्थी या शिष्टाईत आपल्या विद्वत्तेची जयसिंगावर त्यानें चांगलीच छाप पाडली असली पाहिजे. पण ज्या छापेचा परिणाम शिवाजीची आग्र्याहून सुटका करण्याइतका बलवत्तर झाला, ती जयसिंगावर पाडणाऱ्या रघुनाथपंडिताचें नांव सभासदाशिवाय दुसऱ्या कोणीही घेतलेलें न आढळल्यामुळें, रा. प्रियोळकरांनीं 'दमयंतीस्वयंवरा'तील 'स्तविली रघुपतिपंडितें कविमंडितें' या ओळीमधल्या 'कविमंडितें' याबद्दल 'कृतिमंडितें.' असा पाठ स्वीकारून, व त्यांतील 'कृती'चा अर्थ राजकारणांतील कामगिरी असा करून, पुनः ती कृति व जयसिंगप्रकरण यांचा जो अजब सांधा जोडून दाखविला आहे, तो संशोधनक्षेत्रांत केवळ अपूर्व आहे. वास्तविक 'कृति' याचा येथें 'काव्यकृति' असा साधा अर्थ अभिप्रेत असतां त्याचा वरील राजकारणाशीं संबंध लागावा म्हणून, मन मानेल तसा अर्थ लावून रा. प्रियोळकरांनीं, रघुनाथभटानें आपण केलेल्या कामगिरीचा स्वमुखानें दिलेला हा कबुलीजबाब, व तोही 'नलोपाख्याना'त असल्याचें भासवून त्या काव्याचें स्वाभाविकच त्याच्या वांट्यास आलेलें कर्तृत्व, असें दोन पक्षी एकाच धोंड्यानें फारच कौशल्यानें मारले आहेत.

---

१ वि. वि. वर्ष ६४ अंक २–३ रा. २ दमयंतीस्वयंवराख्यान—प्रस्तावना, पृ. १७–२१.

एकंदरीनें पाहतां, नलोपाख्यानाची एक प्रत कारवारला सांपडली म्हणून अथवा त्या काव्यांत कांहीं कोंकणी शब्द आहेत एवढ्यावरून त्याचा कर्ता सारस्वत ब्राह्मण होता, हा रा. वालावलीकरांचा सिद्धांत जसा स्वीकारतां येत नाहीं, तसाच रा. प्रियोळकरांनीं बांधलेल्या निरनिराळ्या अनुमानांवरून तो शिवाजीचा पंडितराव प्रधान होता, हा सिद्धांतही मान्य करतां येत नाहीं. विशेषतः ज्या पंडितरावबखरीवर भिस्त ठेऊन रघुनाथभट उपाध्ये व रघुनाथपंडित-पंडितराव यांचें ऐक्य दाखविण्याचा प्रयत्न त्यांनीं केला आहे, तिच्यांतील मुख्य मुद्द्याचींच विधानें इतकीं विसंगत व परस्परविरोधीं आहेत कीं, या बखरकाराला, रा. प्रियोळकरांशिवाय दुसरा कोणीही ऐतिहासिक प्रामाण्याच्या दृष्टीनें हातांत देखील धरणार नाहीं. शिवाय जी बखर अगदीं अलीकडे म्हणजे सन १८५० मध्यें राजोपाध्ये घराण्यांतील वादांत पुरावा करण्याच्या उद्देशानें, म्हणजे वादीला अथवा प्रतिवादीला अनुकूल किंवा प्रतिकूल अशा पाहिजे तशा गोष्टींचा अंतर्भाव करून रचली जाण्याचा संभवच अधिक, तिच्या आधारावर शिवकालांतील कांहीं प्रमुख घटनांचा निर्णय करूं पाहणें म्हणजे, सामान्य वाचकांची भलतीच दिशाभूल करणें होय. रा. प्रियोळकर सांगतात त्याप्रमाणें, रघुनाथभट उपाध्ये हाच रघुनाथ पंडितराव व तोच पुनः दमयंतीस्वयंवराचा कर्ता असता, तर रघुनाथपंडिताच्या या आख्यानाचा, ‘नवनीता’च्या द्वारां महाराष्ट्रीय वाचकांना प्रथम परिचय होण्याच्या अवघ्या चार वर्षांपूर्वींच रचलेल्या या बखरींत तसा स्पष्ट उल्लेख आल्याशिवाय कसा राहिला असता? नलोपाख्यानासारखें काव्य जर रघुनाथभटानें खरोखर रचलें असतें, तर त्याच्या एवढ्या मोठ्या श्रेयाचा डंका या पंडितरावबखरीच्या लेखकानें खात्रीनें वाजविला असता. यावरून आपला रघुनाथभट एकेकाळीं पंडितराव झाला असला, तरी तोच ‘दमयंतीस्वयंवरा’चा कर्ता, अशी निदान त्या बखरकाराची तरी कल्पना दिसत नाहीं. पंडितराव बखरीवरून रघुनाथभट व सामराज हे एकाच कुळांतले आहेत, असें रा. प्रियोळकरांना दिसतांच, सामराजानें जसें ‘रुक्मिणी-हरण’ रचलें तसें त्याचा भाऊबंद असणाऱ्या रघुनाथभटानेंही ‘दमयंतीस्वयंवराख्याना’सारखें आख्यान रचलें असलें पाहिजे, अशा कल्पनेची मदार रा. प्रियोळकरांनीं रचली, व वास्तविक दुसऱ्याच रघुनाथपंडिताचें या आख्यानाचें कर्तृत्व

रघुनाथभटास त्यांनीं बहाल करून टाकलें. रा. प्रियोळकरांनीं याप्रमाणें रघुनाथ-पंडित चाऊरकरांशीं रघुनाथभट उपाध्याचें व रघुनाथपंडितरावाचें कल्पिलेलें एकत्वही वरील विवेचनावरून असिद्ध ठरलें असून, या सर्वांचें 'नलो-पाख्यानकारा'शीं मानलेलें अभिन्नत्वही, निवळ 'आवळ्याची मोट' या सदरांत पडलेलें आहे. खरें पाहिलें तर, नलोपाख्यानकाराचे काव्यविषयक व आनुषंगिक गुण वर उद्धृत केलेल्या शिवकालीन सात रघुनाथांपैकीं ज्याच्याशीं अधिक प्रमाणांत प्रमाणानिशीं जुळतील, तोच सदर काव्याचा कर्ता रघुनाथपंडित, अशा दिशेनें जाण्याचें सोडून, रा. प्रियोळकर 'नलो-पाख्यानाचा कर्ता शिवाजीचा प्रधान' हा सिद्ध करावयाचा सिद्धांतच गृहीत धरून त्याला ओढून ताणून 'नलोपाख्यानकारा'चे गुण चिकटवीत असल्यामुळें, त्याचें हे संशोधन हेत्वाभासमूलक व अपसिद्धांतमय झालें आहे.

आज आपल्यापुढें असणाऱ्या 'दमयंतीस्वयंवरा'च्या भाषेवरून व रचनापद्धतीवरून त्याचा कर्ता निःसंशय शिवकालीन असून, उत्तम विद्वान्, संस्कृतपंडित व फारशी–आरबी भाषाप्रवीण असावा, हे कोणालाही मान्य होईल. आपल्या काव्यांत 'चतुरसंमत युक्तीचा', 'गड कोट' इत्यादिकांवर आधारलेल्या उपमांचा, व दुसऱ्या चालीरीतींचा त्यानें जो आपाततः उल्लेख केला आहे, त्यावरून तो मराठी दरबारांत जसा वागलेला होता, तसाच त्याच्या 'रामदासवर्णन' या काव्यावरून तो रामदासांचा शिष्य व रामभक्त होता याबद्दल शंका राहत नाहीं. रघुनाथपंडितानें आपल्या वसतिस्थानाचा स्पष्ट उल्लेख आपल्या तिन्ही काव्यांत कोठेंच केला नसला, व कै. मळकर्णकरांना कारवार येथें सांपडलेल्या 'दमयंतीस्वयंवरा'च्या एकाच हस्तलिखित प्रतींतील, रा. प्रियोळकरांनीं प्रक्षिप्त मानलेल्या शेंवटच्या श्लोकांतील 'कथा ऐसी चंदावरकर रघूनाथचि करी' या एका ओळीवरून आमचा कवि चंदावरचा किंवा तंजावरचा रहिवासी असें समजणें थोडें घाईचें असलें, तरी कै. राजवाड्यांना तंजावरप्रांतींच त्याच्यासंबंधीं बऱ्याच आख्यायिकांचा तलास लागणें, व 'गजेंद्रमोक्ष' व 'रामदासवर्णन' या त्याच्या दोन काव्यांच्या हस्तलिखितांचा लाभही त्यांना तेथेंच होणें, या दोन गोष्टींवरून रघुनाथपंडिताचें तंजावरास दीर्घकाल वास्तव्य होतें, असें म्हणावयास निदान कोणताच प्रत्यवाय दिसत नाहीं. 'दमयंतीस्वयंवराख्यान'कर्त्या रघुनाथ-

पंडितासंबंधीं त्याच्या काव्यांतील अंतःपुराव्यावरून एवढीच वैयक्तिक माहिती उपलब्ध असून, शिवकालांत गाजलेल्या अनेक रघुनाथांशीं ती पडताळून पाहणें अगत्याचें आहे.

प्रथमतः नलोपाख्यानकार रघुनाथपंडिताला नेमका हुडकून काढण्यासाठीं 'चंदावरकर' अथवा 'तंजावरकर' असें आडनांव त्याला मिळण्याइतकें त्याचें तंजावरला वास्तव्य असणें, हें जें एक महत्त्वाचें गमक रा. प्रियोळकर मानतात असें दिसतें, तें तरी शिवकालांत वावरणाऱ्या वरील सात रघुनाथांपैकीं कितींना सार्थतेनें लावतां येईल? रघुनाथभट उपाध्ये, रघुनाथपंडितराव व रघुनाथपंडित चाऊरकर यांचें एकत्व व त्यांचें तंजावरांत दीर्घकाल वास्तव्य सिद्ध करण्याचा रा. प्रियोळकरांचा प्रयत्न कसा फसला आहे, हें वर दाखविलेंच आहे. उरलेल्या रघुनाथांपैकीं, रघुनाथ बल्लाळ कोर्डे यांचा तर तंजावरशीं अगदींच अल्पकाळ संबंध आला असून, रघुनाथ गणेश नवहस्त व व्यंकोजी राजाची पत्नी दीपाबाई इचा आश्रित अनंतदेवीय रघुनाथ हीं एकच व्यक्ति मानली, तरी तिला 'तंजावरकर' म्हणण्याइतका कांहीं तिचा संबंध तंजावरशीं नसावा. वास्तविक 'चंदावरकर' असें उपनांव पडावयास तेथें दीर्घकाल वास्तव्याची जी अपेक्षा आहे, ती कोणत्याही रघुनाथाकडून सफल होत नाहीं असें दिसत असूनही, रा. प्रियोळकर मोठ्या नेटानें इतर गमकांकडे वळले आहेत, व आपला रघुनाथभट, नलोपाख्यानकार रघुनाथपंडिताप्रमाणेंच पंडित आहे असें दिसल्यावर, पंडितरावबखरीच्या व 'स्वराज्यीं सर्वांतें द्विजऋषिजनातें सुखि करी' या प्रक्षिप्त श्लोकाच्या ओळीच्या आधारें, त्या दोघांचें एकत्व ते बिनदिक्कत मानीत आहेत. पण नलोपाख्यानकाराचे इतर गुण आपल्या रघुनाथपंडितरावांत कितपत आहेत, याचा त्यांनीं कितीसा विचार केला आहे? नलोपाख्यानकार जसा रामदासशिष्य होता, किंवा राजदरबारपरिचित व पारशीभाषाप्रवीण होता, तसा रघुनाथभट किंवा रघुनाथपंडितरावही होता असा भक्कम पुरावा, रा. प्रियोळकर सादर करीपर्यंत, या दोन व्यक्तींचें एकत्व कसें बरें मानतां येईल? जो रघुनाथभट उपाध्ये, सन १६६१ सालीं तंजावराहून आल्यापासून सन १६७४ तील शिवराज्याभिषेक होऊन परत तंजावरास जाईपर्यंत १३ वर्षें, कसलेंही ग्रंथकर्तृत्व न करतां, शिवाजीच्या आश्रयाखालीं निरुद्योगी बसून राहतो, थोडी देखील

विद्याभिरुचि दाखवीत नाहीं, त्याच्या 'रामदासवर्णन' 'गजेंद्रमोक्ष' व 'दमयंती-स्वयंवर' अशीं एकामागून एक सरस काव्यें रचणाऱ्या ग्रंथकाराशीं कल्पिलेल्या एकत्वावर कोण कितीसा विश्वास ठेवील? रघुनाथभट उपाध्ये दानाध्यक्ष होता असें सिद्ध करणारें, त्याच्या स्वदस्तुरचें एकही आज्ञापत्र नाहीं, व घटकाभर तो दानाध्यक्ष झाला होता असें मानलें, व तोच नलोपाख्यानाचा कर्ता असेंही गृहीत धरलें, तरी त्याच्या ग्रंथांत त्याच्या, धार्मिक व कुलधर्म-कुलाचारविषयक पुरोहिताच्या व्यवसायाची छाप पडल्याशिवाय कशी राहिली असती? सामराज व नागेश यांच्या ग्रंथांत अनुक्रमें राजोपाध्याय, व जोशी अशा त्यांच्या अनुक्रमें वृत्तींचा जसा स्पष्ट ठसा उमटलेला दिसतो, तसा 'नलोपाख्यानां'त कोठेंच दिसत नसल्यानें, सदर आख्यान रघुनाथभटासारख्या उपाध्यानें रचिलें असेल असें म्हणवत नाहीं. रा. प्रियोळकरांनीं रघुनाथभट उपाध्ये व नलोपाख्यानकर्ता रघुनाथ यांच्यांत एक दोन गुणांचें केवळ साम्य पाहून दुसऱ्याचें सर्वच गुण पहिल्याच्या आंगीं बळेंच चिकटविल्यामुळें, त्या दोघांच्या खोट्या सायुज्यतेचें स्वानंदसुख वाचकांना मात्र भरपूर उपभोगावयास मिळालें आहे.

रघुनाथ बल्लाळ कोर्डेसुद्धां मुत्सद्दी व राजदरबारपरिचित म्हणून जसा प्रसिद्ध आहे, तसा विद्वत्व, कवित्व व समर्थशिष्यत्व या गुणांत नसल्यानें, त्याच्याकडे 'नलोपाख्याना'चें कर्तृत्व जसें देतां येत नाहीं, तसें रघुनाथ गणेश नवहस्त व अनंतदेवीय रघुनाथ हे देखील अनुक्रमें समर्थशिष्य व संस्कृत पंडितच केवळ असल्यानें, त्यांना देखील 'नलोपाख्याना'चे कर्ते असें कल्पितां यावयाचें नाहीं. रघुनाथपंडित चाऊरकर हा देखील जयराम पिंड्यानें 'पंडितवरिष्ठ' अशा विशेषणानें भूषविला असला, तरी 'नलो-पाख्यानकर्त्या'च्या इतर गुणांचा त्याच्या ठिकाणीं अभावच स्पष्ट दिसतो. शहाजीच्या दरबारांतील पंडितांत त्याची गणना असली, तरी 'चावरे' या त्याच्या खऱ्या उपनांवावरून त्याला 'चंदावरकर' कसें म्हणतां येईल हा प्रश्नच आहे.

राहतां राहिल्या रघुनाथांपैकीं रघुनाथ नारायण हणमंते यांचें नलोपाख्यान-काराशीं जितकें साधर्म्य आढळतें, तितकें दुसऱ्या कोणांतही आढळत नाहीं. नलोपाख्यानकार आपणास चंदावरकर म्हणवितो, अथवा दुसरे त्याला तसें

उपनांव लावतात, तर शहाजी व व्यंकोजी राजांच्या कारकीर्दीत रघुनाथ नारायणाचेंही त्याला 'तंजावरकर' असें उपनांव पडण्याइतकें दीर्घकाल वास्तव्य तंजावरास झाल्याचें इतिहास सांगत आहे. "रघुनाथ नारायणाचे वडील नारायण त्रिमल हे शहाजीराजाबरोबर इ. स. १६३७ मध्यें कर्नाटक प्रांतीं गेले होते व ते बंगळूर येथें रहात असत. ते इ. स. १६५३ मध्यें वारल्यावर रघुनाथ नारायणाची बुद्धिमत्ता, शहाणपण आणि स्वामिभक्ति लक्ष्यांत घेऊन शहाजीराजांनीं त्यांस आपल्या कर्नाटकांतील जहागिरीचे त्याच सालीं दिवाण नेमिलें, व तें काम त्यांनीं स. १६८२ पर्यंत आमरण केलें. रघुनाथ नारायणानें मराठ्यांची सत्ता कर्नाटकांत संस्थापित करण्याचे कामीं शिवाजीमहाराजांस अप्रतिम सहाय्य केलें. शहाजीराजास कर्नाटक-मध्यें तंजावर प्रांत जहागीर मिळाला व तेथें त्यांचे पश्चात् व्यंकोजीराजे यांनीं स्वतंत्र राज्य संस्थापित केलें. त्या सर्व राजकारणांमध्यें रघुनाथ नारायण हणमंते ह्यांचें प्रधान अंग असून, त्यांची त्यांत उच्च प्रतीची मुत्सद्देगिरी दिसून येते. व्यंकोजीराजे यांनीं शिवाजी महाराजांस साह्य करून मराठी साम्राज्याचा प्रसार अखिल दक्षिण हिंदुस्थानांत करावा, अशी अहर्निश कळकळ व महत्त्वाकांक्षा, रघुनाथ नारायण हणमंते यांच्या ठिकाणीं होती, व त्याप्रमाणें त्यांनीं अंतःकरणपूर्वक प्रयत्नही केले. शिवाजी-महाराजांचे उच्च विचार व त्यांच्या महत्त्वाकांक्षा व्यंकोजीसारख्या गर्विष्ठ व डामडौली पुरुषाच्या लक्षांत येईनांत, म्हणून त्यांनीं त्याची स्पष्ट शब्दांनीं कानउघाडणी करून, ते शिवाजीमहाराजांकडे इ. स. १६७७ मध्यें गोवळकोंड्यास गेले. तेथें त्यांनीं त्यांचें मन वेधून, त्यांस कर्नाटकावर स्वारी करून येण्याबद्दल प्रोत्साहन दिलें. शिवाजीमहाराजांनीं त्यांच्या शहाणपणाच्या व राजकारणाच्या सल्ल्यास योग्य मान देऊन ते कर्नाटकावर चालून गेले, व त्यांनीं चंदीचंदावर, अरणी वगैरे प्रांत काबीज केला. ह्या स्वारीमध्यें रघुनाथ नारायण हणमंते ह्यांचें महाराजांस अप्रतिम साह्य झालें, म्हणून त्यांनीं त्यांसच नवीन जिंकलेल्या सर्व प्रांतांवर, आपल्या वतीनें मुख्य कारभारी नेमिलें होतें."[१] इतकी मुत्सद्देगिरी अंगीं असूनही

१ इतिहाससंग्रह—फेब्रुआरी—मार्च—एप्रिल—१९११.

रघुनाथ नारायण, पांडित्यांत कांहीं कमी नव्हता. नलोपाख्यानाचा कर्ता रघुनाथपंडित हा जसा पंचकाव्यें जाणणारा उत्तम संस्कृतज्ञ, व्यवहार-चतुर, दरबारी रसिक व फार्शीभाषाप्रवीण होता, तसाच रघुनाथ नारायण-देखील उत्तम विद्वान्, संस्कृतज्ञ व फारशीभाषातज्ज्ञ असल्याचा भरपूर पुरावा मिळण्यासारखा आहे. नलोपाख्यानांत येणारे फारशी शब्द ज्या राजव्यवहारकोशांत समाविष्ठ केले आहेत, तोच मुळीं शिवाजी महाराजांच्या आज्ञेवरून रघुनाथ नारायणानें रचिल्याचें "इतिश्रीशिवच्छत्रपति प्रियामात्येन नारायणाध्वरिसूनुना रघुनाथेन शिवराजनियोगतः कृते व्यवहारकोशे पण्यवर्गो दशमस्समासः ।।–राजकोशनिघंटु ( Last verse & colophon )[१]" या अवतरणावरून सिद्ध होण्यासारखें आहे. राजव्यवहारकोश खरा धुंडिराज व्यासानें रचला असाही पुरावा रा. प्रियोळकरांनीं सादर केला आहे. पण मूळ कोश रचण्यास शिवाजीनें रघुनाथ नारायणासच आज्ञा केली असल्यानें, शिवाजी त्याची विद्वत्ता जाणत होता, हें तर खरेंच. शिवाय "कोशोऽयं ढुंढिराजेन रघुनाथमुदे कृतः!" या रा. प्रियोळकरांनीं दिलेल्या अवतरणा-वरूनही[२] धुंडिराज व्यासानें कोशरचना केली असें मानलें, तरी ती रघुनाथ नारायण हणमंत्यांचे देखरेखीखालींच करणें शक्य होतें. कारण व्यवहारांतील व दरबारांतील नित्याचे फार्शी शब्द त्याला जसे टाऊक असतील तसें ढुंढीराजासारख्या निव्वळ संस्कृत भाषापंडिताला अवगत असणें कसें शक्य आहे? पुनः प्रसिद्ध इतिहाससंशोधक कै. द. वि. आपटे व प्रा. रा. वि. ओतुरकर यांनींही "यवन वचनांनीं लुप्तप्राय झालेली विबुधभाषा प्रसृत करण्यासाटीं व राजाच्या रोजच्या उपयोगासाटीं राजव्यवहारकोश रचावा म्हणून मूर्धा-भिषिक्त झालेल्या शिवाजीनें मला आज्ञा केल्यावरून मी हा कोश रचला आहे" असें रघुनाथ नारायणाच्या तोंडचे उद्गार उध्दृत करून, "नलदमयंती-स्वयंवराचा कर्ता रघुनाथपंडित तो हाच" असा आपला स्पष्ट अभिप्रायही देऊन टाकला आहे.[३] आणखी असें कीं, नलोपाख्यानकर्त्या रघुनाथपंडितानें

---

१ शिवचरित्रप्रदीप ( भारतेतिहास संशोधक मंडळ ) पृ. १३७.
२ दमयंतीस्वयंवराख्यान–प्रस्तावना–पृ. २७. ३ महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास ( १९४१ ) पृ. ३०.

'रामदासवर्णन' रचून आपली समर्थ भक्ति दर्शविली आहे. रघुनाथ नारायण हा देखील समर्थभक्त असून श्रीरामलक्ष्मणांच्या मूर्ती समर्थांच्या मुद्दाम मागणीवरून त्यानेंच कर्नाटकांतून पाठविल्या होत्या.[१] यावरून 'रामदासवर्णना'चें कर्तृत्वही त्याच्याकडेच जात असून, तें त्यानें समर्थांना प्रत्यक्ष पाहूनच रचल्याचें उघड दिसतें. पुढें व्यंकोजीशीं त्याचें न पटल्यामुळें, तो सन १६७५ त शिवाजीकडे महाराष्ट्रांत आल्याचें रियासतकार सरदेसाईही सांगत असून, पाली येथील खराडे व काळभोर यांच्यांतील मोकदमीच्या तंट्याच्या ता. १ फेब्रुवारी १६७६ च्या दिव्य प्रसंगीं, श्रीशिवछत्रपतीसमवेत हजर असणाऱ्या मंडळींत रघुनाथ नारायणही दिसत असल्यानें, तो निदान १६७६ पर्यंत तरी इकडेच होता असें म्हणतां येतें.

'नलोपाख्याना'चा कर्ता जसा आपणास रघुनाथपंडित म्हणवितो, तसेंच रघुनाथ नारायण हणमंत्यासही 'रघुनाथपंडित' असें संबोधीत होते असें तत्कालीन पत्रव्यवहारावरून दिसून येईल.[२] राजव्यवहारकोशाच्या दुसऱ्या कांहीं प्रतींतील 'नारायणाध्वरिसूनुना रघुनाथपंडितेन' अशा उल्लेखावरूनही वरील गोष्ट प्रत्ययास येत असून, 'शिवदिग्विजय' कारानें उद्धृत केलेल्या व्यंकोजीराजास शिवाजीनें लिहिलेल्या पत्रातही, 'रघुनाथ नारायणाचा' 'रघुनाथपंडित' असाच उल्लेख केलेला आहे.[३] याच बखरकारानें पुढें "रघुनाथपंत आधींच पंडित, त्यांत कारभारी, विशेष विद्वज्जनांचा समागम, न्यायनीतिपरनिष्ठ, ज्ञाते" असें त्याचें गौरवपूर्ण वर्णन केलें असल्यानें, रघुनाथ नारायणाच्या पांडित्याबद्दल आतां कोणासही शंका घेण्याचें कारण राहत नाहीं.

शेवटीं रघुनाथ नारायण हणमंते हाच नलोपाख्यानकर्ता रघुनाथपंडित हा माझा सिद्धांत रा. प्रियोळकरांना भ्रामक वाटला,[४] अथवा रा. गो. रा. राजोपाध्ये,[५] यांना आपल्या घराण्याच्या अभिनिवेशामुळें तो कितीही अग्राह्य वाटला, तरी वर दिलेल्या अंतःसाधनांच्या व बहिःसाधनांच्या समीकरणावरून

---

१ महाराष्ट्र सारस्वत २ री आवृत्ति—पृ. २२३. २ शिवकालीन पत्रसारसंग्रह भाग २—पत्रें २२५९, २२७५. ३ इतिहाससंग्रह-फेब्रुवारी—मार्च—एप्रिल—१९११. ४ दमयंतीस्वयंवर—प्रस्तावना पृ. २५—२७. ५ लोकशिक्षण—डिसेंबर १९३१.

तो खरा असल्याचेंच कोणालाही पटेल. रा. राजोपाध्ये यांनीं आपल्या लेखांत माझ्या सिद्धांतावर[१] बरेच आक्षेप घेतलेले आहेत. राजव्यवहारकोश रचण्यास शिवाजीनें रघुनाथ नारायणास आज्ञा केली, यावरून शिवाजीनें त्याची विद्वत्ता जाणली होती, एवढें रा. राजोपाध्यांस मान्य असूनही, तें त्याच्या संस्कृत भाषेच्या ज्ञानाचें खात्रीचें प्रमाण असें त्यांना वाटत नाहीं, हें महदाश्चर्य आहे. कारण शिवाजीनें जी त्याची विद्वत्ता जाणली होती, ती तरी दुसऱ्या कशांत? रघुनाथ नारायणाच्या पांडित्याचे उल्लेख वर देण्यांत आले आहेत. पण त्यांतूनही 'यवन वचनांनीं लुप्तप्राय झालेली विबुधभाषा प्रसृत' करण्याच्या उद्देशानेंच हें कोशरचनेचें कार्य शिवाजीनें त्याला सांगितल्याचें जर रा. राजोपाध्ये लक्षांत घेतील, तर त्यांच्या वरील आक्षेपांत विशेष तथ्य नाहीं असें दिसून येईल. दुसरें असें कीं, राजव्यवहारकोशाच्या शेंवटीं रघुनाथ-नारायणानें 'चंदावरकर' हें उपनांव आपल्या नांवाला जोडलें नाहीं, व 'नलोपाख्याना'च्या शेंवटीं रघुनाथपंडितानें 'प्रियामात्यनारायणाध्वरिसूनु' हें उपपद व पित्याचें नांव म्हणून आपल्या नांवापुढें, राजव्यवहारकोशाच्या शेंवटीं जोडल्याप्रमाणें जोडलें नाहीं, यावरून या दोन्ही ग्रंथाचे कर्ते भिन्न आहेत असें रा. राजोपाध्यांना वाटतें. पण 'चंदावरकर' असें उपनांव नलो-पाख्यानकार रघुनाथपंडितानेंही आपल्या नांवाला जोडलें नसून, तसें उपनांव लावणारा श्लोकही रा. प्रियोळकरांनीं प्रक्षिप्त मानल्याचें रा. राजोपाध्ये विसरलेले दिसतात. आतां राजव्यवहारकोशाच्या शेंवटीं आपल्या नांवामागें जसें उपपद व पित्याचें नांव रघुनाथ नारायणानें जोडलें तसें त्यानें नलोपाख्यानाच्या शेवटीं कां केलें नाहीं, याबद्दल एवढेंच म्हणतां येईल कीं, जी गोष्ट त्याला संस्कृत गद्य ग्रंथांत करतां आली, व राजाज्ञेनें रचल्या जाणाऱ्या ग्रंथांतच मात्र जिची आवश्यकता त्याला भासली, ती मराठी पद्य ग्रंथांत त्याला वृत्ताच्या बंधनामुळें जशी शक्य झाली नसावी, तशीच ती स्वेच्छेनें रचलेल्या ग्रंथांत आवश्यकही वाटली नसावी. पण म्हणून एवढ्यावरून त्या दोन ग्रंथांचे कर्ते भिन्न होते, असें अनुमान रा. राजोपाध्यास काढतां यावयाचें नाहीं. यानंतर सामराज रघुनाथपंडित यांच्या काव्यांतील

---

१ लोकशिक्षण—आक्टोबर १९३१.

वृत्त व कल्पनासाम्यावरून त्या दोघांनीं परस्परांचीं काव्यें पाहिलीं असावीं असें रा. राजोपाध्यांना वाटत असून, सामराज व रघुनाथपंडितराव यांचा भाऊबंदी निकट संबंध व शहाजीच्या निदान शिवाजीच्या दरबारीं त्या दोघांचा एकत्र सहवासही त्यांनीं जमेस धरला आहे. येथें रा. राजोपाध्ये जणुं तत्कालीन घटना पाहिल्याप्रमाणेंच बोलत आहेत. सामराज व रघुनाथपंडित यांच्या काव्यांतील साम्यांवरून दुसऱ्यानें पहिल्याचें काव्य पाहिलें असणें शक्य आहे, असें फार तर म्हणावें. पण केवळ भाऊबंदीसंबंधामुळें एकाचें कवित्व दुसऱ्यांतही उतरलें असें तर्कशास्त्र रा. राजोपाध्यांना जर लढवावयाचें असेल तर मात्र, सामराज–रघुनाथपंडितरावांच्या कुलांत जन्म पावल्यामुळें, त्यांना स्वतःलाही महाकवित्वाची मोठी जबाबदारी स्वीकारावी लागेल! सामराज व रघुनाथपंत हणमंते यांचा निकट संबंध नसला तरी त्यांचें दरबारीं वास्तव्यही फारसें नव्हतें, व उलट सामराज–रघुनाथपंडितरावाचें मात्र होतें, असें म्हणावयास रा. राजोपाध्यांजवळ काय आधार आहे? शिवराज्याभिषेकाच्या वेळीं सामराज व रघुनाथपंत हणमंते यांचाही सहवास होणें जसें शक्य आहे, तसें त्यावेळीं सामराजाचें महाकाव्यही हणमंत्यांच्या डोळ्यांखालून जाणेंही कांहीं अशक्य म्हणतां यावयाचें नाहीं. तिसरी गोष्ट अशी कीं, 'नलोपाख्यानां'त कीर्तनांना साजेशीं पदें घातलीं आहेत त्यावरून त्याचा कर्ता कीर्तनकार असावा, असा अचूक कयास रा. राजोपाध्ये यांनीं बांधला असून, रघुनाथ नारायण हणमंते हा राजकारणांत प्रत्यक्ष पडलेला व सैन्यें हालविणारा सेनापति असल्यामुळें, तो कीर्तनकार असणें शक्य नाहीं असें त्यांचें म्हणणें आहे. पण आपला रघुनाथपंडितराव तरी कीर्तनकार होता अशी रा. राजोपाध्यांना अंदरकी बात कोठून समजली? व अशी हरदासी वृत्ति अष्टप्रधानांत बसणाऱ्या रघुनाथपंडितरावाच्या गळ्यांत बांधून त्यांनीं आपल्या या पूर्वजाची एकप्रकारें विटंबनाच केली नाहीं काय? पदें रचणारा, कीर्तनकार असावाच लागतो असा कांहीं नियम नाहीं, व पद्यरचनेची एकनाथापासून चालत आलेली प्रथा रघुनाथ हणमंत्यानेंही आपल्या आख्यानांत चालविणें मुळींच असंभवनीय नाहीं.

आपलें कशानेंच जमत नाहीं असें पाहून, रा. राजोपाध्यांनीं ' शिव-चरित्र निबंधावलीं'तील[१] कोणाच्या तरी लेखांतील उताऱ्यांच्या आधारें रघुनाथपंत हणमंत्याच्या स्वभावावर शिंतोडे उडवून, नलोपाख्यान व गजेंद्रमोक्ष यांसारख्या प्रेमळ व कोमल मनोवृत्तींतून उगम पावणाऱ्या काव्यांच्या कर्तृत्वास त्यास शेंवटीं नालायख ठरविलें आहे. रा. राजोपाध्ये शेरा मारतात[२] तसा रघुनाथपंत हणमंते जर खरोखरीच उद्धट, बेमुर्वतखोर व खुनशी स्वभावाचा असता, तर खुद्द शिवाजीमहाराजांनीं व्यंकोजीस पाठविलेल्या उपदेशपर पत्रामध्यें, रघुनाथपंताबद्दल[३] " रा. रघुनाथपंडित त्या प्रांतें आहेती. ते कांहीं इतर नव्हेती. आपले पुरातन तुम्हासीं कोणे रीतीनें वर्तावें हे निपुण जाणतात. आम्हांस मानितात तैसें तुम्हांस मानितात. आम्हीं त्याचे ठायीं विश्वास ठेविला आहे, तैसा तुम्हींही ठेवून, कार्य-प्रयोजनास परस्परें अनुकूल व साह्य होऊन वर्तत जाणें. पुरुषार्थ व कीर्ति आर्जणें." असे प्रशंसापर उद्गार काढून त्यांच्या राजकारणनैपुण्याची तारीफ कां केली असती ? " धन्याचा पडता काळ पाहून त्याच्या विरुद्ध उठणें हा त्याचा ( रघुनाथपंत हणमंते ) स्वभाव दिसतो. संभाजीविरुद्धही उठून त्यानें कर्नाटकाचा हिशेब देण्याचें नाकारलें "[४] इत्यादि जे आरोप रघुनाथपंतावर करण्यांत आले आहेत, ते केवळ एकपक्षीय आहेत असेंच दिसून येईल. उलट " रघुनाथपंतांनीं शिवाजीमहाराज कर्नाटकांतून महाराष्ट्रांत परत आल्यानंतर इ. स. १६७७ पासून १६८१ पर्यंत, तिकडील राज्यकारभार व मुलकी वसुलाची व्यवस्था फार दक्षतेनें केली. शिवाजी-महाराज इ. स. १६८० मध्यें मृत्यु पावल्याचें वर्तमान रघुनाथपंतास समजलें, तेव्हां त्यांस अत्यंत दुःख झालें. तथापि त्यांनीं तें दुःख बाजूस ठेवून, आपलें कर्तव्य उत्तम रीतीनें बजाविलें. शिवाजीमहाराजांच्या मृत्यूनंतर सर्वत्र अव्यवस्था व गोंधळ झाला. त्यावेळीं रघुनाथपंतासारखा शहाणा व अनुभवी मुत्सद्दी कर्नाटकांत नसता तर मराठ्यांचा अंमल तेव्हांच नाहींसा

---

१ इंग्रजी विभाग पृ. ५१; ५३–५४. मराठी विभाग पृ. ३६८.
२ लोकशिक्षण–डिसेंबर १९३१. ३ इतिहाससंग्रह–फेब्रुवारी–मार्च–एप्रिल १९११. ४ शिवचरित्रनिबंधावलि पृ. ३६८.

झाला असता. परंतु रघुनाथपंतांनीं आपल्या वजनानें व दराऱ्यानें संभाजीच्या कारकीर्दींत देखील तिकडील राज्यव्यवस्थेंत अंतर पडूं दिलें नाहीं. एवढेंच नव्हे, तर त्यांनीं तिकडील प्रांतांचा उत्तम बंदोबस्त करून व सुरळीत रीतीनें वसूल करून, पुष्कळ द्रव्य खजिन्यांत ठेविलें.

शिवाजी महाराजांचे पश्चात् संभाजी महाराजांनीं स्वैर वर्तन सुरू केलें; व अविचारानें राज्यांतील जुन्या, अनुभवी व स्वामिभक्त मंत्रिमंडळास कैद केलें, आणि महाराजांच्या वेळच्या राज्यव्यवस्थेची शिस्त अगदीं नाहींशी केली. ही बातमी रघुनाथपंताच्या कानावर गेली. तेव्हां त्यांस इतकें वाईट वाटलें कीं, त्यांनीं संभाजी महाराजांस समक्ष भेटून त्यांच्या नेत्रामध्यें सुविचाराचें अंजन घालण्यासाठीं स्वतः महाराष्ट्रांत येण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें ते इ. स. १६८१ मध्यें रायगडास आले, आणि त्यांनीं संभाजी महाराजास कर्नाटकांतून आणलेला नजर नजराणा व विपुल द्रव्य सादर करून, भर दरबारांत त्यांची कानउघाडणी केली; आणि त्यांच्या अविचारी वर्तनाचा स्पष्टपणानें निषेध करून त्यांस सदुपदेश केला. रघुनाथपंतांचे बंधु जनार्दनपंत व मुख्य प्रधान मोरोपंत पिंगळे ह्यांस संभाजी राजांनीं प्रतिबंधांत टेविलें होतें; आणि खुद्द रघुनाथ-पंतांवरही अप्रिय बोलण्याबद्दल तोच प्रसंग गुदरला असता; परंतु त्यांच्या कळकळीच्या झणझणित उपदेशाचा संभाजीराजांवर क्षणभर तरी अनुकूल परिणाम होऊन, त्यांनीं त्यांस जुन्या प्रधानमंडळास बंधमुक्त करण्याचें वचन दिलें, व त्यांचा बहुमान करून त्यांस कर्नाटकामध्यें जाण्याची परवानगी दिली.[१] " या उताऱ्यावरून रघुनाथपंत हणमंते यास शिवाजीराजे याजबद्दल केवढा आदर व मराठी राज्याबद्दल केवढी कळकळ होती हें प्रत्ययास येतें. संभाजी स्वैरवर्तनी निघून त्यानें राज्यांत अनास्था माजवल्याचें किमपिही लक्षांत न घेतां, ही बिकट परिस्थिति सांवरून धरणाऱ्यावरच उलटपक्षीं स्वामिद्रोहाचा आरोप करण्यांत यावा, हें खचित न्यायीपणाचें नाहीं. जुन्या मंत्रिमंडळावर संभाजीनें धरलेल्या शस्त्रामुळेंच नलोपाख्यानांतील "कठिण समय येता कोण कामास येतो ?" ही उक्ति कदाचित् हणमंत्यांच्या

---

१ इतिहास संग्रह–फेब्रुआरी–मार्च–एप्रिल–१९११.

स्वानुभवाचीही द्योतक असण्याचा संभव आहे. "रघुनाथपंत उद्धट, बेमुवर्तखोर व खुनशी स्वभावाचा असून त्याच्या अंगीं सहानुभूति व अनुनय-कौशल्य मुळींच नव्हतें" असें रा. राजोपाध्यांना जें केवळ कांहीं इंग्रजी निबंधकारांच्या लिखाणावरून उघड झालें आहे,[1] तें केवढें थोरलें असत्य आहे, हें रघुनाथपंतांच्याच कैफियतीनें समजून येणार आहे. रघुनाथपंतानें व्यंकोजीराजास जो महत्त्वाचा व प्रसिद्ध उपदेश केला आहे, त्यांतील "हें आमचें म्हणणें लक्षांत आणून चालल्यास धणी आहांत. जवळ माणूस नाहीं, असा दोष न आणावा. म्हणून प्रार्थना करणें, समयोचित बोलणें, याचा राग मनांत आणून विपर्यास केल्यास लाचार आहों. आज्ञा दिल्यास महायात्रेस जाऊं, तीर्थवास करूं. आमचा धर्मच आहे. तुम्ही चालला असतां, अधर्म म्हणावयाचा. याजकरितां इतकें बोलणें प्राप्त झालें. ही नीति मनांत आणोन चालेल, त्यास इहपर लोकीं उद्धारकारक आहे. ही विनंति[2]" हा शेवटचा भाग रघुनाथपंताच्या विनयी, अनुनयशील, सहानुभूतिपूर्ण व निःस्वार्थी स्वभावावर उत्तम प्रकाश पाडणारा असून 'नलोपाख्यान' व 'गजेंद्रमोक्ष' यांसारखीं काव्यें रचावयास लागणारी प्रेमळ व कोमल वृत्तीही त्यांच्या ठिकाणीं भरपूर होती हें सिद्ध करणारा आहे. पुनः शिवाजीराजांच्या व्यंकोजीस लिहिलेल्या पत्रांतही "आम्हांस मानतात तैसें तुम्हांस मानितात" हे रघुनाथपंताबद्दलचें वाक्यही तो आपल्या धन्यास किती मानीत होता, यासंबंधींचा त्याच्या धन्याच्या तोंडचा कबुलीजबाबच आहे.

वर केलेल्या विवेचनाचा व दिलेल्या प्रमाणांचा एकंदरींत निष्कर्ष असा कीं, रघुनाथ नारायण हणमंते हाच नलोपाख्यानाचा कर्ता रघुनाथपंडित असें समजून चालण्यास प्रत्यवाय नसावा. हणमंत्याचें चंदावरास दीर्घकाल वास्तव्य, त्याची संस्कृत भाषेतील विद्वत्ता, फार्सी भाषेचें, राजदरबारचें व लोकव्यवहाराचें संपूर्ण ज्ञान, त्याची सक्रिय रामदासभक्ति, या सर्व गोष्टी नलोपाख्यानकाराच्या गुणाशीं इतक्या सारख्या आहेत कीं, त्या दोनी व्यक्ती एकच असें ठरविण्याकडेच कोणाचेंही मन वाहील. रघुनाथपंत हणमंते हा थोर

---

१ लोकशिक्षण—डिसेंबर १९३१. २ इतिहाससंग्रह—फेब्रुवारी—मार्च—एप्रिल १९११.

मुत्सद्दी, सेनापति व कारभारी होता. नलोपाख्यानांतील दमयंतीच्या नाभी व स्तनांच्या शृंगारयुक्त वर्णनांतही, अनुक्रमें 'सुरंग' व 'गड' अशा ज्या उपमा [१] योजलेल्या आहेत त्या, प्रस्तुत काव्य रचणाऱ्याच्या नित्याच्या कोटकिल्ले घेण्याचा व्यवसायच दर्शविणाऱ्या आहेत. पुढें दमयंतीनेंही या काव्यांत जो श्लेषशद्बानें आपला भाव सांगितला आहे, त्यांत केलेला बोरूच्या लेखणीचा उल्लेख, [२] पर्यायानें कर्त्याचा कारकुनी अथवा कारभारी पेशाच सूचित करीत आहे. काव्यांत येणारें 'फिराद,' [३] जासूद, [४] बंकी [५] असे शद्ब तर कर्त्याचा राजकीय उलाढालीशीं नित्याचा येणारा संबंध सांगणारे असून, नलोपाख्यानांतील

मजहि वध कराया पातकी पातला जो।
वरुनि पति असा ही भूमि कैसी न लाजो॥ [६]

हा श्लोक सुद्धां, कर्त्यावर आलेल्या प्राणांतिक आपत्तीचे स्वानुभवोद्गार असावे. संभाजीराजांनीं रघुनाथपंतावर व त्यांच्या बंधूवर असाच दुर्धर प्रसंग आणल्याचें इतिहास सांगत असून, रघुनाथपंतानें राजांची केलेली स्पष्ट शद्बांत कानउघाडणी, वरील श्लोकाशीं तंतोतंत जुळणारी आहे. रघुनाथपंत हणमंत्यांचें राजव्यवहारकोशाचें कर्तृत्व, व "एकांत लेखनहि वाचनही करीतो" हा दमयंतीस्वयंवरांतील निर्देश, त्याच्या हातून झालेल्या 'रामदास-वर्णन,' 'गजेंद्रमोक्ष' व 'नलोपाख्याना'सारख्या इतर काव्यकृतींचें कर्तृत्व सिद्ध करणारा आहे. यावरून शिवकालांत गाजलेल्या इतर कोणत्याही रघुनाथापेक्षां, रघुनाथपंत हणमंत्याचाच दमयंतीस्वयंवराच्या कर्तृत्वाशीं घनिष्ठ संबंध लागत असल्यानें, तोच या सुप्रसिद्ध काव्याचा कर्ता होय, असें निःशंकपणें मानण्यास हरकत नाहीं.

यापुढील दमयंतीस्वयंवराच्या कालासंबंधीं रा. प्रियोळकर यांनीं केलेलें विवेचन फारसें आक्षेपार्ह नसलें, तरी त्या काव्याला सामराजाच्या 'रुक्मिणी-हरणा'पेक्षां पूर्वकालीनत्व देण्याचा त्यांचा प्रयत्न मात्र स्वीकरणीय वाटत

---

१ दमयंतिस्वयंवर—श्लोक—७०. (प्रियोळकर प्रत). २ दमयंति-स्वयंवर—श्लोक १२९ (प्रियोळकर प्रत). ३ दमयंतिस्वयंवर—श्लोक ११९. ४ दमयंतीस्वयंवर—श्लोक २२. ५ दमयंतीस्वयंवर श्लोक १२७. ६ दमयंतीस्वयंवर—(प्रियोळकर) श्लोक ५३.

नाहीं. त्यांनीं "रघुनाथपंडिताचें दमयंतीस्वयंवर नैषधीयचरित काव्यावरून रचलें खरें, परंतु त्याची रचना महाकाव्यासारखी नाहीं. म्हणून आपण स्वतः संस्कृत पंचमहाकाव्यांच्या धर्तीवर मराठींत एक काव्य रचावें अशी सामराजाला इच्छा झालेली दिसते. आणि तिचें दृश्यफल म्हणजे 'रुक्मिणीहरण' होय. [१] " या विधानानें सामराजाला दिलेला दुय्यम दर्जा तर, सुतराम् मान्य होण्यासारखा नाहीं. मी सामराजाच्या 'रुक्मिणीहरणा'चा काल शके १५९६ हा किमान ठरविला असून, [२] त्यांस त्या काव्यांतील अंतर्गत पुरावाही सादर करण्यांत आला आहे. असें असतां, 'येती महाराष्ट्र महाभिमानी। कित्येक ते केवळ मद्यपानी ॥' या 'रुक्मिणीहरणा'च्या श्लोकांतील 'मद्यपानी' या पदाच्या पराचा, "महाराष्ट्रीयावर हल्ला करतांना सामराजापुढें संभाजी व त्याची प्रभावळ होती" अशा शंकेनें [३] कावळा करून, रुक्मिणीहरण काव्य, संभाजीच्या अखेरच्या दिवसांत किंवा त्याच्या निधनानंतर लगेच रचलें, असें जें अनुमान रा. प्रियोळकरांनीं काढलें आहे, तें निखालस अग्राह्य आहे. कालदृष्ट्या सामराज हा मुक्तेश्वर–लोलिंबराज यांचा समकालीन, व तुकाराम–रामदास यांचा समवयस्क कसा ठरतो हें मीं दाखविलेंच आहे. [४] 'रुक्मिणीहरण' काव्यावर ही शिवराज्याभिषेकाची छाया कशी पडली आहे, याचेंही सविस्तर विवेचन मी माझ्या 'सामराज' या निबंधांत केलेंच आहे. असें असून "शिवाजीचें निधन झाल्यावर महाराष्ट्रांत अंदाधुंदी सुरू झाली, त्यावेळीं रघुनाथपंडित तंजावरास जाऊन राहिला, असा वर उल्लेख आलाच आहे. त्याच वेळीं हीं काव्यें लिहिलीं गेलीं असलीं पाहिजेत" [५] असें रघुनाथपंडिताच्या ज्या तीन काव्याच्या कालाबद्दल रा. प्रियोळकर विधान करतात, तीं शिवराज्याभिषेककालीं रचून संपत आलेल्या सामराजाच्या काव्यास कशी स्फूर्तिप्रद होतील, याचा वाचकांनींच विचार करावा. उलट शिवराज्याभिषेकप्रसंगीं सामराज–रघुनाथपंडितांची गांठ पडून पहिल्याचेंच काव्य दुसऱ्यानें अवलोकिलें असावें, हें मागें सांगितलेंच आहे. रघुनाथपंडिताची रघुनाथभक्तीही सामराजापेक्षां त्याची वयानें कनिष्ठताच

१ दमयंती स्वयंवर–चरित्र व काव्यविवेचन–पृ. ३७. २ सामराज–(१९४०) प्रकरण ९. ३ दमयंतीस्वयंवराख्यान–चरित्र व काव्यविवेचन, पृ. ३७. ४ सामराज (१९४०). ५ दमयंतीस्वयं.–चरित्र व काव्यविवेचन–पृ. ३२.

दर्शविते. कारण सामराजानें आपल्या काव्यांत एकनाथकालीन कवींच्या प्रथेप्रमाणें कृष्णभक्तीचाच पुरस्कार केला आहे, व रामदासांच्या नवीन रामसांप्रदायाची छाप महाराष्ट्रांत नागेशविठ्ठलादि त्याच्या समकालीन कवींवर पडूनही ज्या अर्थी ती सामराजावर पडलेली दिसत नाहीं, त्याअर्थी तो रामदासापेक्षां वयानें मोठा किंवा निदान समवयस्क तरी असला पाहिजे, असें मीं प्रतिपादन केलेंच आहे.[१] यावरून रामदासांचा परमभक्त व अंकित असा रघुनाथपंडित ओघानेंच सामराजापेक्षां कनिष्ठ ठरत असून, त्याचें ‘ दमयंतीस्वयंवराख्यान ’ सामराजास स्फूर्तिप्रद न होतां, उलट सामराजाचें ‘ रुक्मिणीहरण ’च रघुनाथास स्फूर्तिप्रद झालें असलें पाहिजे, असें उघड दिसतें.

सामराज, नागेश व रघुनाथपंडित हे समकालीन असल्यामुळें, त्यांच्या काव्यांत आढळणारे विशिष्ट शब्द, विशिष्ट वाक्प्रचार, फारशी शब्द, क्रियापदांचीं रूपें, यांतील रा. प्रियोळकरांनीं दाखविलेलें साम्य[२] हें तत्कालीन भाषेचेंच निदर्शक आहे. पण दमयंतीचा विरह व रुक्मिणीचा विरह, हंस विदर्भ देशाला व सुदेव द्वारकेला जातांना त्या त्या नगरींचें वर्णन इत्यादि रघुनाथपंडित व सामराज यांच्या अनुक्रमें काव्यांतील जीं कांहीं कल्पनासाम्यें[३] त्यांनीं दाखविलीं आहेत, तीं मात्र रघुनाथाला सामराजाचाच ऋणी ठरवितात. तथापि कोणत्याही व्यक्तीचें, प्रसंगाचें अथवा हालचालीचें शब्दचित्र वाचकांपुढें हुबेहूब उभें करण्यांत रघुनाथपंडित मोठा पटाईत आहे, हें कोणालाही मान्य होण्यासारखें आहे. हंस व नलराजा यांच्या वर्णनांतील रघुनाथाच्या स्वभावोक्ति, सामराजाच्या काव्यांतील कांहीं स्वभावोक्तीं-प्रमाणेंच मोठ्या मनोरम आहेत. किंबहुना स्वभावोक्ति हा शिवकालांतील या कलाकवींचा एक मनोज्ञ विशेषच म्हटला तरी चालेल. रघुनाथाचीं उद्यान व कुंडिनपुरवर्णनासारखीं सृष्टिस्थलवर्णनें, हृदयंगम उतरलीं असून सामराजाप्रमाणेंच तो रसिक, राजदरबारपरिचित, इंगितज्ज्ञ, बहुश्रुत व सुक्ष्म-दर्शी असल्याची साक्ष त्याचें काव्य पदोपदीं देतें. हंस–दमयंतीची भेट व

---

१ सामराज (१९४०). २ नलदमयंतीस्वयंवर–चरित्र व काव्यविवेचन पृ. ३७. ३ नल दमयंतीस्वयंवर–चरित्र व काव्यविवेचन पृ. ३८.

दमयंतीच्या विरहव्यथेमुळें उडालेली धांदल, यांचें रघुनाथानें केलेलें वर्णन सामराजाच्या रुक्मिणी–सुदेव भेट व रुक्मिणीच्या विरहव्यथेमुळें उडालेल्या धांदलीच्या वर्णनाशीं पुरेपूर जमतें. रघुनाथपंडिताच्या काव्यांतील कांहीं उत्प्रेक्षा [१] वरून तो सामराजापेक्षां अधिक कल्पनाशाली असें भासण्याचा संभव आहे. पण दोघांनींही संस्कृत पंचमहाकाव्यापासून घेतलेलें ऋण पाहतां, त्यांच्यांत सरसनिरसता ठरविणें कठीण आहे. तरी पण त्यांचीं काव्यें, प्रासादिक, ललितरम्य व प्रतिभासंपन्न असून प्रत्येकाच्या व्यक्तित्वाचा जो ठसा त्याच्या काव्यांत स्पष्ट उमटला आहे, त्यावरून त्यांच्या अंतर्बाह्य गुणांची ओळख पटल्याशिवाय रहात नाहीं. रघुनाथपंडिताची याप्रमाणें पटलेली ओळख जिज्ञासु व चिकित्सक वाचकानांही करून देण्याचा उपक्रम येथें केला असून, तो कितपत यशस्वी झाला आहे हें पाहणें त्यांच्यावरच सोंपविणें चांगलें !



---

१ दमयंतीस्वयंवर–श्लोक ८४, ८७, ९५.

# निरंजनमाधव : ५

ऐन पेशवाईंत मध्वमुनि, अमृतराय, महिपतीत्यादि जे कवी होऊन गेले, त्यांत निरंजनमाधव ऊर्फ बनाजी माधवासारख्या प्रदीर्घ व विविध स्वरूपाची रचना करणाऱ्या मुत्सद्दी कवीचा नामोल्लेखही तत्कालीन किंवा तदनंतरच्या कोणा संतमालाकारानें अथवा कविचरित्रकारानें करूं नये, हें महदाश्चर्यच म्हटलें पाहिजे. त्याहीपेक्षां निरंजनमाधवाचा अगदीं समकालीन व वयानेंही धाकट्या अशा मोरोपंतानेंदेखील आपल्या 'सन्मणिमाले'त मुकुंदराजापासून रामजोशापर्यंत झाडून साऱ्या पूर्वकालीन व स्वकालीन कविवर्यांना वंदन करतांना निरंजनमाधवाचेंच तेवढें नांव खड्यासारखें वर्जावें, हें तर अधिकच विस्मयकारक आहे. निरंजनमाधवाची कविता पंतांच्या अवलोकनांतच आली नव्हती हें संभवनीय दिसत नाहीं. कारण पंतांनीं आपल्या 'मंत्रभागवत' अथवा 'निर्वोष्टरामायण' अशा कृतींत जी मंत्ररचना व अवोष्टाक्षररचना साधली आहे, ती त्यांना निरंजनमाधवाच्या अनुक्रमें 'मंत्ररामचरित' व 'निर्वोष्टराघवचरित'[१] या दोन स्तोत्रांवरून सुचली असावी असें निःसंशय वाटूं लागतें. कवि म्हणून आपली प्रसिद्धि न व्हावी एतदर्थ आपली काव्यरचना निरंजनमाधवानें गुलदस्तांत ठेविली असावी, हाही तर्क खरा दिसत नाहीं. कारण आपल्या 'सुभद्राचंपू'च्या[२] शेवटीं

> **सर्वा सत्कविनायकासि नमितों मी दीन अंगीकरा।**
> **माझ्या या विनतीस मान्य करुनी हा ग्रंथ वाचा बरा॥**
> **दोषा टाकुनि सर्वथा गुण तुम्हीं निर्मत्सरें आदरा।**
> **तेव्हां बालक धन्य होइन जगीं हातीं कृपेनें धरा॥**

अशी आपले काव्यग्रंथ वाचण्याबद्दल सर्व कवींना मुळीं ज्यानें सविनय प्रार्थनाच केली आहे, तो आपले ग्रंथ जाणूनबुजून झांकून ठेवणार नाहीं. मग आमच्या कवीच्या व त्याच्या कृतींच्या दीर्घकालीन अज्ञातवासाचें

---

१ निरंजनमाधवाची कविता भाग १. २ निरंजनमाधवाची कविता–भाग ३.

कारण तरी काय असावें? एक गोष्ट मात्र संभवनीय वाटतें ती ही कीं, निरंजनमाधवाची तत्कालीं मुत्सद्दी अथवा परराष्ट्रीय वकील म्हणून जेवढी प्रसिद्धि होती, तेवढी कवि म्हणून झाली नसावी. किंबहुना कवित्व व संतत्व यांचें समीकरण घालणाऱ्या तत्कालीन लोकांचें लक्ष, अशा राजकारणी पुरुष म्हणून गणल्या गेलेल्याच्या काव्याकडे गेलें नसावें हेंच खरें. राजकारण अशा प्रकारें त्याच्या काव्यकीर्तीच्या जसें आड आलें असावें, तसेंच मोरोपंतानें निरंजनमाधवाचें नांव आपल्या ग्रंथांतून वगळण्यासही तत्कालीन राजकीय वातावरण अथवा घटनाच कारणीभूत झाली असावी अशी अटकळ करण्यास जागा आहे. पेशवेकालीन इतिहासाच्या अभ्यासकांना ही गोष्ट विदितच आहे कीं, पहिल्या बाजीरावाच्या मृत्यूनंतर शाहू छत्रपतींच्या दरबारीं पेशवेपदाबद्दल बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब व बाबूजी नाईक बारामतीकर या दोघांत लढा चालू असून, उभयतांच्या पक्षाला भिन्न भिन्न लोकांचा पाठिंबा मिळाला होता. निरंजनमाधवाचें आत्मचरित्र असें समजल्या जाणाऱ्या ‘सांप्रदायपरिमळ’ या ग्रंथांत वर्णिल्याप्रमाणें, आमचा कवि पहिले बाजीराव व त्यांचे सत्पुत्र नानासाहेब यांच्या कृपाछत्राखालीं वाढला असल्यामुळें, साहजिकच तो वरील पेशवेपदाच्या लढ्यांत नानासाहेबांच्या पक्षाचा म्हणून प्रसिद्ध असावा, व बारामतीकरांचा आश्रित म्हणून असणाऱ्या मोरोपंतांनींही आपल्या यजमानाच्या प्रतिस्पर्ध्याच्या आश्रयास असणाऱ्या निरंजनमाधवास, आपल्या ‘सन्मणिमालेंत’ अनुल्लेखानें मारून आपल्या यजमानाच्या व त्याच्या पक्षाच्या रोषांतून सुटण्याचा अथवा पर्यायानें त्यांना खूष करण्याचा प्रयत्न केला असावा. दोन मोठ्या धन्यांच्या जंगी लढ्यांत त्यांच्या दोन आश्रितांत अशा प्रकारें गैरसमज व वितुष्ट असणें असंभवनीय नव्हतें, व निरंजनमाधवासंबंधीं मोरोपंतांच्या मूकवृत्तीचें हेंच कारण असावें, असें तूर्त तरी धरून चालण्यास हरकत नाहीं.

आज निरंजनमाधवाची जी थोडीफार माहिती आपणास उपलब्ध झाली आहे, ती वर उद्धृत केलेल्या ‘सांप्रदायपरिमळ’ या त्यांच्याच नांवावर आजपर्यंत मोडणाऱ्या ओवीबद्ध ग्रंथावरून होय. आमच्या कवीचें मूळ नांव **बनाजी** असूनही या नांवाबरोबरच माधवनंदन, कविनिरंजन, निरंजन-

योगी अशा टोपण नांवाचा ज्याअर्थी तो आपल्या काव्यांत उल्लेख करतो, त्याअर्थी आपल्या व्यावहारिक व पारमार्थिक अशा दोन्हीं नांवांचा निर्देश करण्याचें धोरण त्यानें स्वीकारलेलें दिसतें. त्याच्या वडिलांचें नांव माधव व आईचें भागीरथी होतें, असें 'सांप्रदायपरिमळा' वरून कळत असलें, तरी 'सुभद्राचंपू' तील "विश्वामित्रकुलारविंदतरणी ऋग्वेदसिंधूमणी"[१] या श्लोकपंक्तीवरून तो ऋग्वेदी विश्वामित्रगोत्री ब्राह्मण होता, अशी आणखी माहिती समजून येते. बनाजीचा जन्म कंची प्रांतीं, वेगवती नदीतीरीं पक्षतीर्था-समीप झाला असून, त्याला एक वडील बंधूही होता. पहिल्या बाजीरावाच्या कारकीर्दीत आमचा कवि साताऱ्यास आला, व बाजीरावसाहेबांनीं त्यांस त्याच्या ज्येष्ठ बंधूसह आपल्या पदरीं ठेऊन घेतलें. साताऱ्यास असतांनाच लक्ष्मीधर बरवे यांच्याजवळ त्याचें संस्कृताध्ययन झालें व महामंत्राचा उपदेश मिळून तो दत्तसांप्रदायी बनला. तेथेंच वयाच्या २२ व्या वर्षी त्याला महाविद्या प्राप्त झाली[२] व याच वेळीं बाजीरावसाहेबांनीं त्याला तंजावरास कामगिरीवर पाठविलें.[३] ही कामगिरी वकीलातीची असून अशा प्रकारची जबाबदारीची कामगिरी पार पाडण्याची पात्रता त्यानें आपल्या धन्याजवळ एवढ्या अल्प वयांत सिद्ध करावी हें निःसंशय कौतुकास्पद होतें. इतिहासांत[४] तर असें नमूद आहे कीं, तंजावरास व्यंकोजीच्या वंशांतील सरफोजी भोसले सन १७२१ पासून १७२७ पर्यंत राज्यावर होता, व सन १७२३ च्या पावसाळ्यांत त्रिचनापल्लीकडे निजामचा शह आल्याचें शाहूस कळल्या-वरून, सरफोजीच्या बचावाकरितां त्यानें आपली फौज कर्नाटकांत पाठ-विण्याची सिद्धता केली. इ.स.१७२४ तील साखरखेड्याच्या लढाईनंतर निजाम व मराठे यांचें सडकून वांकडें आलें असतां, कर्नाटकांत उतरण्यास निजामास अवकाश मिळूं नये म्हणून फत्तेसिंग भोसले व प्रतिनिधि यांच्या सल्ल्यानें शाहूनें कर्नाटकांत फौज पाठविली. सन १७२५ त व १७२६त असा दोनदा बाजीराव शाहूच्या हुकुमावरून कर्नाटकांत स्वारीवर गेला होता. यावरून आपण तिकडे जाण्याच्या आधीं म्हणजे सन १७२४ त त्यानें बनाजीस तंजावरास पाठविलें

---

१ सर्ग ७।८७. २ सांप्रदायपरिमळ ४।१२. ३ सां. प. ४।१५.
४ मराठी रियासत—मध्य विभाग—परिच्छेद ७—गो. स.. सरदेसाई.

असावें, व तिकडे बनाजीचें वास्तव्य ज्याअर्थी तीन वर्षें होतें,[१] त्याअर्थी सन १७२७ पर्यंत तरी तो तेथेंच होता असें निर्विवाद ठरतें. तंजावरच्या राज्यावर सरफोजीही सन १७२७ पर्यंतच होता, या गोष्टीनेंही वरील विधानास पुष्टि मिळतें. या हकीकतीवरून सन १७२४ सालीं तंजावरच्या कामगिरीवर जाणारा बनाजी ऊर्फ निरंजनमाधव जर २२ वर्षांचा होता, तर त्याचा जन्म सन १७०२ सालीं झाला असावा, असें बिनधोक मानून चालण्यास हरकत नाहीं.

तंजावरास काढलेल्या तीन वर्षांत बनाजीस पुष्कळच गोष्टींचा लाभ घडला. किंबहुना आपल्या काव्योद्यानांतील कीर्तिमंदिराचा पाया त्यानें याच वेळीं घातला. राजकारणाच्या भाराखालीं त्यांस प्रथम परतत्त्वचिंतन करण्यास अवसर मिळेनासा झाला, तरी त्यानें संपादन केलेल्या महाविद्येच्या प्रभावानें नित्याच्या जपांत अंतर म्हणून पडलें नाहीं. सिद्धिदायक स्वप्नें, साधुपुरुषांचीं दर्शनें व त्यांच्याशीं केलेलीं गुह्य भाषणें, यांमुळें त्याच्या मनास उत्तेजन मिळे. याशिवाय तंजावरच्या दरबारांत व कर्नाटक प्रांताच्या इतर भागांत वावरण्याची भरपूर संधि मिळाल्यामुळें, बनाजीच्या अंगीं सभेंत लागणारीं निर्भयता, प्रसंगोचित तात्काळ बोलण्याची स्फूर्ति, व प्रतिपक्षाचें तोंड बंद करण्याचें चातुर्य इत्यादि गुण प्राप्त झाले, व तिकडील राजेलोकांस यामुळें विशेषच कुतूहल वाटून तो मोठ्या मान्यतेस चढला.

देशाटनामुळें सहजीं प्राप्त होणारे गुणही बनाजीनें लवकरच आत्मसात करून घेतले. पंडितमैत्रीनें त्याला अनेक शास्त्रांचें विलोकन घडलें, तर नट, नकलाकार इत्यादिकांच्या केलेल्या अवलोकनामुळें राजसभेंत त्याच्या चातुर्याची वृद्धि झाली. पंडितलोकांच्या सांनिध्यांत भरतमुनीचें नाट्यशास्त्र, गायनकला, व्युत्पत्ति इत्यादि रसिकतावर्धक ललितकलांचेंही त्यांस ज्ञान झालें. एकंदरींत व्यावहारिक दृष्टीनें कर्नाटकांत त्याचा हा तीन वर्षांचा काल उत्तम गेला असला, तरी सद्गुरूवांचून महावाक्याचें शोधन करावयास त्याचें मन घजेना, व सद्गुरु तर लांब राहून आपण मात्र नोकरीपायीं दूर देशांत येऊन पडलों, यामुळें तो थोडा खिन्नच झाला. योगायोग असा कीं, याच

१ सांप्रदायपरिमळ–४।२०.

वेळीं त्याचे गुरु लक्ष्मीधर बरवे मृत्यु पावले, व ही बातमी ज्या अर्थी बनाजीस पुण्यास आल्यावर समजली, त्याअर्थी ती त्याला सन १७२७ सालीं तंजावराहून परत आल्यावरच समजली असावी.

ही दुःखदायक बातमी ऐकून तो बाजीरावाच्या परवानगीनें साताऱ्यास आला व तेथें तर गुरुविरहानें त्याची इतकी शोचनीय अवस्था झाली कीं, सात दिवस त्याच्या डोळ्याला डोळा लागला नाहीं ! पण पुढें झोंप लागून त्याला त्याच्या गुरूनें स्वप्नांत भेट दिली, व "शोक करण्याचें कारण नाहीं, आजपासून सातवे दिवशीं आमची विभूति भेटेल" असें आश्वासन दिलें. या स्वप्नावर बनाजीचा प्रथम विश्वास बसला नाहीं, पण योगायोगच असा आला कीं, बापजी पंडित म्हणून बाजीरावसाहेबांचे कोणी स्नेही असून तेही वकीलातीच्या कामीं फार कुशल होते. बनाजीच्या वडील बंधूंचा व त्यांचाही स्नेह बराच असल्यामुळें, पुण्याच्या मुक्कामांत ते त्यांच्याकडेच उतरत. अशा पुरुषाच्या सहजपरिचयानें बनाजीचें त्यांच्याशीं संघट्टण घडून, बाजीरावानें त्या दोघांच्या एकाच कामावर केलेल्या नेमणुकीचीही त्यांत भर पडली. उभयतांच्या या समागमांत ज्ञानकलेची अभिनव गोष्ट जी समाधिअवस्था, ती बनाजीस प्राप्त झाली. बापजी पंडित पातंजल योगांत निष्णात असल्यामुळें, त्यांनीं आपल्या नूतन शिष्यास त्या शास्त्रांत पारंगत केलें. त्यांच्या सहवासांत बालावबोध, कपिलगीता, पंचीकरण, इत्यादींचें ज्ञान तर बनाजीस घडलेंच, पण त्याहूनही कोटीजन्मांत जें साधणार नाहीं, तें बनाजीस एका पळांत पंडितांनीं असें साधून दिलें कीं, त्याचें लक्ष नादानुसंधानीं लागून तो अर्धक्षणांत मुक्त झाला. पूर्वीं मंत्रमार्गांत दत्तसांप्रदायी लक्ष्मीधर बरवे गुरु होते, तर त्यांच्या मृत्यूनंतर ज्ञानमार्गांत त्यांस सिद्धेश्वर सांप्रदायी बापजी पंडिताचा लाभ घडला. ही गोष्ट बहुधा सन १७२७ मधलीच असून, यानंतरच बनाजीनें 'निरंजन' असें मोक्षसिद्धिनिदर्शक पारमार्थिक नांव धारण केलें असावें.

पेशवेदप्तरांतील[१] ता. ५ मे १७३३ च्या पत्रावरून बाजीरावानें बनाजीस फिरंगियाकडे आपला वकील म्हणून पाठविल्याचें दिसत असून तंजावरच्या यशस्वी कामगिरीनें आमच्या कवीनें आपल्या यजमानाचा

१ पेशवेदप्तर भाग ३०।३६४ पत्र, पृष्ठ ३७८.

केवढा विश्वास संपादन केला होता याचें स्पष्ट आकलन होतें. खरें पाहिलें असतां सन १७३१ पासून १७४१ पर्यंत फिरंगियाशीं मराठ्यांचें युद्ध चाललेंच असलें, तरी सन १७३७ पावेतों त्याची तीव्रता अल्प प्रमाणांत असून, मधून मधून सलोख्याचें बोलणें चालूंच होतें. अखेर १७३९ त झालेल्या वसईच्या तहानें हें प्रकरण निकालांत निघालें. मध्यंतरीं १७३३ च्या सुमारास धार्मिक बाबतींत हिंदु व पोर्तुगीज यांमध्यें बराच मोठा तंटा उपस्थित झाला असून, मालाड येथील हिंदुधर्माचा कट्टा अभिमानी अंताजी रघुनाथ सरदेसाई व इनामदार यांस ता. १३ फेब्रुआरी १७३३ रोजीं बाजीरावानें ज्याअर्थीं पत्र [१] लिहिलें आहे, त्याअर्थीं अशा संबंधांतच पुढें मे महिन्यांत बाजीरावानें बनाजीस फिरंगियाकडे वकील म्हणून पाठविल्याचें अधिक संभवनीय दिसतें.

बाजीरावाच्या मृत्यूनंतर नानासाहेबांनीं बनाजीस आपल्या पदरीं ठेऊन घेतलें, व आपल्या वडिलाप्रमाणें दक्षिणेंतच त्यांस बहुतेक कामगिरी सांगितली. तिकडील राजे देखील बनाजीवर फार प्रेम करीत. [२] या राजकारणांतून त्याला घटकाभर डोकें वर करावयासही फुरसत मिळत नसे, व त्याच्या मनास तर तीर्थयात्रेचा ध्यास लागलेला! याच वेळीं कांहीं दुष्ट लोकांनीं नानासाहेबांस बनाजीबद्दल खोट्या गोष्टी सांगून त्यांचें मन कलुषित केलें. सन १७४०–४१ च्या दरम्यान नानासाहेबांचें बाबूजी नायकाशीं व रघूजी भोसल्याशीं जें वैमनस्य पडलें होतें, त्यावरून बनाजी या दोघांना पेशव्या-विरुद्ध सामील आहे, अशी खोटी गोष्ट कोणीतरी दुष्टाव्यानें नानासाहेबांना सांगितली असणें शक्य आहे. पुढें बनाजीवरील हा संशय दूर होऊन त्याच्यावर नानासाहेब पूर्ववत् सुप्रसन्न झाले, तरी या प्रकारानें त्याच्या मनास उद्विग्नता आल्याशिवाय मात्र राहिली नाहीं. नानासाहेबांचा भाव इंगितानें जाणून, त्यानिमित्तानें त्यानें दक्षिणेंत तीर्थाटन केलें, व बेलूर मुक्कामीं एका अद्भुत दैवी चमत्कारानें त्यांस सुंदरकृष्णाच्या मूर्तीचा लाभ झाला. या सुंदरकृष्णाचेंच मंदिर पुढें त्यानें पुण्यास बांधलें.

---

१ मराठी रियासत–मध्यविभाग–११ परिच्छेद–गो. स. सरदेसाई.
२ सांप्रदायपरिमळ–३–१८७.

यात्रेहून आल्यावर नानासाहेबांनीं बनाजीस पुनः अधिकार देऊन मोठ्या सन्मानानें श्रीरंगपट्टणास वकील म्हणून पाठविलें. तत्कालीन पत्रव्यवहारावरून [१] सुद्धां असें दिसतें कीं, बनाजी माधव सन १७४६ पासून १७५२ पर्यंत श्रीरंगपट्टणास खंडणी वसुलाच्या वाटाघाटींत होता. मध्यंतरीं सन १७४९ त तेरणातीरीं परगणें ढोकी मुक्काम जवळे येथून नासिरजंगाच्या चाललेल्या प्रयत्नांचें सविस्तर वर्णन त्यानें आपल्या पत्रांत केलें आहे. [२] सन १७५१ त तो औरंगाबादेस पेशव्यांचा वकील म्हणून काम करीत असून, एवढ्या मुदतींत दमाजी गायकवाडानें चालविलेल्या धामधुमीची बातमी तो पेशव्यास पाठवीत होता. बापूजी नारायण व दमाजी गायकवाड यांचें खानदेशांतील बहादूरपूर येथें झालेल्या लढाईचें त्यानें आपल्या पत्रांत सविस्तर वर्णन केलें असून, दमाजीचे दक्षिणेंतील जे जे बेत त्याच्या कानावर आले, ते ते त्यानें औरंगाबादेहून पेशव्यास कळविले आहेत. पेशव्यांच्या सैन्यानें दमाजीचा पराभव केल्याचें ऐकून बनाजीनें आनंद व्यक्त करणारें एक पत्रही पेशव्यास तेथून पाठविलें आहे. दमाजीचें प्रकरण १७५१ च्या फेब्रुआरी-मार्चपर्यंत कळविणारा बनाजी माधव, त्या सालच्या एप्रिलपासून सलाबतजंग प्रकरणाशींही बराच संलग्न होतासें दिसून येतें. तथापि सलाबतजंगाशीं मित्रत्वाचें नातें ठेवण्यास पेशव्यास सल्ला देतांना, २०–४–१७५१ च्या त्रिंबकराव पेशव्यांच्या पत्रांतून ज्या अर्थी त्यानें पुनः दमाजीच्या हालचालीची ताजी बातमी दिली आहे, त्या अर्थी दमाजीकडे त्यानें अगदींच कानाडोळा केला होता असें म्हणवत नाहीं. यानंतर पुढील पत्रांत सलाबतजंग, दमाजीविरुद्ध पेशव्यास मदत करण्यास कसा तयार आहे हें कळवून, पुढें मे महिन्यांत उलट सलाबतजंगाच्या धरसोडी वर्तनाचेंही त्यानें वर्णन केलें आहे. पुनः ७–२–१७५२ च्या राणोजी नायकानें पेशव्यास लिहिलेल्या पत्रांतून बनाजीनें म्हैसूरच्या राजाचा सेनापती दलवाई व हैदर यांच्या बेताबद्दल बातमी पाठविली असून, महंमदअली व त्याचा भाऊ माफुजखान यांच्या हालचालीही त्यानें कळविल्या आहेत. सदर पत्रांत

---

१ पेशवेदप्तर–भाग २८. २ पेशवेदप्तर–भाग २६.

बनाजी माधवानें दलवायाची भेट घेऊन त्यांस नजर दिली, व बसून आपल्या स्वामीचें पत्र दिलें असा उल्लेख आहे.

सन १७५५ पासून १७५८ पर्यंत बनाजी माधवरावास पुनः श्रीरंग-पट्टणास वकीलातीच्या कामगिरीवर पाठविलेलें दिसतें. तारीख १५ जानेवारी १७५५ रोजीं संस्थान श्रीरंगपट्टण येथील संस्थानिकास त्याच्या हस्ते सणगें पाठविण्यांत आलीं असून,[१] सन १७५६ च्या मार्चांत त्यानें कडूरहून महादोबा पुरंदऱ्यास श्रीरंगपट्टण संस्थानची आर्थिक अडचण लिहितांना, तुंगभद्रेवर सैन्य पाठविण्यास कळविलें आहे. विसाजी कृष्णानेंही गोपाळराव पटवर्धनास सैन्यासह पाठविण्यास पेशव्यास लिहिलें असून, २१ जानेवारी १७५८ च्या श्रीरंगपट्टणकराविरुद्ध त्यानें पेशव्यास तक्रारवजा लिहिलेल्या पत्राच्या वेळीं, बनाजी माधवरावाचा मुक्कामही तेथेंच होता असें दिसून येतें. याच सालच्या २९ एप्रिलच्या पत्रांत, बनाजीनें आपण देवनहळ्ळी मुक्कामीं बळवंतराव मेहेंदळ्यास मिळाल्याचें लिहून, म्हैसूरच्या राजाचा दिवाण नंदराज याचे धोरणही कळविलें आहे. पण याच वेळीं त्यास परत पुण्यास पाठविण्याबद्दल पेशव्याकडून निकडीचें लिहून आलें असून, त्याचा मुक्काम श्रीरंगपट्टणाहून नागमुगळीस हालल्यामुळेंच केवळ ही यादी त्याला पोहचूं शकली नाहीं.

गोपाळराव गोविंद व मल्हार भिकाजी यांनीं बनाजी माधवरावास लिहिलेल्या पत्रांत[२] म्हैसूरच्या राजाविरुद्ध कडक उपाययोजना करण्यास लिहिलें असून, पेशव्यांची खंडणी व येणें वसूल न झाल्यास राजाची कांहीं ठाणीं घेण्यासही कळविलें आहे. पुढील पत्रांत तर वरील दोघांनीं राजास बनाजीमार्फत "राजा जर आमची मागणी कबूल करीत नसेल, तर ३६ तासांत आम्ही त्याच्या मुलुखावर स्वारी करूं." असा अगदीं निकडीचा धमकीवजा निरोप कळविला आहे. हैदर केव्हां येईल याचा नेम नसल्यामुळें, व राजाही कदाचित् तह न करतां लढाईचीच तयारी करावयाचा अशी शंका त्यांना वाटत असल्यामुळें, ते बनाजीस म्हैसूरच्या राजाच्या खंडणीचा प्रश्न लवकर निकालांत काढण्यास लिहितात. शेवटीं

---

१ पेशवेदप्तर—भाग २२. २ पेशवेदप्तर—भाग २८.

३१–८–१७५८ च्या पत्रांत, म्हैसूर राजास बनाजीमार्फत धमकीवजा निरोप कळवूनही राजा बधत नाहीं असें पाहून, गोपाळराव गोविंद व मल्हार भिकाजी यांनीं अगदीं कंटाळून खंडणीच्या किंमतीचें जवाहीर राजाकडून स्वीकारण्यास आपली कबुली बनाजीस कळविली आहे. इतकें करूनही बंगलोरवर स्वारी करण्याचा प्रसंग त्यांना आला तो आलाच.

वरील हकीकत सन १७५८ च्या आगस्ट–सपटंबरमध्यें घडली असून पुढें आक्टोबरांतच हैदरनें बंगलोरवर केलेल्या स्वारीस गोपाळराव पटवर्धनास तोंड द्यावें लागलें. पण हैदरशीं गोपाळरावानें 'सलाबत खाऊन' मोर्चे उठविल्यामुळें, म्हैसूरच्या राजानें शिरजोर होऊन आपल्याकडून येणें असलेली एक लक्ष चाळीस हजाराची रक्कम दिलीच नाहीं असें दिसतें. बनाजी माधवराव मात्र १७५८ च्या सुमारास पुण्यास आला असावा.

पेशवेदप्तरांत प्रसिद्ध झालेल्या वरील पत्रव्यवहारावरून आमचा कवि, पहिले बाजीराव व नानासाहेब यांच्या कारकीर्दीत तंजावर, फिरंगी, श्रीरंगपट्टण, औरंगाबाद इत्यादि दरबारीं वकीलातीच्या कामावर असून, आपल्या वयाच्या बाविसाव्या वर्षापासून म्हणजे अदमासें सन १७२४ पासून १७५८ पर्यंत या कामावर अव्याहत होता असें स्पष्ट दिसतें. तथापि राजकारणांत त्याची एवढीं ३४।३५ वर्षें जाऊनही व निरनिराळ्या दरबारांत वावरून पुनः पानिपतच्या वेळची प्रत्यक्ष परिस्थिति माहित असूनही या प्रसिद्ध घटनेसंबंधीं एकही उल्लेख त्यानें करूं नये, हें महदाश्चर्यच होय. राजकारणांत इतका प्रत्यक्ष हात असलेला मराठी कवि, निरंजनमाधवाशिवाय दुसरा कोणी नसून, त्याच्या केवळ पारमार्थिक प्रवृत्तीमुळें आपण त्याच्या इतर प्रकारच्या काव्यसंपत्तीस पारखे झालों आहों. अशा रीतीनें सन १७५८ पर्यंत राजकारणांत बहुतेक काल घालविल्यावर आपलें उर्वरित आयुष्य त्यानें ग्रंथरचनेंत अथवा वाङ्मयसेवेंत खर्चण्याचें ठरविलें असावें.

निरंजनमाधवानें आपला पहिला ग्रंथ सन १७३५ त लिहिला व तो "कृष्णानंदसिंधु"च असावा. तथापि याचा प्रारंभ सन १७३५ त पुण्यास करून पुढें श्रीरंगपट्टण मुक्कामीं सन १७४६–१७५२ पर्यंत केव्हांतरी तो त्यानें पुरा केला असावा. या विलंबास बहुधा त्याचें राजकारणच कारणी-

भूत झालें असावें. पुढें १७५८ त त्यानें ‘ चिद्बोध रामायण ’ रचलें. याचीं सातही कांडें पुण्याचे कै. सी. रा. गायकवाड यांना उपलब्ध झालीं होतीं, व त्यांपैकीं बालकांड त्यांनीं १८८६ सालीं प्रसिद्धही केलें होतें. पण मध्यंतरीं बाकीचीं कांडें चोरीस गेल्यानें अथवा भस्मसात् झाल्यानें वाचकांचा नाइलाज झाला आहे. सन १७६१ त निरंजनमाधवानें ‘ वृत्तमुक्तावलि ’ हा वृत्तशास्त्रावरील आपला पहिला ग्रंथ लिहिला असून, त्याच्या नांवावर मोडणारा पण ज्याचें कर्तृत्व विवाद्य आहे असा ‘ सांप्रदायपरिमळ ’ १७६३ त लिहिला गेला आहे. या ओवीबद्ध ग्रंथांत कवीनें आपल्या कुलाची, आपल्या दोन सांप्रदायांची, आपल्या राजकारणी व्यवसायाची व शेवटीं आपणांस बेलूर मुक्कामीं झालेल्या सुंदरकृष्णाच्या मूर्तीच्या लाभाची इत्थंभूत हकीकत आपल्या प्रियपत्नी गंगावतीस निवेदन केली असून, पतीनें पत्नीला सांगितलेल्या अशा या संवादरूप ग्रंथाची, वामनाच्या ‘ प्रियसुधे ’शींच फक्त तुलना करतां येईल. यानंतर सन १७६५ मध्यें ज्ञानेश्वर चरित्रविषयक ‘ ज्ञानेश्वरविजय ’, १७६७ त ‘ वृत्तवनमाला ’ नांवाचा आणखी एक वृत्तशास्त्रावरील प्रबंध, व १७६८ त ‘ सुभद्राचंपू ’ नांवाचा मराठी वाङ्मयांतला एकमेव चंपूग्रंथ असें एकामागून एक स्वतंत्र काव्यग्रंथ निरंजनानें निर्माण केले असून, १६६९ त वशिष्ठसुशर्मासंवाद व रामकर्णामृत, तर १७७२ त पुनः आणखी एक ‘ वृत्तावतंस ’ नांवाचा वृत्तशास्त्रावरील ग्रंथ अशा कृतींना जन्म देऊन, आपली वाङ्मयसेवा आमरणांत चालल्याचें त्यानें लोकनिदर्शनास आणलें आहे. आज उपलब्ध असलेल्या त्याच्या ग्रंथांतील शेवटचा ग्रंथ त्यानें आपल्या ७० व्या वर्षी लिहिला असून, याशिवाय मध्यंतरीं हनुमंत, महालक्ष्मी, मल्हारी, व्यंकटेश, सांबशिव, भवानी, विठ्ठल, तुलसी, भागीरथी, गोदावरी, बनशंकरी इत्यादि देवदेवतांवर स्तोत्रें व अष्टकें यांचा बराच मोठा संग्रह रचला आहे. शंकराचार्यांच्या ‘ स्वात्मानंदप्रकाश ’ या ग्रंथावर निरंजनमाधवानें प्राकृत गद्य टीका केली असून, पेशवे दप्तरांतील निरंजनाच्या पत्रव्यवहारानें तर त्याच्या गद्य दरबारी भाषेचा लाभ आपणास झाला आहे. निरंजनाच्या सडेतोड व तडफदार पण प्रसंगविशेषीं यजमानास योग्य तो सल्ला देणाऱ्या स्वभावाची येथें ओळख पटून, मुत्सद्दी व राजकारणी

माणसें कवित्वास कांहीं पारखीं नसतात, याचें रघुनाथ नारायण हणमंत्या-प्रमाणेंच तोही एक स्पष्ट प्रतीक मानण्यास हरकत नाहीं.

निरंजनमाधवाच्या ' स्तोत्रसंग्रहा 'वरून व ' सुभद्राचंपू'वरून त्याच्या कवित्वाचा व व्यक्तित्वाचा चांगला कयास बांधतां येतो. या दोनी ग्रंथांत, यमकानुप्रासात्मक व संस्कृतप्रचुर अशी त्याची वाणी आपल्या नादमाधुर्यानें वाचकांच्या मनांवर मोहनी घालते.[१] संस्कृत पंचमहाकाव्याचा तर त्याच्यावर इतका परिणाम झाला आहे कीं, त्यानें केलेलीं देवदेवतांच्या अंगसौष्ठवांचीं वर्णनें निवळ सांकेतिक व कायमठशाचींच भासावीं! तथापि एवढ्यावरून आमचा कवि परप्रकाशित किंवा निवळ भाषांतऱ्या असा जर कोणाचा समज झाला असला तर तो मात्र सपशेल चुकीचा आहे. निरंजनमाधवा-जवळ त्याला स्वयंप्रभ कवि म्हणण्याइतकी नसली तरी बऱ्याच उच्च दर्जाची प्रतिभा असून, ती त्यानें प्रस्तुत ' स्तोत्रसंग्रहां 'त व ' सुभद्राचंपू 'त अनेक ठिकाणीं निदर्शनास आणली आहे. ' सांबशिवस्तुतिध्यानां 'तील श्रीमुखाचें[२] अथवा ' रामकर्णामृत ' स्तोत्रांतील रामाच्या कीर्तीचें[३] अनुक्रमें व्यंगोत्प्रेक्षा, व व्याजस्तुति अशा अर्थालंकारांवर अधिष्ठित झालेले आमच्या कवीचें वर्णन इतकें मनोज्ञ आहे कीं, त्यावरून सामराज, रघुनाथपंडिता-प्रमाणें एकादें महाकाव्य अगर खंडकाव्य रचण्याची त्याची पात्रता कोणीही मान्य करील. 'सुभद्राचंपू'तील त्याची रैवतकवर्णनासारखीं[४] स्थलवर्णनें व शरत्कालवर्णनासारखीं[५] ऋतुवर्णनें, मुक्तेश्वराच्या तशाच प्रकारच्या वर्णनांची आठवण करून देत असलीं, तरी स्वतंत्र व वैशिष्ट्यपूर्ण आहेत. पण एकंदरीनें पाहतां निरंजनमाधव व्यक्तिनिष्ठ असण्यापेक्षां वस्तुनिष्ठच अधिक. कोणत्याही वस्तूचें अथवा व्यक्तीचें वर्णन करीत असतां, तो बाह्यवर्णनांत जसा रमतो तसा अंतरंगवर्णनांत रमत नाहीं. त्यामुळें 'स्तोत्रसंग्रहा'सारख्या देवदेवतांना आळविण्यासच केवळ रचल्या जाणाऱ्या काव्यांत देखील ठराविक अलंकारिक वर्णनापलीकडे त्याच्या अंतःकरणाचा जिव्हाळा व आर्तता कोठेंच

---

१ तुलसीस्तोत्र—३१, ४६. २ निरंजनमाधवांची कविता—भाग १ पृ. २५, श्लो. २६. ३ रामकर्णामृत—श्लोक ४५, ४७, ४९. ४ सुभद्राचंपू—सर्ग ३. ५ सुभद्राचंपू—सर्ग ६.

प्रत्ययास येत नाहीं. त्याच्या काव्यांत कल्पनाचातुर्य व कल्पनावैचित्र्य भरपूर असलें, तरी वाचकाच्या हृदयाची तार छेडली जाईल असा एकही प्रसंग सांपडत नाहीं. त्यामुळें निरंजनमाधवाला रसिक पंडित कवि असें नामाभिधान जसें सार्थ होईल, तसें भावनोत्कट कवि हें ठरणार नाहीं. वामन-नागेशादिकवींप्रमाणेंच त्याचें काव्य त्याच्या वृत्तप्रभुत्वाची मात्र उत्तम साक्ष देतें.

आतां आपल्या व्यक्तित्वाची स्फुटता होण्यास आमच्या कवीनें म्हणावा तसा वाव दिला नसला, तरी आपल्या स्तोत्रसंग्रहांत व इतर काव्यांत त्यानें केलेल्या अलंकार व पक्कान्न वर्णनांवरून [१] तो चांगलाच बहुश्रुत व चौकस असला पाहिजे हें निर्विवाद. निरंजनमाधवाची गुरुभक्तीही उत्कट असून आपले गुरु लक्ष्मीधर बरवे यांच्याप्रमाणेंच ज्ञानेश्वराबद्दलचा नितांत आदर त्यानें त्यांच्यावर एक स्वतंत्र चरित्रग्रंथ व अष्टक रचून व्यक्त केला आहे. गिरीचा व्यंकटेश हें त्याचें कुलदैवत असलें, तरी अनेक देवदेवतांवर रचलेल्या स्तोत्रसंग्रहानें त्यानें आपलें सर्वोपासनासहिष्णुत्वही सिद्ध केलें आहे. तथापि कोणत्याही देवतेचें वर्णन करीत असतां, तेवढ्यापुरती ती देवता इतरांच्यापेक्षां श्रेष्ठ मानण्याकडे त्याच्या बुद्धीचा कल दिसून येतो. निरंजनमाधवानें आपल्या काव्यग्रंथांतून सर्वत्र ज्ञानोत्तर भक्तीचा पुरस्कार केला असून, ज्ञानदेवाप्रमाणेंच हठयोगाच्या अभ्यासानें 'योगी' ही पदवी जशी त्यानें प्राप्त करून घेतली आहे, तशी ती आपल्या नांवापुढें मोठ्या अभिमानानें लावलीही आहे. संतकवींच्या प्राचीन परंपरेस अनुसरून आमचा कवि शांकरमतानुयायी असल्यामुळें, गीता व उपनिषत्प्रणीत अद्वैत तत्त्वज्ञानाची व अनासक्तियोगाची ओझरती शिकवण त्यानें आपल्या काव्यद्वारां वाचकांना दिली आहे.

पण लौकिकदृष्ट्या निरंजनाचा कवि म्हणून आपण कितीही वरचा अगर खालचा क्रमांक लावला, तरी त्याचा खरा आत्मा परमार्थसाधकाचा आहे, हें समजण्यास त्याच्या ग्रंथाबाहेर पाहण्याचें कारण नाहीं. एवढा मोठा उलाढालीचा राजकारणी व्यवसाय करीत असतां, ज्यानें आपल्या नित्याच्या महामंत्राच्या जपांत अंतर पडूं न देतां, दत्त व सिद्धेश्वर अशा

---

१ निरंजनमाधवाचा स्तोत्रसंग्रह—गोदावरी मानसपूजा.

दोन सांप्रदायांचें पालन मोठ्या निष्ठेनें केलें, तो जागतिक व्यवहारापेक्षां अध्यात्माला फार मोठें महत्त्व देत होता, हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं. असें असूनही मध्यंतरीं नानासाहेब पेशव्याची थोडी इतराजी झाली असतां, इंगितज्ञ अशा आमच्या कवीनें तीर्थयात्रेच्या मिषानें पुण्यांतून पाय काढला, यावरून व्यवहार सांभाळून परमार्थ साधण्याचें त्याचें चातुर्य चटकन् डोळ्यांत भरतें. 'सांप्रदायपरिमळां'त केलेल्या कांहीं उल्लेखांवरून निरंजन हा सदाचारसंपन्न, [१] परधर्मसहिष्णु [२] व उदारमतवादी [३] असून ढोंगी वर्तनाचा त्याला मोठा तिटकारा असावा असें दिसून येतें. [४] आपल्या कुला-बद्दल व मातापितरांबद्दल त्यांस निस्सीम आदर असून, आपल्या पत्नीची योग्यता जाणून तिच्याशीं अभिन्नत्वाचें नातें ठेवणारा [५] प्राचीन मराठी कवींत तरी त्याच्याइतका दुसरा कोणी दिसत नाहीं. एकंदरीनें पाहतां आमचा कवि अंतर्बाह्य समता पावलेला, प्रपंच साधून परमार्थ साधणारा भगवद्भक्त, योगारूढ व शेंवटीं सिद्धावस्था प्राप्त झालेला असा मोठा महापुरुष होता याबद्दल संशय रहात नाहीं.

निरंजनमाधवाच्या भाषेबद्दल फारसें लिहिण्याचें कारण नाहीं. संस्कृत भाषेवर त्याचें एवढें प्रभुत्व आहे कीं, " मारीचांगजरक्त आसव, एणांबुसी कांचनी मायाभ्रांति " अशासारख्या दुर्बोध सामासिक शब्दांबरोबरच शैलूष, रोलंब, कीकस, क्ष्वेड, इन, मिहिर, द्रुहिण इत्यादि अपरिचित शब्द त्यानें अगदीं सहजासहजीं योजले आहेत. वृत्तसुखार्थ एकाद्या शब्दांतील मूळच्या अक्षरांत बदल तर व्हावा, पण मूळचा अर्थ मात्र कायम रहावा, असें करतांना निरंजनाचें गीर्वाणभाषाप्रभुत्वच त्याच्या मदतीस धांवलें आहे. [६] आमच्या कवीचा मराठीचा व्यासंगही कांहीं कमी नसून, तां (त्वां), कृपा ( कृपेनें ), माज, गिवसणें, आरोपणें, तुकणें, दिठी, आतुडणें, इत्यादि जुन्या शब्दांवरून त्यानें ज्ञानेश्वरापासून शिवकालापर्यंत बहुतेक प्राचीन काव्य डोळ्यांखालून घातलें

---

१ सांप्रदायपरिमळ उद्गार ५।५५–७५. २ सां. प. ५।४३–४४. ३ सां. प. ५।११९, १२१, १२७–१२८. ४ सां. प. उद्गार ५।९७-९९, १३५ ५ सां. प. ५।१४४–१४८. ६ उदाहरणार्थ–कल्पतरु या अर्थी कल्पशाखी, अमराग, सुराग, स्वर्भूरुह, कल्पाग, असे शब्द त्यानें योजले आहेत.

असणें शक्य आहे. वृत्तसौकर्यार्थ भाषेच्या शुद्धाशुद्धतेकडे वामनपंडिता-प्रमाणेंच त्याच्या झालेल्या दुर्लक्षाची भीवोनि, हंमती, वीभूती, अनूप, अजहरा, असे अशुद्ध शब्दप्रयोग व संसारआपांपती, तापत्रयअंधकार, मानअपहा अशी संधीची मुद्दाम केलेली टाळाटाळ, या गोष्टी चांगलीच खातरजमा करणाऱ्या आहेत. त्याशिवाय 'समुदे' हा शब्द, 'झाला' या अर्थी 'घडला' या शब्दाची योजना, 'महिमा' शब्दाचा स्त्रीलिंगी उपयोग, हे प्रकार निरंजनमाधवाचे इतके सर्वसाधारण होऊन बसले आहेत कीं, एवढ्यावरूनही त्याच्या इतर काव्याची आपणांस निश्चिति करतां यावी! निरंजनाच्या भाषेला अस्सल मराठी वळण तर नाहींच; उलट तूं सारिखा, मीहुनी, तूं विना, असे प्रयोग व हावतार ( हा+अवतार ), नुपमा ( न+उपमा ) असें नको तेथें संधीही मराठीला मान्य होण्यासारखे नाहींत. आमच्या कवीला हिंदुस्थानी, कानडी, गुजराथी अशा इतर भाषाही येत होत्या असा प्रवाद आहे. पण असा प्रत्यय त्याच्या कोणत्याच ग्रंथांत वाचकाला येत नाहीं. निरंजनमाधवाची भाषा प्रौढ व सुश्लिष्ठ असली, तरी संस्कृतभाषानभिज्ञास तिची माधुरी कळणें मात्र दुरापास्त आहे.

सरते शेंवटीं 'सांप्रदायपरिमळा'च्या कर्तृत्वाबद्दल एक दोन शब्द लिहिणें क्रमप्राप्तच ठरेल. हा ग्रंथ निरंजनमाधव यानेंच रचिलेला आहे, असा कै. ह. भ. प. पांगारकर यांचा आग्रह असून त्यांच्याविरुद्ध प्रो. पोतदार[१] व प्रो. पां. जि. सबनीस[२] यांनीं तो निरंजनाचा नसून त्याच्या कोणातरी शिष्यानें लिहिल्याचें आपलें मत मांडलें आहे. यानंतर रा. नाथ निफाडकर यांनीं वरील दोघां विद्वानांचें मत खोडून काढतांना 'सांप्रदाय-परिमळ' निरंजनमाधवाचाच हा आपला निःसंदिग्ध सिद्धांत मांडण्याचा जो प्रयत्न[३] केला होता, त्याला मीही पोतदार—सबनिसांच्या बाजूनें उत्तर देण्याचा उपक्रम[४] केला होता. असा या वादाचा अगदीं थोडक्यांत इतिहास आहे.

---

१ महाराष्ट्र साहित्य पत्रिका १९२८. २ विविधज्ञानविस्तार—वर्ष ५९ अंक ८. ३ महाराष्ट्र साहित्य पत्रिका वर्ष ३—अंक ४. ४ विविधज्ञानविस्तार—वर्ष ८—अंक ८—९.

सदर ग्रंथ बारकाईनें वाचून पाहिल्यास मात्र त्याचा कर्ता निरंजन-माधवव्यतिरिक्त कोणी तरी, विशेषतः त्याचा शिष्य असावा हा समज दृढ झाल्याशिवाय रहात नाहीं. ग्रंथाच्या प्रत्येक उद्गाराच्या शेंवटीं 'दास' किंवा 'निरंजनदास' असा कर्त्याचा जो उल्लेख केलेला आहे, तो तर विशेषच विचारणीय आहे. कारण निरंजनमाधव आपल्या ग्रंथांत आपल्या नांवाचा निर्देश 'निरंजनदास' असा कधींच करीत नसून, माधवसुत, कविनिरंजन, निरंजनमाधव असाच नेहमीं करतांना आढळतो. पुनः निरंजन-माधव व त्यांची पत्नी गंगावती या उभयतांचा संवाद कल्पून या ग्रंथाची रचना झाली आहे, हें प्रत्येक उद्गाराच्या शेवटच्या ओंवीवरूनही[१] स्पष्ट होत असल्यामुळें, निरंजनमाधवांचें व त्यांच्या पत्नीचें असें संभाषण झालें, असें अप्रत्यक्ष वर्णन करणारा व श्रोत्यांना अवधान देण्यास विनंति करणारा कोणी तिसराच गृहस्थ या ग्रंथाचा लेखक असला पाहिजे असें निःसंशय वाटतें. शिवाय पहिल्या उद्गाराच्या ४३ व्या ओवीपर्यंत निरंजन–गंगावती यांचें प्रत्यक्ष झालेलें संभाषण व अगदीं पुढच्याच दोन ओंव्यांत[२] त्याच संभाषणाचा केलेला अप्रत्यक्ष उल्लेख, यांमध्यें जी विसंगति दिसून येते, ती निरंजनमाधव स्वतःच या ग्रंथाचा कर्ता असता, तर दिसून येण्याचें मुळींच प्रयोजन नव्हतें. यावरून ग्रंथ लिहितां लिहितां निरंजनाच्या या शिष्यास मध्येंच आपल्या गुरूची व त्याच्या पत्नीची स्तुति करण्याचा मोह न आवरल्यामुळें वरील ओव्या त्याच्यां हातून लिहिल्या गेल्या असून, हा ग्रंथ म्हणजे निरंजनाचें आत्मचरित्रच असें भासविण्याचा त्याचा प्रयत्न विफल झाला आहे. पुष्कळ वेळपर्यंत पतिपत्नीमधील हा संवाद वाचून निरंजनमाधवच या ग्रंथाचा कर्ता अशी वाचकाची खात्री होते न होते, तोंच अशा अप्रत्यक्ष उल्लेखाच्या ओव्या मध्येंच डोकावतात कीं, त्यावरून वरील खात्री तात्काळ जमीनदोस्त व्हावी. अशीं उदाहरणें येथें कितीतरी दाखविता येतील.[३] सारांश आपल्या ग्रंथास महत्त्व यावें यास्तव आपल्या गुरूचा व त्याच्या पत्नीचा संवाद कल्पून कोणा तरी त्यांच्या भक्तानें अगर शिष्यानें हा ग्रंथ लिहिला असावा.

---

१ सां. प. २।१९७. २ सां. प. १।४४, ४५. ३ सां. प. २।५८, ६२; ३।१, २६१ ४।१, २३, १८६, १८८, २१८, २१९.

वरील विधानास पोषक अशा आणखी एका स्थळाचा विचार करणें अवश्य आहे. ' सांप्रदायपरिमळा 'च्या पांचव्या उद्गारांतील १४३ ओंवीपासून पुढील १०।१२ ओंव्यांत, निरंजनमाधव आपल्या पत्नीची स्तुति करतात असें दर्शविलें आहे. निरंजनासारखा स्तुतिनिंदेपासून अलिप्त असणारा योगी आपल्या पत्नीची व पर्यायानें आपली स्तुति करील हें संभवत नाहीं. निरंजन आपल्या पत्नीवर असीम प्रेम करीत असेल, व हें पाहूनच गंगावतीच्या आंगच्या गुणांची उत्कटता दर्शविण्यासाठीं निरंजनदासानेंच वरील स्तुति आपल्या गुरूच्या तोंडीं घातली, असें समजणेंच येथें सयुक्तिक दिसतें.

उरलेला प्रश्न म्हणजे भाषेचा. निरंजनमाधवाच्या भाषेचा ठसा या ग्रंथावर उमटलेला बिलकुल दिसत नाहीं. स्तोत्रसंग्रह, ज्ञानेश्वरविजय, अथवा सुभद्राचंपू इत्यादि आमच्या कवीच्या ग्रंथांत त्याचे जे वर उद्‌धृत केलेले विशिष्ट शब्द व शब्दप्रयोग आढळतात, त्यांचा 'सांप्रदायपरिमळां'त कोठेंही मागमूस लागत नाहीं. आतां 'शकेल' बद्दल 'सकेल' असा शब्दप्रयोग करणें, किंवा 'महिमा' हा शब्द स्त्रीलिंगी वापरणें, हे प्रकार जरी आपणास निरंजनमाधवाच्या इतर ग्रंथांत व ' सांप्रदायपरिमळां'त सर्वसाधारण सांपडले, तरी एवढ्यावरून वरील सर्व ग्रंथांचें एककर्तृत्व सिद्ध होत नाहीं. कारण तसा प्रकार तत्कालीन भाषेचा निदर्शक असणेंही संभवनीय असून निरंजनमाधवाचे व्यक्तिशः आवडते असे शब्द किंवा शब्दप्रयोग ' सांप्रदाय परिमळां'त निखालस सांपडत नाहींत, एवढेंच येथें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

वृत्ताचा मुद्दाही विचारांत घेण्यासारखा आहे. ' सांप्रदाय परिमळ ' हा सर्वच ग्रंथ एकट्या ओंवीवृत्तांत आहे, व निरंजनमाधवासारखा छंदःशास्त्रनिपुण, वृत्तशास्त्रावरील तीन ग्रंथांचा कर्ता, व आपले सर्व काव्यग्रंथ अनेक वृत्तांत गुंफणारा कवि, जर त्याचा कर्ता असता, तर असा स्वतंत्र व आपल्या गुरुसांप्रदायांची माहिती देणारा ग्रंथ एकच एक ओंवीवृत्तांत न रचतां, अनेक वृत्तांत रचून आपलें वृत्तप्रभुत्व त्यानें मोठ्या हौसेनें इष्टोत्पत्तीस आणलें असतें. ' सांप्रदायपरिमाळ 'कर्त्या निरंजनदासाला अशी अनेकवृत्तात्मक रचना पेलण्यासारखी नसल्यामुळेंच, त्यानें ओंवीसारख्या सोप्या व धांवत्या वृत्ताचा अवलंब करून आपल्या ग्रंथाचें काम निभावून नेलें आहे. निरंजनमाधव व निरंजनदास यांच्या रचनेंतील वृत्तभेदावरून

त्यांचा वृत्तिभेदही स्पष्ट होत असल्यामुळें, त्या दोघांचें एकत्व मानतां येण्या-सारखें नाहीं.

प्रस्तुत ग्रंथ सन १७६३ मध्यें चाकणच्या किल्ल्यावर समाप्त झाल्याचा उल्लेख ग्रंथाच्या शेवटीं आहे. निरंजनमाधवानें सन १७६५ त आपला 'ज्ञानेश्वरविजय,' व सन १७६७ त आपली 'वृत्तवनमाला' लिहिली असून, त्यांच्या शेवटीं 'श्रीनिरंजनमाधव विरचितम्' असाच उल्लेख केला आहे. सन १७५८ मध्यें लिहिलेल्या 'चिद्बोध रामायणा'च्या शेवटींही 'निरंजनमाधव' असाच स्पष्ट निर्देश असून, 'सांप्रदायपरिमळ' निर्माण झाल्यावर व तत्पूर्वी आपल्या ग्रंथांत तो आपल्या नांवाचा असाच उल्लेख करीत असल्याचें दिसतें. 'सांप्रदाय परिमळ' जर खरोखर त्याचाच असता, तर आपल्या नांवाचा उल्लेख करण्याचा नित्याचा ठराविक परिपाठ सोडून एवढ्याच ग्रंथापुरतें 'निरंजनदास' असें नामाभिधान धारण करण्याचें त्यांस काय कारण होतें? या बहिःपुराव्यावरूनही निरंजनाच्या कोणीतरी शिष्यानें हा काव्यग्रंथ त्याच्या हयातींतच काय, पण त्याच्या देखरेखीखालीं रचला असावा असें दृढ अनुमान निघतें. आत्मचरित्र लिहिण्याचा तत्कालीं प्रघात नव्हता, अशा स्थितींत सांप्रदायवर्णनाचें हें काम निरंजनाच्या एकाद्या शिष्यानें आपणहून अंगावर घेतलें असल्यास, गुरूनेंही अशा सत्कार्यास आपली अनुमति दिली असणें असंभवनीय नाहीं.

निरंजनमाधवाचे ग्रंथ, श्रीरंगपट्टण, बेलूर, किंवा रामडोह येथें सांपडण्याचा संभव आहे, अशी आशा प्रो. पोतदार यांनीं प्रदर्शित केली आहे. निरंजनमाधवाचे वंशज हल्लीं पुण्यास रहात असून, पारसनीस असें आडनांव लावतात असें रा. आबा चांदोरकर यांजकडे केलेल्या चौकशीवरून समजतें. निरंजनमाधवास बेलूर मुक्कामीं प्राप्त झालेली सुंदरकृष्णाची मूर्ति त्यांच्या वंशजाकडे असून तिची पूजाअर्चा त्यांच्याकडून चालत आहे. कै. ह. भ. प. पांगारकर यांना नाशिकास ज्या भिक्षुकाच्या घरीं निरंजनमाधवाचे ग्रंथ सांपडले, त्याचें नांव समजल्यास मात्र आमच्या कवीच्या इतर ग्रंथांचा सुगावा लागण्याचा बराच संभव आहे. कारण हे भिक्षुकच निरंजनमाधवाचे कोणी ऋणानुबंधी अथवा लांबचे आप्तसंबंधी निघावयाचे!

—*—

# आमचें प्रकाशन

## कादंबऱ्या

तांबडी माती — बा. सी. मर्ढेकर
अंधारांतली वाट — बा. भ. बोरकर
काश्मिरी गुलाब — प्रो. फडके
कुलाब्याची दांडी — ,, ,,
दौलत ( सं. आ. ) — ,, ,,
रिकामा देव्हारा — खांडेकर
सुखाचा शोध — ,,
दिव्यचक्षु — कु. रत्नप्रभा रणदिवे
आंधळा न्याय — वि. वा. पत्की
समरांगण — म. भा. भोसले

## लघुकथा

दत्तक व इतर गोष्टी — खांडेकर
विद्युत्प्रकाश — ,,
पाकळ्या ( ३री आवृत्ति ) — ,,
परिस आणि लोखंड — शं. गो. गोखले
विश्रांति — प्रो. भा. म. गोरे
मकरंद — कमल दीक्षित
कोंवळीं किरणें — दि. द. पाटील

## काव्य

भिकारीण व इ. कविता — मंगसुळीकर
जीवनप्रभा — द. दा. पेंडसे
संसार — सौ. संजीवनी मराठे

## संस्कृत

द्विविभूतिचरितम् — रा. वि. गोखले
बलिदानम् — लाटकरशास्त्री

## नाटकें व नाटिका

तोतया नाटककार — प्रो. फडके
जडावाची देवी — ,,
आगलावी — ,,
विदुषी — ना. धों. ताम्हनकर
मंगळागौर — ,, ,,

## संकीर्ण

हिरवे कंदील — अनंत काणेकर
तुषार — प्रो. पंगु
आस्वाद — ,,
वाङ्मयविलास — माडखोलकर
वनभोजन — खांडेकर
धुंधुर्मास — ,,
प्रतिभासाधन (३री आ.) प्रो. फडके
साहित्य आणि संसार (२री आ.) ,,
वाङ्मयविहार (२ री आ.) ,,
मानसमंदिर — ,,
खांडेकर चरित्र आणि वाङ्मय — प्रो. मा. का. देशपांडे
कलेचीं क्षितिजें — प्रभाकर पाध्ये

बुद्धिबलक्रीडारत्नें — हळदीकर
लघुरत्नपरीक्षा — म. ल. खांबेटे
अभिनयकला — मिरजकर
व्यायामाचा अभ्यास भाग १ — गुप्ते व गुरव

प्रकाशक : दा. ना. मोघे, कोल्हापूर.